

समचरण दृष्टि विटेवरी साजिरी । तेथे माझी हरी वृत्ति राहो ॥

# नम्र निवेदन

## ( दुसऱ्या आवृत्तीचे )

१। वै. गुरुवर्य बंकटस्वामी महाराज यांनी आपले सर्व जीवन परमार्थास वाहून घेतले होते. त्यांनी आजन्म ब्रह्मचर्य व्रताचे पालन केले. तसेच ते वैराग्य संपन्न होते. त्यांनी आपल्या पूर्ण आयुष्याचा काल वै. जोग महाराजांच्या सान्निध्यात घालवून वारकरी वाङमयाचा अभ्यास केला. वारकरी वाङमय त्यांच्या वाणीवर मूर्तिमंत नांदत होते. वास्तविक त्यांचे शिक्षण अगदीच बेताचे (अल्पसे) होते. परंतु त्यांनी ज्ञानेश्वरी, तुकाराम महाराजांचा गाथा, अनुभवामृत, चांगदेवपासष्टी, भग. गीता व ज्ञानेश्वर महाराजांचे अभंग सर्व मुखोद्गत केले होते. तसेच एकनाथी भागवताचे बरीच पारायणे करून पुष्कळसे पाठ केले होते. त्यामुळे कीर्तन प्रवचनात प्रमाणांचा नुसता गंगे-सारखा, ओघ चालायचा. ज्ञानेश्वरीच्या प्रवचनात ज्ञानेश्वर महाराजांचे शब्दातील हृद्गत व्यक्त करताना असे वाटावे की हे ज्ञा. म. चे उद्गारच असावे असे वाटावे. जसे ज्ञानेश्वर म. नी भगवद्गीतेचे हृद्गत प्रगट केले ' देवाचे मनोगत । तूं दावित आहासी मूर्त ।' त्याप्रमाणे ज्ञा. म. चे हृद्गत प्रगट व स्पष्ट करीत असत. तसेच त्यांचे कीर्तन अत्यंत सुश्राव्य असून परिणामकारक होत असे. त्यांच्या भजनात ही अपूर्वरंग असे येत. त्यांनी सर्व महाराष्ट्र हालवून सोडला होता. त्या समयी ते अप्रतिम, अजोड कीर्तन प्रवचनकार होते. वै. जोग महाराजांनी कीर्तन प्रवचनाची घालून दिलेल्या परंपरेला मूर्तरूप वै. बंकटस्वामीनीच दिले. वै. बंकटस्वामी हे वारकरी शिक्षण संस्थेचे अध्यक्ष होते व त्यांनीच–त्यांच्यामुळेच संस्थेला एक महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले. ' मी ' त्यांचे सहवासात असताना क्षेत्रामध्ये वैष्णवांचे समुदायात केलेली कीर्तने लिहून घेतली. त्यापैकी सदर कीर्तनाचे बुकात दहा कीर्तने प्रकाशन केलेली आहेत. एक एक अभंगावर ५ दिवस ७ दिवस केलेली अशी ती विस्तृत व रंगलेली कीर्तने आहेत.

दुसरी आवृत्ती प्रकाशन करताना मला मोठा आनंद होत आहे. प्रासादि कीर्तने अत्यंत सुसंबंध सप्रमाण व सोपपत्तिक रीतीने त्यांच्या वाणीतून बाहेर पडलेली आहेत. ही कीर्तने सर्वांना चिंतनीय आहेत. त्यात उच्च सिद्धांताचे काठीण्य अत्यंत स्पष्ट केलेले आहे. कीर्तनकाराला तर कीर्तने चिंतनीय आहेतच परंतु ज्याला परमार्थ करायचा त्याला मार्गदर्श करणारी आहेत. म्हणून प्रत्येकाने संग्रही ठेवण्यासारखी आहेत. ज्याप्रमा ज्ञा. म. नी ज्ञानेश्वरीत म्हटले आहे. ' अबाल सुबोधे । ओवियेचे नि प्रबंधे (म्हणजे सर्वांना कळावे) त्याचप्रमाणे सर्वांना समजण्यासारखी अशी गुरुव जंकटस्वामींची ही कीर्तने आहेत.

सदरहू कीर्तनाचे पुस्तकाचे काम स्वानंद प्रकाशनच चालक श्री विष्णु भंडारे यानी आपुलकीने करून दिले याबद्दल मनःपूर्वक त्यांचे आभार मानत

सदरहू पुस्तकाचे सर्व हक्क वा. शि. संस्था आळंदी याना दिलेले असल्य संस्थेने किंमत अल्प ठेवली आहे.

या कीर्तनाच्या बुकाची दुसरी आवृत्ती प्रकाशन करीत असता मला कामात ज्यांनी मदत केली अते स. का. नेऊरगांवकर हे वैकुंठवासी झाले ही दुखःद घटना आहे.

आपला नम्र

सुपडू बुवा

# अभंग–विवरण

**काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ॥ १ ॥**
**सर्व साधनांचें सार । भवसिंधु उतरी पार ॥ २ ॥**
**योग याग तपें । केली तयानें अमुपें ॥ ३ ॥**
**तुका म्हणे जपा । मंत्र त्रिअक्षरी सोपा ॥ ४ ॥**

**भूमिका :–** या अभंगात तुकाराम महाराज सांगतात की एका विठ्ठलाचे चिंतन केल्याने होणार नाही असे काही नाही. परमात्म्याच्या नामस्मरणाने जे जे करू ते ते होईल. कारण परमात्मा 'कर्तुम्, अकर्तुम् अन्यथा कर्तुम्' असा सामर्थ्यवान आहे. परमात्म्याने केले तर काय होणारे नाही ?

करिसील तरी नव्हे काई । राईचा डोंगर पर्वत राई ।
आपुले करुणेची साई । करी वो आई मजवरी ॥ तु. ६९६.
तुज करितां होय ऐसें काय नाहीं डोंगराची राई रंक राणा ॥ ९४८
आवडे तें करिसी देवा । कवण करीं तुझा हेवा रे ॥ ज्ञा. म. ३३३.

असे परमात्मा पाहिजे ते करतो त्याचप्रमाणे त्याच्या नामानेही पाहिजे ते होते. परमात्मा आणि त्याचे नाम या दोहोंचा अभेद आहे.

परी आश्रयो आकाशा । आकाशचि कां जैसा ।
या नामा नामी आश्रयो तैसा । अभेदु असे ॥ ज्ञा. १७।४०३
देखें आकाशा आणि अवकाशा । भेदु नाहीं जैसा ॥ ज्ञा. ५।३०.

नाम हे केवळ ब्रह्मच आहे. परमात्मा आणि त्याच्या नामाचा अभेद आहे.

परमात्मा अर्जुनाला सांगतात की :–

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्धय च ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ।। गी. ८।७

परमात्म्याच्या नामस्मरणाने तुम्ही जे कराल ते सिद्धीला जाईल.
परमात्म्याचे नाम मंगलरूप आहे.

सकलमंगळनिधी । श्रीविठ्ठलाचें नाम आधीं ।। १ ।। ज्ञा. १४५.

आणि व्यवहारात ज्याला मंगल म्हणतो ते मंगल नसून केवळ अमंगळ आहे.

मंगळ हें गोहे कन्यापुत्रादिक । राहिला लौकिक अंतरपाट ।। ३६५३
कोणाला मुलगा झाला म्हणजे तो मंगल मानतो. तसेच कोणाचे लग्न ठरले तर मंगल समजतो. पण या मंगलाचे मागे अमंगलाचा योग आहे.

जेथ मंगळाचा अंकुरो । सवेंचि अमंगळाची पडे पारी ।
मृत्यु उदराच्या परिवरीं । गर्भु गिवसीं ।। ज्ञा. ९।५०३

कर्माचे आरंभी परमात्म्याचे नाम घेतले नाही तर ते निर्विघ्नपणाने पार पडत नाही. भगवंताने अर्जुनाला सात्त्विक कर्माचे आरंभी ब्रह्म नामाचा विनियोगाचा प्रकार सांगितला आहे.

आंधारीं अभंगु दिवा । आडवीं समर्थु बोळावा ।
तैसा प्रणवो जाणावा । कर्मारंभीं ।। ज्ञा. १७।३५९

सत्कर्माच्या आड पाप येते.

तुका म्हणे नाड । पाप ठाके हिता आड ।। ४ ।। ३४१४

नाम ते पाप घालविते; कारण नाम परब्रह्म आहे.

नामा म्हणे नाम ओंकाराचें मूळ । परब्रह्म केवळ रामनाम ।।
हरि: ॐ तत्सदिति सूत्राचें सार । कृपेचा सागर पांडुरंग ।।३७४९

कर्माचे आरंभी भगवंताचे नाम घेतले असता ते कार्य सिद्धीला जाते.

आरंभीं आवडी आदरें आलें नाम ।
तेणें सकळ सिद्धि जगीं जाले पूर्ण काम ।। १ ।। ज्ञा. १४६

अभंगाच्या दुसऱ्या कडव्यात महाराज म्हणतात, नाम हे सर्व साधनांचे

सार आहे. अंतरंग व बहिरंग अशी साधने आहेत. त्या सर्व साधनांचे फळ भगवंताच्या नामाने प्राप्त होते.

सार सार विठोबा नाम तुझें सार ।
म्हणोनि शूळपाणी जपताहे वारंवार ।। ज्ञा. १७८

या नामाची थोरी काय सांगावी ? वेदान्त शास्त्रात ज्ञानप्राप्तीची बहिरंग व अंतरंग अशी दोन प्रकारची साधने सांगितली आहेत. एकाला अवांतर वाक्य म्हणतात व दुसऱ्याला महावाक्य म्हणतात. ज्या वाक्यात जीवाचे किंवा परमात्म्याचे फक्त स्वरूप कथन केलेले असते त्यास अवांतर वाक्य म्हणतात.

(२) जीव परमात्म्याची एकता ज्यात प्रतिपादन केलेली असते त्यास महावाक्य म्हणतात.

तैसे जया कोण्हासि दैवे । गुरुवाक्य श्रवणचि सवें ।
द्वैत गिळोनि विसंबे । आपणया वृत्ती ।। ज्ञा. १८।९८८
काना वचनाचिये भेटी । सरिसाचि पैं किरीटी ।
वस्तु होऊनि उठी । कवणि एकु जो ।। ज्ञा. १८।९८९

असे जे तत्त्वमसि महावाक्य त्याचे केवढे महत्त्व सांगितलें आहे.

इवलेसें रोप लाविले द्वारीं । त्याचा वेल गेला गगनावरी ।। ज्ञा. २५०

तत्त्वमसि महावाक्यानें भौतिक प्रपंचाचा निरास होतो. पण महाराज म्हणतात, नामाच्या अर्ध्या अंशाचीही ते बरोबरी करू शकत नाही.

तत्त्वमस्यादि वाक्य उपदेश । नामाचा अर्धांश नाहीं तेथें ।।
म्हणोनि नामसंकीर्तन करितां । जवळी जोडिलासी आतां ।
क्षणभरी न विसंबे । जिवाचिया जीवना रया ।। ज्ञा. १७२

तत्त्वमसि महावक्याचे सर्वच अधिकार नसतात. भगवन्नामाच्या ठिकाणी मात्र सर्वांना अधिकार आहे.

सकळांसि येथें आहे अधिकार ।
कलियुगी उद्धार हरिनामें । २४६१
ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र चांडाळांही अधिकार ।
बाळें नारीनर आदि करोनि वेश्या ही ।। ५ ।। २७२२

भागवतात गणिकेचा इतिहास सांगितला आहे. तत्त्वमसि महावाक्याचे श्रवण करण्यास साधनचतुष्टयसंपन्न असा अधिकारी लागतो. आणि तसे अधिकारी फार थोडे असतात.

मनुष्याणां सहस्त्रेषु ।। गी ७।३ म्हणून तु. म. म्ह.

सकळांसी येथें आहे अधिकार ।। २४६१

संसारसमुद्रातून तरून जाणे फार कठीण आहे.

संसारसिंधु हा दुस्तर । नुल्लंघवे उल्लंघितां पार ।
बहुत वाहाविले दूर । न लगेचि तीर पैलथडी ।। १ ।। ७४१

या संसारसमुद्रातून तरून जाण्याकरिता स्वबलाने ज्यांनी ज्यांनी उड्या घातल्या ते त्यात बुडाले.

बुडाले तयांचा मूळ ना मारग । लागला तो लाग सांडोनिया ।।८।।१८६३

संसारसमुद्र तुम्हा आम्हालाच काय पण ब्रह्मदेवालाही तरून जाण्यास कठीण आहे.

करिता विचार । तो हा दृढ संसार ।
ब्रह्मादिकां पार । नुलंघवे सामर्थ्ये ।। १ ।। १५४२
येत एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो ।
तो तो अपावो । होय तें ऐक ।। ज्ञा. ७।८२

असा हा दुस्तर संसारसमुद्र खरा, पण भगवंताच्या नामाने तरण्याला सुलभ होतो.

विठोबाचें नाम सुलभ सोपा रे । तारी एकसरें भवसिंधु । तु. २५१४
ऐसें अनंत अपार । नामें तरले चराचर ।
नाम पवित्र आणि परिकर । रखुमादेविवराचें ।। ज्ञा. १६६

अजामेळ, वाल्मिकासारखे पापी सरले आणखीही पुढे तरतील.

तरलें तरती हा भरंवसा । नामधारकाचा ठसा ।। ३६१५

मनुष्याची तर गोष्ट सोडा, परंतु माकडे सुद्धा नामाने तरली आहेत.

अनंत भक्त राशी तरले वानर । ज्ञानदेवा घर चिदानंदीं ।। १० ।। १९७

तिसऱ्या कडव्यात महाराज म्हणतात,

योगयागतपें । केली तयानें अमुपें ।। ३ ।।

ज्यांनी नामाचा आश्रय केला त्यांनी योग, याग, तप हे सर्व केले. म्हणजे नामस्मरणानें असंख्य याग, योग केल्याचे फळ मिळतें. नामाचे फळ पापनिवृत्ती आहे.

नामसंकीर्तन साधन पै सोपें । जळतील पापें जन्मांतरीची ।। २४५५

योगाचे फल चित्तवृत्तीचा निरोध. योगश्चित्तवृत्तिनिरोधः असे आहे,

नाम घेतां मन निवे । जिव्हे अमृतचि स्रवे ।
होताती वरवे । ऐसे शकुन लाभाचे ।। १ ।। १८७३

परमात्म्याचे नाममंत्र पुष्कळ प्रकारचे आहेत. काही द्वादशाक्षरी व काही त्रिअक्षरी, द्विअक्षरी.

तुका म्हणे जपा । मंत्र त्रिअक्षरी सोपा ।। ४ ।।

ज्याअर्थी हा सोपा मंत्र म्हणतात त्याअर्थी काही नाममंत्र अवघड असले पाहिजेत. पुष्कळसे नाममंत्र असे आहेत की ज्यांचा अशुचि असताना जप करू नये व दुसऱ्याला ऐकवू नये, तसेच तो बरोबर ( शुद्ध ) म्हटला पाहिजे. त्यात थोडी जरी चूक झाली की चांगल्या माणसालाही वेड लागते.

मंत्र चळे थोडा । तयीं धडचि होय वेडा ।। ४ ।। ३५२२
मंत्र चळे पिसे लागतें सत्वर । अबद्ध ते फार तरले नामें ।। २५१३

पण विठ्ठलनाम असे आहे.

अबद्ध वाकुडें जैशा तैशापरी । वाचे हरि हरि उच्चारावें ।। ८०९

अशिक्षित जे वारकरी त्यांना कुठे शुद्ध बोलता येते ?

कारण शुद्ध कसे बोलावे आणि शुद्ध कसे लिहावे हे व्याकरण शिकल्याने समजते आणि त्यांचा तर सहीचा निशाणी डाव्या हाताचा अंगठा. मग त्यांना कसे शुद्ध बोलता येईल ? पण परमात्मा शुद्ध, अशुद्ध पहात

नाही. तो भाव प्रेम पहातो. प्रेमाने वेडेवांकडे जरी देवाचे नाम घेतले तरी ते देवाला आवडते.

बाळे भोळे भक्त गाताती साबडें। त्यांचें प्रेम आवडे विठोबासी ॥ ज्ञा. २००

भगवंताचे नाम घेण्यासाठी देशकालाची आवश्यकता नसते.

भलत्या काळीं नामावळी। सुलभ भोळी भाविका ॥ २ ॥ २५१८

काळवेळ नाम उच्चारितां नाहीं। दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती। ज्ञा. ह. २१

नव्हे गुरुदास्य संसारीया। वैराग्य तरी भेणें कांपे विषयां।
म्हणोनि गोड सर्वभावें। आंघोळी नलगे तोंड धुवावें।
आर्तचाड जीवें। न लगे भ्यावें संसारा ॥ २ ॥

ज्ञानप्राप्तीकरितां वैराग्य संपादन करून गुरूची सेवा केली पाहिजे. परंतु हे सर्वांना कसे साधेल? कारण वैराग्य संपादन करणे फार कठीण आहे.

बोल बोलतां वाटे सोपें। करणी करितां टीर कांपे ॥ १ ॥ २३२४
नव्हे वैराग्य सोपारें। मज बोलतां न वाटे खरें ॥ २ ॥ २३२४
विष खावें ग्रासोग्रासीं। धन्य तोचि एक सोसी ॥ ३ ॥ २३२४
तैसें नाम नव्हे पंढरीराया। जया सायास न लगती ॥ २५१७
म्हणोनि गोड सर्व भावें ॥ २५१७

हरि बोला देतां हरि बोला घेतां। हांसतां खेळतां हरि बोला ॥ १ ॥
ए. म. ११३३

सर्व दृष्टीने सर्व प्रकारे नाम सोपे आहे म्हणून महाराज म्हणतात,

तुका म्हणे जपा। मंत्र तीअक्षरी सोपा ॥ ४ ॥

**व्याख्यान:**

तुकाराम महाराज या अभंगांत भगवंताच्या नामाचे लोकोत्तर असे सामर्थ्य सांगतात. एक विठ्ठलनामाचे चिंतन केले असता काय एक होणार नाही किंवा विठ्ठलाचे नाम घेऊन केले असता काय होणार नाही? परमात्म्याचे नामस्मरण करून जे जे कराल ते ते सिद्धीला जाईल.

न कळे ते कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ।।२४९१

नामाचे योगाने जे कळत नाही ते बिनचूक कळते. यावर असा प्रश्न येतो, कळण्याला म्हणजे जाणण्याला जगामध्ये काय कठीण आहे ? तर एक परमात्माच.

अगाध तुझी लीला आकळे कैसेनी कळे ।
ब्रह्मा मुंगी धरूनि तुझे स्वरूप सांवळे ।। १५ ।। २५१८
तुज कैसे भजावे आपणा काय देखावे ।
तुजमाजी राहूनी तुजला कैसे सेवावें ।। २ ।। २५१८

सावळा म्हणजे अत्यंत शुद्ध असा अर्थ घ्यावा. सावळा म्हणजे सांवळ्या रंगाचा अर्थ नाही. तर परमात्मा निर्गुण निराकार आहे.

रूप नही रंग नही बरन छाया । निर्विकार निर्गुणही तूचि रघूराया ।
मै गुलाम मै गुलाम मै गुलाम तेरा ।। धृ० ।। कबीर २६३

सावळा म्हणजे अत्यंत शुद्ध. पाणी काळेभोर आहे म्हणतात. म्हणजे काळ्या वर्णाचे असा अर्थ नसून अत्यंत शुद्ध असा अर्थ होतो. तसेच सावळा म्हणजे अत्यंत शुद्ध (व्यापक) आहे. कळण्यास कठीण, जाणण्यास कठीण. तो जाणण्यास किती कठीण आहे, हीच गोष्ट महाराज उदाहरणाने सांगतात.

मलयानिळ शीतळू पालवी नये गाळू ।
सुमनाचा परिमळू गुंफिता नये ।। १ ।। ज्ञा. ५६०
तैसा जाणा सर्वेश्वरु म्हणों नये साना थोरू ।
स्वरूपाचा निर्धारु कवण जाणे ।। २ ।। ज्ञा. ५६०

" पालवी नये गाळू " म्हणजे फुलांचा सुगंध पदराने गाळतां येत नाही. कारण तो अति सूक्ष्म आहे. आकाश आणि वायु ही दोन भूते अति सूक्ष्म आहेत. ती कोणत्याही इंद्रियांना गोचर होत नाहीत. मग त्या भूतांची कल्पना तरी कशी करायची ? वायूची स्पर्श-गुणावरून कल्पना करायची. फुलांतील सुगंधाचा हार गुंफता येत नाही. नुसत्या सुगंधाचा हार कसा होणार ? सुगंध अदृष्ट आहे.

कां घ्राणा फुला दोहीं । द्रुती असे जे माझारिला ठायीं ।
ते न दिसे तरी नाहीं । ऐसें बोलों नये ।। ज्ञा. १५।५४३

फुलां फुलसरां लेख चढे । द्रुती दुजी अंगुळी न पडे ।। ज्ञा. १८-५७

असे जर आहे तर सुगंधाचा हार कसा गुंफता येईल ?

तैसा जाणा सर्वेश्वरु । म्हणों नये साना थोरु ।
स्वरुपाचा निर्धारु । कवण जाणे ।। ज्ञाने. ५६०

परमात्म्याच्या दृष्टीने सुगंध काय, वायु काय, हे जाडे भरडेच आहेत. परमात्मा याहीपेक्षां सूक्ष्म आहे.

अणोरणीयान्महतो महीयान् ।। का. उ.

तुका म्हणे तूंचि ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा झाली नाहीं ।।

परमात्म्याला लहानही म्हणता येत नाही व मोठाही म्हणता येत नाही.

तुका म्हणे नभा । परतः आणूचा ही गाभा ।। ४ ।। ५३०

अणुपेक्षाही लहान म्हणजे किती लहान याचे प्रमाण नाही व आकाशापेक्षा मोठा म्हणजे किती मोठा हेही सांगता येत नाही.

मोतियाचें पाणी भरतां नये वो रांजणीं ।
गगनासि गवसणी घालितां नये ।। ज्ञा. ५६०

मोत्याचे पाणी रांजणात भरतां येत नाही. गगनास गवसणी घालता येत नाही.

तैसा जाणा सर्वेश्वरु । म्हणों नये साना थोरु ।
स्वरुपाचा निर्धारु । कवण जाणे ।। ज्ञा. ५६०

तुज सगुण म्हणो कीं निर्गुण रे । सगुण निर्गुण एकु गोविंदु रे ।। १ ।।
अनुमानेना अनुमानेना । श्रुति नेति नेति म्हणतीं गोविंदु रे ।।२।। ज्ञा. ४

सगुण म्हणावे तरी परिमित होसी ।।
निर्गुण म्हणावे तरी लक्षा न येसी ।।

शब्द निर्गुण भावावे । थितिया सगुणासि कां मकावें ।। १ ।। ज्ञा. ५५३

सगुण निर्गुण उभयता म्हणावे तर तेहि संभवत नाही. का तर हे दोन्ही विरोधी धर्म आहेत. स्थूळ म्हणता येत नाही. सूक्ष्मही म्हणता येत नाही. परमात्म्याला काहीच म्हणता येत नाही. परमात्म्याला निर्गुण निराकार जे म्हटले ते त्याच्या स्वरूपदृष्टचा म्हटले नाही. किंतु सापेक्ष म्हटले आहे. परमात्म्याला सगुण निर्गुण म्हटले तर त्याच्या स्वरूपदृष्टचा गौण आहे. परमात्म स्वरूपाच्या ठिकाणी काहीच म्हणणे खपत नाही.

उदा. :- एक गोष्ट सांगतो. दिवाळीच्या सणात राजाला ओवाळण्याकरिता आलेल्या बाया ओवाळताना त्या बायांनी म्हणावे—इडा पिडा जावो व बळीचे राज्य येवो. राजांनी त्याचा विपरीत अर्थ समजून त्या बायांना तुरुंगात ठेवले. गावात हल-कल्लोळ माजला. एक म्हातारी ओवाळण्याला आली. तिच्या लक्षात आले. तिने ओवाळताना दुसरा मंत्र काढला. कोणता ? माझ्या बाला हेही म्हणो नये; (इडा पिडा जावो.) हा राजा पीडाच आहे तेव्हा यानी जावे. असा अर्थ राजा समजत होता. तसेच बळीचे राज्य येवो याचा अर्थ राजा असा समजत होता की दुसरा बळी राजा येवो. तेव्हा म्हातारीच्या मंत्राने राजा खुष झाला. तसेच परमात्म्यासंबंधाने काहीच अनुमान करता येत नाही. म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात:- अनुमाने ना अनुमाने ना ।। ज्ञा. ५

परमात्मा जर जाणला जाईल तर विषय होईल. आणि परमात्म्याला जड मानणे श्रुतीला संमत नाही व युक्तीला जमत नाही. कारण श्रुती परमात्म्याचे असे वर्णन करते की— परमात्मा ज्ञानरूप आहे. आनंदरूप आहे. ' सत्यम् ज्ञानमनन्तं ब्रह्म ' सर्व जगही जड व परमात्माही जड. मग जडाने जडाचे कसे प्रकाशन करावयाचे. परमात्मा सर्वांचा प्रकाशक आहे.

यदादित्यगतं तेजो जगद् भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ।। गी. १५।१२
तरी सूर्यासकट आघवी । हे विश्वरचना जे दावी ।
ते दीप्ति माझी जाणावी । आद्यंतीं आहे ।। ज्ञा. १५।३९८

जगांतील सर्व ज्ञान परमात्म्याच्या ज्ञानाने प्रकाशले आहे. मग ती ज्ञाने परमात्म्याला काय जाणतील ? सर्व जगाची सिद्धी करणारी प्रत्यक्षादि-करून जी सहा प्रमाणे आहेत, त्यांना विचारले की, तुम्ही सर्वांची सिद्धी करता-- पण आमच्या परमात्म्याचे काही प्रमाण लावले आहे काय ?

एवं प्रमाणें अप्रमाण । पण केलें प्रमाण ।
दृष्टांतीं वाइली आण । दिसावयाची ।। अनु. ५।५४
प्रमेय परिच्छेदें । प्रमाणत्व नांदे ।
तीं काई स्वतः सिद्धे । वस्तुच्या ठाईं ।। ५१७

विषयाची सिद्धी करण्याकरिता प्रमाणांचा उपयोग आहे. पण परमात्मा प्रमेय नाही. मग अप्रमेय आहे. म्हणून निर्विषय आहे. असा निर्विषय जो परमात्मा तेथे प्रमाणांचा काय उपयोग होणार ?

खेल जाणे खेळाडो और क्या जाणे अनाडी ।

येथें निर्धारेंसी विचार । निमोनि जाला साचार ।
स्वामीच्या संकटीं शूर । सुभटु जैसा ।। अमृ. ५।५७

या सर्व प्रमाणांचा विचार वेदामध्यें सांगितला आहे. त्या वेदालाही परमात्मा कळला नाही.

तेथील प्रमाण नेणवे वेदांसी । तें जीवजंतूंसी केंवि कळे ।। ३ ।। ह २५
पाहे पां जाणिवेचेनि बळें । कोणही वेदापासूनि असे आगळे ।
कीं शेषाहुनि तोंडागळें । बोलके आथी ।। ज्ञा. ९।३७०
तोही आंथरूणा तळवटीं दडे । येऊ नेति नेति म्हणोनि बहुडे ।
येथ सनकादिक वेडे । पिसे जाहले ।। ज्ञा. ३७१
शेष स्तुती प्रवर्तला । जिव्हा चिरुनि पलंग झाला ।। तु० २५०४
सहस्र मुखें शेष शिणला बापुडा ।
चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ।। ३७६१
श्रुति नेति नेति म्हणती ।। ज्ञा. ५

वेदु काय काय न बोले । परी येथें नांवचि नाही घेतलें ।
ऐसें कांहीं जोडलें । नाहीं जेणें ॥ अनु० ७।१०७

सर्व भौतिक प्रपंचाचे वर्णन वेदाने केले आहे. पण परमात्म्याच्या बाबतीत नावही घेतले नाही.

एथ वेद मुके जाहले । मन पवन पांगुळले ।
रातीविण मावळले । रविशशी ॥ १० । ६४

तात्पर्य, वेदाला जाणता आले नाही म्हणजे विषयत्वे करून जाणता आले नाही. मग परमात्म्याला वेदाने जाणले याचे रहस्य असे आहे की विषयत्वेकरून न जाणतां स्वकीयत्वेकरून जाणले.

जैंसे न सांगणे वरी । बाळा पतिसी रुप करी ।
बोलु निभालेपणे विवरी । अचर्चितें ॥ ज्ञा. १५।४६८

असा परमात्मा आहे. म्हणून तु. म. म्हणतात, असा जो परमात्मा कोणाकडूनही न जाणला जाणारा, न कळणारा तो परमात्मा या भगवद्नामाने सहजच कळेल.

न कळे ते कळो येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ २४९१
ऐसा सकळां अकळ कळला । हृदयीं धरिला समता बुद्धी ।

जे कळत नाहीं, ते नामाच्या योगानें सहज कळेल असे महाराज म्हणतात.

**शंका** :– आणि परमात्मा कळण्याला कठीण आहे, असा वेदान्ताचा सिद्धान्त असताना तु. म. म्हणतात, नामाच्या योगाने परमात्मा कळेल असे कसे म्हणतात ? तु. म. वेदान्ताच्या सिद्धान्ताला चांगल्या रीतीने जाणत होते. तर मग तो परमात्मा नामाच्या योगाने कसा कळू शकेल ? या आक्षेपाचे दोन रीतीने समाधान सांगता येईल.

(१) नामाच्या योगाने परमात्मा कळेल हे समजण्याकरिता पहिल्यांदा बाह्य ज्ञानाची रीती सांगतो. अंतःकरणाची वृत्ती नेत्र इंद्रिये द्वारा बाह्य देशस्थित पदार्थापर्यंत जाते. त्या वृत्तीमध्ये असणारा चिदाभास वृत्ती-

बरोबरच जातो. पुरणाच्या पोळीप्रमाणे पसरतो. कणीक पसरते, त्याबरोबर आतले पुरणही पसरते. याप्रमाणे वृत्ती बाह्यदेशस्थित पदार्थापर्यंत पोचून त्या पदार्थाला व्यापते. विहिरीतील पाणी थाळातून झारीच्या द्वारा झाडाच्या आळ्यांपर्यंत जाऊन आळयाच्या आकाराचे होते. म्हणजेच त्या झाडाला व्यापते. त्याप्रमाणे वृत्ती त्या पदार्थाला व्यापून त्या पदार्थावरील अज्ञानाचे आवरण वृत्ती दूर करते. याला वृत्ती व्याप्ती म्हणतात आणि त्या वृत्तीत असणारा चिदाभास घटादि जड पदार्थाचे ज्ञान करून देतो. याला फलव्याप्ति म्हणतात. आत्मस्वरूपाच्या ज्ञानाच्या बाबतीत अंतःकरण वृत्ती अंतर्मुख होऊन आत्म्याला व्यापते. म्हणजे फक्त अज्ञानाचे आवरण दूर करते व आत्मा स्वयंप्रकाशमान असल्याने त्याचे ज्ञान म्हणजे प्रकाशन करण्याकरिता चिदाभासाची जरुरी नाही. म्हणून फलव्याप्तीची जरुरी नाही. कारण आत्मा जड नाही. तो ज्ञानरूप आहे "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म" अशी श्रुती आहे.

सत्यज्ञानानंत गगनाचें प्रावर्ण । नाहीं रूपवर्ण गुण जेथें ।। ज्ञा. ३

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ।। गी. १५।१२

तो आत्मा स्वयंप्रकाश असल्यामुळे आभासाचा म्हणजेच फलव्याप्तीचा उपयोग नाही. माजघरामध्ये दैदिप्यमान पदार्थ घटाने झाकलेला आहे त्याला पहाण्याकरिता काठी आणि दिवा नेला. काठीने घट फोडून दूर केला म्हणजे आवरण भंग झाले. नंतर आतला पदार्थ दैदिप्यमान असल्यामुळे त्याचे प्रकाशन करण्याकरिता दिव्याची जरुरी नाही. त्याप्रमाणे परमात्म्याला जाणण्याकरिता फलव्याप्तीचा उपयोग नाही. फक्त वृत्ती व्याप्तीची जरुरी आहे. "वृद्धि न जाणे आणि जाणे हि त्यास" त्याप्रमाणे परमात्मा वृत्ति व्याप्तीने जाणला जातो. तेव्हा तेथे नामाचा काय संबंध आहे. तर भगवद् नामस्मरणाने वृत्ती अंतर्मुख होते.

सदा नामघोष करूं हरिकथा। तेणे सदा चित्ता समाधान ।।१।। ४०३९

नाम घेतां मन निवे । जिव्हे अमृतचि स्रवे ।
होताती बरवे । ऐसे शकुन लाभा ।। १८७३

आपची वृत्ती अंतर्मुख होत नाही. कारण आमच्या मनात बायका, मुले विषय असतात. आणि महात्म्याची वृत्ती अंतर्मुख होते.

पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥ १ ॥ ७६३
पडिले वळण इंद्रियां सकळां । भाव तो निराळा नाहीं तुका ॥ ७६३

अशी नामानें वृत्ती अंतर्मुख झाली म्हणजे त्या वृत्तीत परमात्मा अनुभवास येतो. म्हणून तु. म. म्हणतात,

न कळे तें कळों येईल उगलें । नामे या विठ्ठलें एकाचिया ॥ २४६१
आतां दुसऱ्या रीतीने समाधान सांगावयाचे ते असे--

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ गी. १०।१०

विचारिलें आधीं आपुल्या मानसीं ।
वाचों येथें कैसी कोण्या द्वारे ॥ १ ॥ ३९५१

महाराज म्हणतात, मी पहिल्यांदा त्या परमात्म्याला आळविले ते कसे आळविले.

ऊर्ध्वमुखे आळविला सोहं शब्दाचा नाद । अरूप जागविला दाता घेऊनि छंद । घेऊनि आला दान निजतत्त्व निजबोध । स्वरूपीं मेळविलें नांव ठेवियला भेद ॥ ४ ॥ तु. ३५३

ऊर्ध्वमुखे म्हणजे वर मुख करून असा आळविला नाही. तर अंतर्मुख करून. – ब्रह्म हे ऊर्ध्व आहे.

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ॥ गी. १५।१
प्रपंचाचे दृष्टीनें ब्रह्माला ऊर्ध्व म्हणावयाचे.
एऱ्हवी मध्य ऊर्ध्व अध । हे नाही जेथ भेद ॥ ज्ञा. १५।७३
मी वासुदेव तत्त्वतां । कळों येईल विचारितां ।
आहे ठाऊक सभाग्य संतानाही दुजा आणीक आगता मागता गा ४।३४७

सुपात्रीं सर्वभाव । मी तो सर्व वासुदेव । जाणती कृपाळू संत
महानुभाव । जया भिन्न भेद नाहीं ठावा गा ॥ तु. ३४६

मी परमात्म्याला असे आळविल्यावर तो परमात्मा मला दान देण्याकरतां " निजतत्त्व निजबोध " देऊन आला.

तव साहय झाला हृदयनिवासी । बुद्धि दिली ऐशी नाश नाहीं ॥ २ ॥
पांडुरंगे सत्य केला अनुग्रह । निरसोनी संदेह बुद्धिभेद ॥ ४०३५

संदेह म्हणजे संशय. ते संशय पुष्कळ प्रकारचे आहेत.

एकस्मिन्धर्मिणि विरुद्धनानाधर्मावगाहि ज्ञानं संशयः ॥ न्यायशास्त्र.

एका विशेष्यामध्ये परस्परविरुद्ध अनेक विषयांचे ज्ञान होणे म्हणजे संशय. उदा. :– " स्थाणुर्वा पुरुषो वा " स्थाणु (खांब) या एक विषयांत स्थाणुत्व किंवा पुरुषत्व या दोन विरुद्ध धर्मांचे म्हणजे विशेषणांचे ज्ञान होते. प्रमेय संशय, प्रमाण संशय इत्यादी.

जिवाशिवा शेज रचिली आनंदे । आउटाविए पदीं आरोहण ॥ ४०३५
निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहत बाळका हल्लरु गाती ॥ ४०३५

तु. म. म्हणतात मी परमात्म्यास आळविले. मग त्यांनी मला असे आतले दान दिले आणि या योगानें तो परमात्मा मला कळला. कारण त्याच्याच प्रकाशाने तो जाणला जातो.

सूर्योदय जालिया । सूर्ये सूर्यचि पाहवा धनंजया ।
तेवि माते जाणावया । मीच हेतु ॥

नामाच्या योगाने आणखी काय होते ते सांगतात

न दिसे ते दिसों येईल उगलें । नामे या विठ्ठलें एकाचिया ॥२॥२४९१

जे दिसत नाही ते नामाच्या योगाने सहज दिसते. म्हणजे कोणत्याही साधनाचे अवलंबन न करता केवळ नामाच्या योगाने दिसेल. पण प्रश्न असा येतो की दिसत काय नाही तर जे केवळ नाही तेच दिसत नाही.

नाहीं देखिला तो डोळां । देव दाखवूं सकळां ॥ २९४२
तोचि लटिक्यामानी मला । म्हणे देव म्यां ॥ १ ॥ २९४२

इ तर दृश्य पदार्थ जसे दिसतात, तसा तो दिसत नाही. का दिसत नाही? तर पाहणे हे डोळ्यांचे काम आहे. ते डोळे परमात्म्याच्या सत्तेने इतर पदार्थांना पाहतात.

देखवीं ऐकवी एक नारायण। तयाचे भजन चुकों नको ॥ २ ॥ ३३३०

डोळा परमात्म्याला का पहात नाही? तर डोळे हे रूपवान पदार्थांना पहातात आणि परमात्मा तर अरूप आहे.

रूप नाहीं रेखा नामही जयासी। आपुल्या मानसीं शिवध्याय ॥ ४ ॥
तु. ३७५६

रूपनही रंग नही नही बरन छाया।
निर्विकार निर्गुणहि तूंचि रघुराया। क. २६३

नामरूप संबंधु। जाति क्रिया भेदु।
हा आकाराची प्रवादु। वस्तूसि नाही ॥ ज्ञा. १३।९०४.

तात्पर्य, परमात्मा अरूप होण्यास्तव डोळ्याला दिसणे अशक्य आहे. आणि दुसरी गोष्ट अशी की तो परमात्मा आपण आपल्याला देखील विषय होत नाही. तो दुसऱ्याला कसा विषय होईल?

जो आपणासीं नव्हे विखो। तो कोण लाहे देखों।
जे वाणी न सके चाखों। आपणापें ॥ अनु० । ७ । ११३.

उदा. :– गोषा ज्यांच्या घरांत असतो, त्या घरातल्या बाईचे दर्शन इतरांना नाही. पण त्यांच्या घरातल्या लोकांनाही दर्शन होत नाही; त्याप्रमाणे परमात्मा आपण आपल्याला विषय होत नाही. – तो दुसऱ्याला कसा विषय होईल?

सर्वसिद्धांताचा उजरिया। सांडुनिया निदसुरिया।
आपुलिया हाता चोरीया। आपणचि जें ॥ अनु० ५।३९
परि आणिका कां आपण या। न पुरे विखो होआवया ॥ अनु. ४।३२
कीं पुढिलाची दृष्टी चोरिजे। हा दृष्टिबंधु निफजे।
परी नवल लाघव तुझें। जें आपण पें चोरे ॥ ज्ञा. १४।५

गारुडी गाजावाजा करण्यात पाहणारांना चकवतो. पण तो स्वतःच्या दृष्टीला चकवू शकत नाही. परमात्मा तसा नाही. तो परमात्मा आपल्या दृष्टीला चोरून असतो. ज्या परमात्म्याला डोळ्याचाही डोळा आहे.

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परममुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ।। गी. १३।१७

जे मनाचें मन । जें नेत्राचें नयन ।
कानाचे कान । वाचेची वाचा ।। ज्ञा. १३।९२९,
बाप रखुमादेवीवरु हृदयींचा जाणुनी । अनुभव सौरसु केला ।
दृष्टीचा डोळा पाहो मी गेलीये । तवं भीतरीं पालटु झाला ।।ज्ञा. ७।।

डोळ्याचेही प्रकाशन परमात्माच करतो. आम्ही ज्या डोळ्यांनी बाह्य पदार्थ पहातो त्या डोळ्याचाही डोळा परमात्मा आहे. परमात्मा हा वाचेची वाचा, मनाचे मन, प्राणाचा प्राण आहे.

जे प्राणाचा प्राण १३।९३० या सर्वांचे परमात्माच प्रकाशन करतो. असा न दिसणारा परमात्मा नामाच्या योगाने दिसू शकतो.

न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ।। २ ।।

परमात्मा एऱ्हवी दिसला नाही तरी तो दिसतो. तो कसा? तर आकाश हे सर्वत्र व्यापक असून ते जसें डोळ्यास दिसत नाहीं.

अगा आकाश के नाही । हें न रिघेचि कवणे ठायीं ।
परि कायिसेनि कहीं । गादिजे ना जैसे ।। ज्ञा. १३।१११९

तो नाहीं ऐसा ठाव उरलासे कवण । सर्वत्र संपूर्ण गगन जैसे ।।
नाम ९२२.

तात्पर्य आकाश हे सूक्ष्म आहे. म्हणून दिसत नाहीं आणि परमात्मा तर आकाशापेक्षाही सूक्ष्म आहे,

एरवी सपूरपण तयाचें पहावें । तरी शून्यचि नव्हे स्वभावें ।
वरि गगनाचेनि पालवे । गाळूनि घेतलें ।।८।१६

आकाशाची उत्पत्ती मानल्यामुळे त्याची शास्त्रकाराने काही तरी कल्पना केली. पण परमात्म्याची काहीच कल्पना करता आली नाही. इतका परमात्मा सूक्ष्म आहे.

बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ।। गी. १३।१५
मनाची नखी नलगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे ।
इंद्रिया कीर जोगें । काइ होईल ।। ज्ञा. १२।४१

असा परमात्मा कठीण जरी आहे तरी पण नामाच्या योगाने कळकळीने धावा केला म्हणजे तो धावून येतो.

कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ।। १५३०
नोहे धांवे घाली घान्हा । नांव घेतां पंढरीराणा ।। १५३०
हाकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ।। १ ।। २५२१
ऐसी कृपावंत कोण । माझे विठाई वांचून ।। २ ।। २५२१

प्रल्हादाची गोष्ट आपणास माहीत आहे.

नाम घेत्रों नेदी देवांचें । हे बिरुद हिरण्यकश्यपूचे ।
त्यासी कीर्तन तुझे रुचे । विषमत्व साचें तुज नाही ।। भा. २।६३

भगवंताने नृसिंह अवतार प्रल्हादाकरिता घेतला.

नाम प्रल्हाद उच्चारी । तया सोडवी नरहरी ।
उचलुनि घेतला कडियेवरी । भक्तसुखें निवाला ।। ज्ञा. १६६
प्रल्हादकारणें स्तंभीं अवतार केला ।
विदारुनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ।। तु. १५७१

नवविधा भक्तीपैकी स्मरणभक्ती प्रल्हादाने केली.

हरिचेनि स्मरणे द्वंद्वदुःख नाहीं हे भक्ती प्रल्हादा ठायी ।
कृतांत कोपलिया रोमही वक्र नोहे मनीं निर्भयता निजदेही ।
अग्नि विष आप नेदी त्या संताप न तुटे शस्त्राचे घाई ।
स्मरणाचेनि बळे परिपूर्ण जाला, देह विदेह दोन्हीं नाहीं रया ।। ३ ।।
(ए. २५७२)

अग्नीत टाकल्यावर अग्नीने प्रल्हादाला का जाळले नाही ?

तर अग्नीमध्ये जो दाहक शक्ती आहे, ती परमात्म्याची आहे. मग परमात्मा कसा आपल्या भक्ताला जाळील ?

अग्नि ऐसें आहाच । तेजा नामाचें कवच ।
तें परौतें केलिया साच । निजतेज तें मी ॥ ज्ञा. ७।३६
देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडता वन ॥ १ ॥
तु. ३७१०

न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तेहीं अमृत पाहीं ॥ २ ॥ तु. ३७१०
न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे कधीं यमबाधा ॥ ३ ॥ तु. ३७१०
तुका म्हणे नारायण । येतां गोळ्या वारी बाण ॥ ४ ॥ तु. ३७१०

जिसकु राखे राम । उसकु मारे कोन ।
उसपर सब दुनिया उलटी । तो बाल न बिगा होय ॥ १ ॥
आमचें कुळीं नव्हतें ऐसें । हेंचि पिसें निवडलें ॥ २९८०

तो हिरण्यकश्यपु फारच चिडला व पत्नीला सांगितले, त्याला विष दे. त्याची आई कयाधु. तिचे प्रल्हादावर फार प्रेम होते.

ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभाविण प्रीती ॥ २२६७

पण काय करील बिचारी ? विष न द्यावे तर पतीच्या आज्ञेचे उल्लंघन होते. द्यावे तर आपल्या हाताने पुत्राला मारावे. शिवाय पुत्रहत्त्येचे पातक लागते. अशा मोठ्या काळजीत कयाधु पडली. मग तो प्रल्हाद आईला म्हणाला, 'आई, काय करू ? देवाच्या नामाचा उच्चार करणे माझ्या हातात राहिले नाही.'

माझी मज झाली अनावर वाचा । छंद नामाचा घेतलासे ॥२॥ ४०१६
जिव्हे जाला चळ । नाहीं अवासन तें पळ ॥ २०२७

प्रल्हादाला आई म्हणाली– 'बाबा, देना सोडून नामाचा छंद ! माझ्या हाताने का तुला मी विष द्यावयाचे ?'

तेव्हा प्रल्हाद म्हणाला, आई, आण बरे ते विष ! कसे मारते ते पाहू. तो गोविंद गोविंद म्हणत विष प्याला.

जो प्रल्हादाचिया बोला । विषाही सकट आपण जाहला । ज्ञा. १०।३३४

विष ते अमृत होय तुझ्या नामें ।

याप्रमाणे विष देऊन सुद्धा प्रल्हाद मेला नाही. मग हिरण्यकश्यपु जास्त चिडला व म्हणाला–'सांग, तुझा गोविंद कुठे आहे ?' तो प्रल्हाद आपल्या स्वतःच्या मनाशी म्हणाला– यांना काय सांगावे ? परमात्मा तर व्यापक आहे.

शून्य स्थावर जंगम । व्यापुनि राहिला सकळ ।
बापरखुमादेविवरु । विठ्ठलु सकल ॥ ६
एक राईके हजार हिस्से । उसमे मेरा मौला बसे ।
तुका प्रभु देश विदेश । भरिया खाली नहि लेसा । ४३१०
शुष्क काष्ठीं गुरगुरी । लाज हरी न वरितां । ३७५३
तुका म्हणे नभा । परता अणूनचाही गाभा ॥४॥ ५३०
तुका म्हणे अणू तुजविण नाहीं । नभाहुनि पाहीं वाढ आहे ॥ १०७५
तुजवीण एकादियाकडे । परमाणूहि एतुला कोडें ।

अवकाशु पाहतरो । तरी न सांपडे । ऐसें व्यापिले तुवां ॥ ज्ञा. ११।२७२

मग या खांबात का नसेल ?

खांबावरी लाथ मारिली दुर्जने । स्तंभी नारायण अवतरले ॥ ३४२८

परमात्म्याने हिरण्यकश्यपूच्या सर्व दिलेल्या वरांना सांभाळून ठार केले म्हणून महाराज म्हणतात–

हाकेसरिसी उडी घालुनिया स्तंभ फोडी । २५२१
कोठे न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥ १५३०

गजेंद्राचे उदाहरण असे आहे.

" हा " कहे लछमी " तीं " कहे गजराज ।
आगे लागत गोळी पाछे होत आवाज ॥

तात्पर्य, नामाने परमात्मा गोचर होतो. प्रल्हादाने, गजेंद्राने भक्तीमुळे सगुण परमात्मा पाहिला.

लक्षूनियां योगी पाहाती आभास । तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें ॥ ३७५६

तीन बंध देऊन, प्राण अपानाची समता करून, कुंडलिनी जागी करून योगी ब्रह्मरंध्रात जो आभास पहातात त्याला फार कष्ट पडतात.

क्लेशोऽधिकरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ।। ५ ।। गी. १२।५

एवढे कष्ट सोसून योगी आभास पाहतात. तु. म. म्हणतात-

तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें १।३७५६
आनंद आद्वय नित्य निरामय । जे कां निजध्येय योगियांचें ।। ८२६
तो हा रे श्रीहरी पाहिला डोळेभरी । पाहते पाहणें दुरी सारोनिया ।
( ज्ञा. ३ )

एवंगुणविशिष्ट जे ब्रह्म ते कोठें आहे ?

ते हें समचरण साजिरे विटेवरी । पाहा भीमातीरीं विठ्ठलरूप ।। ८२६
म्हणे विठ्ठल ब्रह्म नव्हे । त्याचे बोल नाइकावे ।। ७८५

आम्ही भागवतधर्मीय सगुण-निर्गुणात भेद पाहात नाही.

दोन्ही टिपरीं एकचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे ।
कुसरी अंगें मोडितील परी । मेळविती एक एका छंद रे ।।१।। २४९
दो दांडी एक श्रुती । दोहों फुली एक द्रुती ।
दोहों दिवीं दीप्ती । एकीची जेवीं ।। अनु. १।१८
दो ओंठी एकी गोष्टी । दो डोळां एकी दृष्टी ।। अनु. १।१९

निर्गुण जो परमात्मा तोच सगुण झाला.

गुण आला विटेवरी । पितांबरधारी सुंदर जो ।। ७
आला नांवारूपा । तुका म्हणे झाला सोपा ।।
जें आकाराचे पैलतीर । जें नादाची पैलमेर ।
तुर्येचें माजघर । परब्रह्म जें । ज्ञा. १३।१०७३
मोक्षा सकटगती । जेथें येती विश्रांती ।
गंगादि अपांपती । सरिता जेवीं ।। १३ ।। १०७४
जें उन्मनियेचें लावण्य । जें तुर्येचें तारुण्य ।
अनादि जें अगण्य । परमतत्त्व ।। ६३२०

जे आकाराचा प्रांतु । जें मोक्षाचा एकांतु ।
जेथ आदि आणि अंतु । विरोनि गेले ।। ज्ञा. ६–३२१
ते हे चतुर्भुज कोंभेली । जयाची शोभा रूपा आली ।
देखोनि नास्तकी नोकिली । भक्तवृंदे ।। ज्ञा. ६–३२४

कडाक्याच्या थंडीने पाणी जसे गोठते तसेच कडाक्याच्या भजनाने निर्गुण परमात्मा गुणात येतो, म्हणजे साकार होतो.

आणिला ही रूपा बळे । करूनि खळे हरिदासीं ।। ३ ।। २२०२

जो निर्गुण तोच सगुण होतो.

निर्गुणाहुनि सगुण न्युन । म्हणे तो केवळ मूर्ख जाण ।
सगुण निर्गुण दोनी समान । न्यून पूर्ण असेना ।। भा.११। १४५५

सगुणाला निर्गुणापेक्षा जो कमी प्रतीचे समजतो त्याला निर्गुण कळलेच नाही.

निर्गुणाचा बोध कठिण । मन बुद्धि वाचें अगम्य जाण ।
शास्त्रांसी न कळे ऊणखूण । वेदीं मौन धरियेलें ।। भा. ११ । १४५७

निर्गुणाचा बोध कठीण आहे; निर्गुण हे व्यापक होण्यास्तव वृत्तीने त्याचे ध्यान करता येत नाही. त्याचे ध्यान करण्याकरता वृत्ती व्यापक करावी तर फुटून जाईल.

तो अर्जुन म्हणे गा तमालश्यामा । इंद्रिया फांवलिया ब्रह्मा ।
तुझा बोलु आम्हां । साकांक्षु पै जी ।। ज्ञा १७।३४

तात्पर्य, जे ब्रह्म कोठे दिसत नाही, ते नामाच्या योगाने सगुण साकार होऊन प्रत्यक्ष डोळ्यांत दिसते. म्हणून महाराज म्हणतात,

न दिसे तें दिसो येईल उगले । नामे या विठ्ठलें एकाचिया ।। २४९१

भगवंताचे नाम हवे ते करील;

न बोलों ते बोल येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ।। २४९१

जे बोलत नाही ते नामाच्या योगाने बोलेल. परमात्मा असा आहे की तो स्वतः बोलत नाही व आपल्या संबंधाने दुसऱ्याला बोलू देत नाही.

बोलेना बोलों देईना । तेथें पाहाणें तें अवघें पारुषलें गे माये ।। ज्ञा.१८३

परमात्मा बोलत नाही, कारण त्याला बोलण्यास तोंड कुठे आहे ? तो चारी वाणीच्या पलीकडचा आहे. त्याला वाचा नाही.

"यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ॥" तै. उ. ९
नवमोऽनुवाकः मन वाचातीत तुझें हें स्वरूप ।
म्हणोनियां माप अकित केलें ॥ तु. ३४२
इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ गी. ३।४२

परमात्म्याला हात-पाय-वाचा वगैरे काही नाही. म्हणून तो बोलत नाही. पण आम्हाला वाचा आहे ना ! मग आम्हाला तरी बोलू द्यावे. पाणी आपण बोलत नाही व त्याच्यात गेलेला त्याला बोलू देत नाही. एका बाईची नथ विहिरीत पडली. तिनें एका पाणबुड्याला बोलविले. त्याने बुडी मारली. त्याला नथ सापडली. त्याला आनंद झाला. नथ सापडली म्हणून सांगावे वाटत होते. परंतु पाण्यात आहे तोपर्यंत बोलता आले नाही.

शब्देंविण संवादु दुजेवीण अनुवादु । हें तंव कैसेनि गमे ।
परेही परते बोलणे खुंटले । वैखरी कैसेनि सांगे ॥ ज्ञा. ७

तुका म्हणे तूचि ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा झाली नाही ॥ ३७५८
कां परेसी पडे मिठी । तेथे नाद सळु नुठी ।
ना वावरीजेल वोठी । हें कें आहे ॥ अमृ० ५।६३
मौनपणे वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे ॥ ३७५७
वेदु काय काय न बोले ॥ अनु० ७।१०७
सहस्रमुखें शेष शिणला बापुडा । चिरलियां घडा जिव्हा त्याच्या ।
शेष स्तुति प्रवर्तला । जिव्हा चिरुनि पलंग झाला ॥ ३ ॥ २५०४
शिणलीं सहस्र तोंडें । शेष फणी ऐसे धेडें ॥३॥ ३७५९
भागलीं स्तुति करितां फार । तेथें मी काय तें गव्हार ।
जाणावया तुझा विचार । नको अंतर देऊं आतां ॥ ७०६
परमात्म्यासंबंधी बोलावे तर,

जें जें बोलिजे तें तें नव्हे । होय तें तंव न बोलवे ।। अनु. ५।२६

परमात्मा नित्य शुद्ध, बुद्ध, मुक्त असा आहे.

जेथें नाहीं गुणागुण । नाहीं कर्यासी कारण ।
तो तूं गुणीं गुणातीत । परिपूर्ण रे ।। ३ ।।

कान्हू सच्चिदानंदु शब्द अरुतारे । त्याही परता तूं निजानंदु रे ।। एक. २३७६

तैसें असताचिया व्यावृत्ती । सत म्हणूं आले श्रुती ।
जडाचिया समाप्ती चिद्रूप ऐसें ।। ५ । १० अनु०

असत् जड दुःख सापेक्ष श्रुतीने परमात्म्याला सत्‌चिद् आनंद म्हटले, त्याच्या स्वरूपदृष्टीने नाही म्हणून ज्ञा० म० म्हणतात–

जें जें बोलीजे तें तें नव्हे ।। २६ ।।

वाचेने परमात्म्यासंबंधी काही बोलता येत नाही. तो वाचेचा प्रकाशक होण्यास्तव.

तेवि जेणें तेजे । वाचेसी वाच्य सुजे ।
ते वाचा प्रकाशिजे । हें के आहे !! अनु० ५।१६
साऊलिवरी न मववे । मविते जैसें ।। अनु. ५।२६

साऊली मोजून आपल्याला उंचीचे अनुमान काढता येणार नाही. याप्रमाणे वाचेने परमात्म्यासंबंधाने बोलता येणार नाही.

सूर्याचेनि प्रकाशें । जें कांहीं जड आभासें ।
तया तो गिवसे । सूर्य काई । अनु० ५।१४

तुका म्हणे वाचा राहिली कुंठीत । पुढें जालें चित्त समाधान ।। २२९६

तात्पर्य, परमात्मा हा स्वतः बोलत नाही आणि आपल्यासंबंधाने दुसऱ्यालाही बोलू देत नाही. असे जरी आहे तरी पण–

न बोलों ते बोलों येईल उगलें । नामे या विठ्ठलें एकाचिया ।। २४९१

परमात्मा बोलला–

आकाशीची वाणी सांगे सकळांसी । तळमळ मानसी करूं नका
।। २३ नाम०।।

पै सृष्टीचिया उपक्रमा । पूर्वी गा वीरोत्तमा ।
वेडा ऐसा ब्रह्मा । एकला होता ।। ज्ञा. १७।३३६

याही वेळेला "तप तप" असा शब्द निघाला.

हंसरूपी ब्रह्मा उपदेशी श्रीहरी । चतु:श्लोकी चारी भागवत । निळो. ८८४ ।। तसेच उद्धव आणि अर्जुन यांचे बरोबर बोलले. उद्धवास भागवत सांगितले आणि अर्जुनाला गीता सांगितली.

जें न संगेची पितया वसुदेवासी । जें न संगेचि माते देवकीसी ।
जें न संगेची बळीभद्रासी । ते गुह्य अर्जुनेशी बोलत ।।

मनुष्य सर्वांपासून गोष्ट चोरून ठेवतो, परंतु रात्री बायकोजवळ बोलतो. पण भगवंताने लक्ष्मीला सुद्धा ते गुह्य सांगितले नाही.

देवी लक्ष्मी एवढी जवळीक । तेही न देखे या प्रेमाचे सुख ।
आणि कृष्ण स्नेहाचें पिक । यातेंचि आथी ।। ज्ञा. ४।९

म्हणून म्हणतात की–

न बोलों ते बोलों येईल उगळे । नामें या विठ्ठलें एकाचिया ।।

परमात्मा व अर्जुन काय बोलले हे समजले. पण कुठे कोणा कोपऱ्यात अलीकडच्या गुरूप्रमाणे बोलला का ? तर नाही; मग कोठे बोलला ? तर घनघोर युद्धभूमीवर.

सख्यत्वें परपार पावला अर्जुन । त्यासी न पुसत दे ब्रह्मज्ञान ।
शस्त्राची खणखण बाणांची सणसण । उपदेशा तेंचि स्थान ।
युद्धाचिये संधी । समाधी लाविली कल्पांतीं न मोडे जाण ।
निजसख्य दोघां आलिंगन पडिलें । भिन्नपणें अभिन्न रया ।। एक० २५७२
अहो संग्रामु हा वाणिया । मापे नाराचांचिया आणिया ।
सूनि मांस घे मवणिया । जीवितेंसी ।। ज्ञा. १७।४२५
ऐसिया समयीं कर्कशें । भोगीजत स्वानंद राज्य कैसें ।
आजि भाग्योदयो हा नसे । आणि के ठाई ।। ज्ञा. १७।४२६

नाही तर योगी लोक जो समाधी लावतात ती आसनापासून थाटस्थ्या-पर्यंत. समाधीत जरा खडबड झाली की बिघडते. भगवंताने अर्जुनाला अशी तटस्थ राहण्याची समाधी लावली नाही.

अर्जुना देऊनी नित्यसमाधी । सवेचि घातला महायुद्धीं ।

तरि तो कृष्ण कृपानिधी । ताटस्थ त्रिशुद्धी नेदीच स्पर्शो ।। ज्ञा. २८२४

भगवंताचे अर्जुनावर निरतिशय प्रेम होते व अर्जुनाचे भगवंतावर निरतिशय प्रेम होते. सख्य भक्तीचा अर्जुन अध्वर्यू होता.

हो कां आत्मनिवेदनातळींची । जे पीठिका आहे सख्याची ।

पार्थु अधिष्ठात्री तेथिंची । मातृका गा. ।। ज्ञा. ६।१२७

श्रवण-कीर्तनादी जी काही नऊ प्रकारची भक्ती सांगितली आहे, त्यापैकी सख्यभक्ती अर्जुनाने केली.

सख्यत्वे परपार पावला अर्जुन ।।

सख्यपणे अर्जुन नरनारायण । सृष्टी जनार्दन एकरूप ।। ज्ञा. १९७

तात्पर्य, अर्जुनाबरोबर देव प्रत्यक्ष बोलले. त्याप्रमाणे नामदेवराया-बरोबर देव बोलले.

रुसलासे नामा उभा गरुडपारी । पितांबरधारी पालवित ।।

अर्जुनाबरोबर परमात्मा उगीच का बोलले ? तर अर्जुनाचे केस 'जय श्रीकृष्ण जय श्रीकृष्ण' म्हणत होते. जनाबाईच्या गोवऱ्या व चोखोबाचे हाड विठ्ठल विठ्ठल म्हणत होते. म्हणून ज्ञानाने न कळणारा, ध्यानात न येणारा असा जो परमात्मा तो नामाच्या योगाने बोलला–

न भेटे तें भेटो येईल आपण । करितां चिंतन विठोबाचें ।। ४ ।।

जे भेटत नाही, ते नामाच्या योगाने आपण होऊन भेटेल. जे कळत नाही, जे दिसत नाही, जे बोलत नाही, तेच भेटते. परमात्म्याची भेट फार दुर्लभ आहे.

जो जन्मसहस्राचियां साठी । इंद्रादिकांही महागु भेटी ।

तो आधिन केतुला केतुला किरीटी । जे बोलुहो न साहे ।। ज्ञा. ६।१४६

न होणाऱ्या गोष्टी एका वेळेला होतील; पण देवाची भेट होणे कठीण !

सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरु ॥

परि या दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न सरती ॥ २ ॥ ६४३

पण परमात्मा भक्तांना भेटतो.

न राहे एक क्षण वैकुंठीं । क्षीरसागर त्रिपुटीं ।

जाय तेथें दाटी । वैष्णवांची धांवोनि ॥ तु. २४३२

भाविक जे माये भोळे गुणाचे । धृ. ।

नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ ।

मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥

कोठें नका पाहों करा हरिकथा । तेथें अवचिता सापडेल ॥

तो मी वैकुंठीं नसें । एक वेळ भानुबिंबीही न दिसे ।

वरी योगियांचि हीं मानसें । उमरडोनि जाय ॥ ज्ञा. ९।२०७

परी तयांपाशीं पांडवा । मी हरपला गिंवसावा ।

जेथ नाम घोषु बरवा । करिती जे माझे ॥ ज्ञा. ९।२०८

माझे भक्त गाती जेथें । नारदा मी उभा तेथें ।

चुकला फकीर जसा मशिदीत सापडतो, तसाच परमात्मा भक्ताजवळ असतो.

नामानेच देव भेटतो.

न भेटे तें भेटों येईल आपण । करितां चिंतन विठोबाचें ॥ ४ ॥ २४९१

अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचे ॥ ५ ॥ २४९१

अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या । २४९१

तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥ २४९१

नाम प्रल्हाद उच्चारी । तया सोडवी नरहरी ।

उचलूनि घेतला कडियेवरी । भक्तसुखें निवाला ॥ १ ॥ ज्ञा. १३६

प्रल्हादासारखे भक्त नामानेच तरले.

वाल्हा कोळी पातकी भूमंडळी । तेणे रामनामे वाजविली टाळी ।

नाम म्हणता त्याच्या पातकाची झाली होळी ॥ १ ॥

रसने रसने रंगीया राघवनामे ।

नाम स्मरे अजामेळ । महापातकी चांडाळ ।

नामे जाला सोज्वळ । आपणा सहित निवाला । ज्ञा. १६६

ख्याती केली अजामेळे । होतें निघालें दिवाळें ।। ३५५१
मोकलीला प्रायश्चित्ती । कोणी न धरिती हातीं ।। ३५५१
अजामीळ अंत मरणासी आला । तोंवरि स्मरला नाहीं तुज ।। १२८
प्राण जातेवेळी म्हणे नारायण । त्यासाठीं विमान पाठविलें ।। १२८
सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ ।
महापातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया ।। २५२६
पुत्राचिया लोभे नष्ट म्हणे नारायण ।
कोण कर्तव्य तुका म्हणे त्याचें पुण्य ।। २६७३

पुत्रा पाचारिले पापिये दुर्जनें तो वैकुंठी ।
अजामेळ सरता रे रे ।। ज्ञा. ३३३ ।।
तूं तें आराधी ना आयके । होती पुंसा बोलवित कौतुकें ।
तिये वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाडु केला ।। ज्ञा. ११ । २०७
ऐसें अनंत अपार । नामे तरले चराचर ।

हे नामाचे सामर्थ्य तु. महाराजांचे डोळ्यांपुढे चित्राप्रमाणे रेखाटलेले होते. आता ते नाम कसे उच्चारावयाचे ते सांगतात :—

गाते श्रोते आणि पाहाते । चतुर विनोदी दुश्चिते ।
सोहंभावीपूर्ण ज्ञाते । या सकळांते विनवणी ।। ज्ञा. १८४
नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी । २४५६
ऐसें धरोनिया ध्यान । मनें करावें चिंतन । २४५६

नामाची आणि रूपाची ओळख पाहिजे. नाही तर नामाचा उच्चार केला; पण रूपाची ओळख नसली तर काय उपयोग ? त्याचे फळ मिळणार नाही.

शंख करिशी ज्याच्या नावे । त्याचें तुज नाहीं ठावें ।
ऐक सांगतो एका भावें । सांपडे तें घरी जीवऊनि खावे रे विठ्ठला ।।२७९९.

तसे तर नाम सर्वच घेतात.

राम नाम सब कोइ कहे । टग ठाकुर अरु चोर
तारे ध्रुव प्रल्हादको । वहे नाम कुछ और ।

पण असे घ्या–

करा विठ्ठलस्मरण । नामरूपीं अनुसंधान ।
जाणोनि भक्तां भव लक्षण । जघन प्रमाण दावितो ॥ ज्ञा. १८४

रूपाच्या ठिकाणी अनुसंधान ठेवून नामाचा उच्चार करावयास पाहिजे. असा जर नामाचा उच्चार केला तर काय होणार नाही !

एका विठ्ठलाचे चिंतन केले तर सर्व नामाच्या योगाने होते. आता अशी एक शंका येते की आम्ही थोडेवहुत देवाचे नाम घेतो. त्या नामाचे सामर्थ्य आमच्या अनुभवाला का येत नाही ? त्याचे उत्तर असे की नाम-स्मरणाची हातवटी कळत नाही. आम्ही देवाचे नाम कसे घेतो ?

नाम घेतां हे वैखरी । चित्त धांवे विषयावरी ॥ एक. १२०२
कैसे होता हें स्मरण । स्मरणामाजी विस्मरण ॥ १२०२

ध्यान करावयास लागले तर मूर्ती आमच्या डोळ्यासमोर येत नाही, पण मनात पीराचा उरूस भरतो.

इंद्रियांसी नेम नाही । मुखीं राम म्हणोनि काई ॥ २८७२
जेवी माशीसंगें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥ २८७२

आम्ही ध्यानाला वसलो म्हणजे आमची इंद्रिये विषयांकडे धावतात.

जिव्हा रसांकडे वोढी । तृषा प्राशनालागी तोडीं ।
शिश्नासी रतिसुखाची गोडी । तें चरफडी रमावया ॥ भा. ९।३१५
खादल्या अन्ना माशी वोलों नये । अवघेचि जाय एक घांसे ॥ तु.३६२३
निवडे जेवण शेवटींच्या घांसे । होय त्याच्या ऐसे सकळही ॥ ३५६७

ही गोष्ट तुकाराम महाराज दृष्टान्ताने सांगतात.

वहुत अन्न विष मोहरीच्या मानें । अवघेचि तेणें विष होय ॥ ३४३३

तारक जे अन्न तेच मारक होते.

कारण जे जीवीता । तें वानिले जरी सेवितां ।
तरी अन्नची पंडुसुता । होय विष ॥ ज्ञा. १६।२२१

त्याचप्रमाणे मोक्षाला नेणारे भजन, नरकाला पाठविते.

भजन तें वोंगळवाणें । नरका जाणें चूकेना ॥ ६५८

कारण ते नाम सर्वशक्तिमान आहे. तमासगीरही रात्रभर रामा रामा जी जी करतात. पण त्यांचे लक्ष नामाच्या अर्थाकडे नसून तमाशातल्या वाईट विषयांकडे असते. " तम्रे धृव प्रल्हादको " ते नाम हेच आहे. वेगळे नाही. पण हातवटी वेगळी आहे; ती हातवटी आम्ही जाणत नाही. म्हणून आमचे वाया जाते.

वर्म चुकलिया नोहे तें कारण । केला होय सीण अवघाचि ॥ तु.१११
तुका म्हणे चुकलें वर्म । केला अवघाची अधर्म ॥ २९२२

आपण जे काम हाती घेतले त्याची हातवटी का चुकली की ते सर्व व्यर्थ जाते.

येणेंसी गा होऊनि एक । जैं चाले कर्म सात्त्विक ।
तैं कैवल्या ते पाइक । घरीचें करी ॥ ज्ञा० १७।३४४
परी कापुराचें थळींव । आणूनि देईल दैव ।
लेवों जाणणेंचि आडव । तेथ असे बापा ॥ ज्ञा. १७।३४५

भगवान अर्जुनाला सांगतात, तू तामस कर्म टाकून सात्त्विक कर्म कर. तेव्हा अर्जुनाने विचारले, 'देवा, सात्त्विक कर्म केल्याने काय होईल ?'

सूर्यें दाविले सांतें । काय एक न दिसे तेथें ।
तेवीं सत्त्वें केलें फळातें काय नेदी ॥ ज्ञा. १७।३१९

ह्या सात्त्विक कर्माला ज्याची जोड मिळाली असतां मोक्ष मिळतो ते काही वेगळेच आहे.

हे कीर आवडतां विखीं । शक्ति सत्त्वीं आथी निकी ।
परी मोक्षेंसी एकी । मिसळणें जें ॥ ३२०।१७
तें एक आनचि आहे । तयाचा सावावो जै लाहे
तैं मोक्षाचाही होये । गांवीं सरतें ॥ ज्ञा. १७।३२१
हा बोलु ऐकतखेवीं । अर्जुना आधि न माये जीवीं ।
म्हणे देवें कृपा करावी । सांगादे तें ॥ १७।३२६

सात्त्विक कर्माला नामाची जोड मिळाली असतां मोक्षाची प्राप्ती होते.

तै मोक्षाचाही होये । गांवीं सरतें ॥ १७।३२१

पण कर्माचे ठिकाणी नामाचा विनियोग करताना

तरी या नामींची अक्षरें तिन्हीं । कर्मा आदिमध्यनिदानीं ।
प्रयोजावीं पैं स्थानीं । इहीं तिन्हीं ॥ ज्ञा. १७।३५४

पुष्कळ नामही घेतले व हाताने सात्विक कर्मही केले. पण हातवटी चुकली तर ते व्यर्थ जाते.

अगा अन्न आणि भूक । पाती असे परी देख ।
जेऊं नेणतां बाळक । लंघनचि कीं ॥ ज्ञा. १७।३५०
का स्नेहा सूत्रा वैश्वानरा । जालियाही संसारा ।
हातवटी नेणतां वीरा । प्रकाशु नोहे ॥ ज्ञा. १७।३५१
तैसें तोंडीं ब्रह्मनाम । हातीं तें सात्त्विक कर्म ।
विनियोगेंवीण काम । विफळ होय ॥ ज्ञा. १७।३४९

याप्रमाणे तुम्ही आम्ही नाव घेतो पण हातवटी चुकते. म्हणून फळ मिळत नाही. एवढ्याकरिता पवित्र आचरणाने चिंतन करावे.

नाम उच्चारितां कंठीं । पुढे उभा जगजेठी ॥ १
ऐसें धरोनियां ध्यान । मनें करावें चिंतन ॥ २४५६

हीच आहे चिंतनाची हातवटी. याच हातवटीने सृष्टीच्या आरंभी ब्रह्मदेवाने नामस्मरण केले.

पैं सृष्टीचीया उपक्रमा । पूर्वी गा वीरोत्तमा ।
वेडा ऐसा ब्रह्मा । एकला होता ॥ १७।३३६
मज ईश्वरातें नोळखे । ना सृष्टी ही करु न शके ।
तो थोरु केला एकें । नामें जेणें ॥ ज्ञा. १७।३३७
जयाचा अर्थु जीवीं ध्यातां । जें वर्णत्रयचि जपतां ।
विश्वसृजन योग्यता । आली तया ॥ ज्ञा. १७।३३८

नामस्मरण थोडे का होईना पण ते हातवटीने केले पाहिजे.

थोडे परि निरें । अविट तें ध्यावें खरें । २७६

दूध पावशेर का होईना पण ते नीरे घ्यावे. विठ्ठल असे नाम उच्चारल्याबरोबर पुढे काय आले पाहिजे ?

सुंदर ते ध्यान उभे विटेवरी ॥
ऐसें धरोनिया ध्यान । मनें करावें चिंतन ।। २४५६
एक रे जना । तुझ्या स्वहिताच्या खुणा ।
पंढरीचा राणा । मनामाजी स्मरावा ॥ २ ॥ २७२२

गाते कोण ? तर–

गाती नारद तुंबर प्रेमें । हरीचीं नामें गर्जंती ।। ज्ञा. ५६

श्रोते कोण ? परिक्षीती. पहाते कोण ? योगी.

लक्षूनिया योगी पाहाती आभास ।।

तिन्हीबंध देऊन, प्राण अपानाची समता करून सुषुम्ना मार्गाने ब्रह्मरंध्रात जातात व आभास पहातात.

चतुर कोण ? ब्रह्मदेव. विनोदी कोण ? नारद. दुश्चित कोण ? व्यास. समाधान व्हावे म्हणून पुष्कळ ग्रंथ केले. व्यासांचे ग्रंथ म्हणजे अलीकडच्या कवीच्यासारखे नाही. काही तरी प्रासाला प्रास जुळवून कवित्व करणे " आर्या भार्या मंगळमूर्ति मोर्या " असे व्यासांचे काव्य नाही.

ज्याचे करितां ग्रंथपठण । ब्रह्महत्यादी दोषनिर्दळण ।
करितां भारतकथा–कथन । निमाले ब्राह्मण उठविले अकरा ॥

च. भा. ओ. ८३८

एथ कळाविद पण कळा । पुण्यासि प्रतापु आगळा ।
म्हणऊनि जनमेजयाचे अवलिळा । दोष हरले । ज्ञा. १।३७

हे ज्यांच्या ग्रंथांचे सामर्थ्य आहे पण त्यांच्यांत त्यांना नकळत असा सूक्ष्म अभिमान होता त्यामुळे ते दुश्चित होते. मग सरस्वती तीराला आले. सोहंभावी कोण ? शुक्राचार्य. पूर्ण ज्ञाते कोण ? याज्ञवल्क्य, जनक. या सर्वांना आमचे ज्ञा. म. म्हणतात की " करा विठ्ठलस्मरण " ते स्मरण कसे ? तर

" नामरूपी अनुसंधान ॥ नाही तर
शंख करिसी ज्याच्या नावें ॥ २७९९

भगवंताच्या नावालाही जाणले पाहिजे. रूपाची ओळख असेल, पण नामाची ओळख नसेल तरीही भागत नाही.

भगवंताच्या नामाची व रूपाची दोन्ही ओळख पाहिजे.

तुकाराम महाराज ठिकठिकाणी अशीच मागणी करतात.

चित्तीं तुझे पाय डोळां रूपाचें ध्यान ।
अखंड मुखीं नाम तुमचे वर्णावे गुण ।। तु. १।८३७

अशा हातवटीने जर भगवंताचे चिंतन केले तर काय होणार नाही ?

# देवा आता ऐसा करी उपकार

देवा आतां ऐसा करी उपकार ।
देहाचा विसर पाडी मज ॥ १ ॥
तरीच हा जीव सुख पावे माझा
बरें केशीराजा कळों आलें ॥ २ ॥
ठाव देई चित्ता राखें पायांपाशी ।
सकळ वृत्तींसी अखंडित ॥ ३ ॥
आस भय चिंता लाज काम क्रोध ।
तोडावा संबंध यांचा माझा ॥ ४ ॥
मागणें एक हेंचि आतां ।
नाम मुखीं संतसंग देई ॥ ५ ॥
तुका म्हणे नको वरपंग देवा ।
घेई माझी सेवा भाव शुद्ध ॥ ६ ॥

**भूमिका** :–अनादिकालापासून घेतलेले देहतादात्म्य त्या देहांतादात्म्याला अत्यंत त्रासून तु. म. भगवंताची या अभंगात प्रार्थना करतात. जीवाच्या मागे जे कोटचवधी अनर्थ लागले आहेत, ते देहतादात्म्यामुळे अंगात ताप भरला म्हणजे डोके दुखणे, भूक न लागणे, तोंडाची चवी जाणे, शौचास साफ न होणे हे सर्व विकार येतात व ताप गेला म्हणजे हे सर्व विकार जातात. याच-प्रमाणे देहातादात्म्य सर्व अनर्थाला कारण आहे. हा विषय मी सप्रमाण, सोप-पत्तिक रीतीने पुढे सांगेन. तूर्त मला अभंगाचा भावार्थ सांगावयाचा आहे. देहतादात्म्य सर्व अनर्थमूलक आहे, म्हणून ते नष्ट होण्याकरिता भगवंताची प्रार्थना करतात.

देवा आतां ऐसा करी उपकार । देहाचा विसर पाडी मज ॥ १ ॥

तुकाराम महाराज म्हणतात, माझ्यावर काही उपकार करावयाचे असतील तर देहाचा विसर पाडा. भगवंतांनी ज्यांच्या ज्यांच्यावर उपकार केले, ते तुकोबारायांच्या डोळ्यांसमोर चित्रासारखे रेखाटलेले होते. कोणा कोणावर उपकार केले ? ध्रुव हा उत्तानपाद नावाच्या राजाचा मुलगा होता. त्याने भगवत्प्राप्तीकरता तपश्चर्या केली होती. कारण,

तपेविण दैवत दिधल्यावीण प्राप्त । गुजेवीण हीत कोण सांगे ॥ ज्ञा. हरी ५

नंतर महामुनी नारदांची गाठ पडली व त्यांनी द्वादश–अक्षरी मंत्राचा उपदेश केला.

ॐ नमो भगवते वासुदेवाय । द्वादशाक्षरी मंत्र न जपसि काह्या ॥
इहीच द्वादशाक्षरी ध्रुव । अढळपद पावला ॥ ज्ञा. अ. १८९

या मंत्राने ध्रुवावर अनुग्रह केला. ते लहान बालक असल्याने त्याला मागण्याचे कळत नव्हते. पण परमात्म्याने विचार केला की, आपण देणारे शहाणे आहोत तेव्हा विचार करून योग्य तेच दिले पाहिजे.

अढळपदी बाळ बैसविला ध्रुरू । दुधाचा सागरू उपमन्या ॥ ६४२

एवढे देऊन परमात्म्याचे समाधान झाले नाही. तर कृतार्थता ज्याच्याने होते असे ज्ञान ध्रुवाच्या ठिकाणी नव्हते. त्याच्या ठिकाणी तर अज्ञान होते. म्हणून आपला शंख त्याच्या गालाला लावला.

नातरी मधुवनी ध्रुवासि केलें । जैसे कपोल शंखे शिवतले ।
आणि वेदांचियेही मती ठेले । ते लागला बोलो ॥ ज्ञा. ११।१८४

असेच उपमन्यूला दुधाचा सागर देऊन उपकृत केले. पांडवावर भगवंतांनी उपकार केले.

अर्जुनाचीं घोडीं धुतली अनंतें । संकटे बहुतें निवारिलीं ॥ ३६७९

पांडव वनवासात असताना त्यांना छळण्याकरता दुर्वासऋषी आले व रात्री भोजन मागितले. त्या वेळी द्रौपदीने भगवंताचा धावा केला. दुर्वास-ऋषींना एक वेळेच्या भोजनाला साठ हजार खंड्या अन्न लागत होते. तेव्हा

देवा आता करी उपकार

उठाउठीं करीं स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥ ३६८३

त्वरा जाली गरुडा टाकियेले मागें । द्रौपदीच्या लागें नारायणें ॥ ३६८३

परमात्मा द्रौपदीचा धावा ऐकून त्वरेने निघाला. तेव्हा गरुड पुढे आला व म्हणाला, मी सेवक असताना आपण वाहनावाचून का जाता ? देव म्हणाले, मला फार त्वरेने गेले पाहिजे. त्याला त्वरा झाली. परमात्मा द्रौपदीजवळ आल्यावर द्रौपदीने नमस्कार केला. देव म्हणाले, द्रौपदे ! मला फार भूक लागली आहे. काही तरी खाण्यास दे ! दुष्काळात तेरावा महिना. एकादशीच्या घरी शिवरात्रच गेली त्यामागे झाले. देवा, आता काही नाही तर देऊ कोठून ? पण देवाला माहीत होते. थाळीच्या बुडाला भाजीचे पान चिकटलेले आहे. ते पान खाऊनच देवाने तृप्तीचा ढेकर दिला.

काय देवा घरी न मिळे तें अन्न । खाय भाजी पान द्रौपदीचें ॥

पंचपक्वान्नाचे जेवण झाल्याप्रमाणे तृप्तीचा ढेकर दिला व संकल्प केला की, अन्नाचे पर्वतप्राय ढीग निर्माण व्हावे. नंतर परमात्मा म्हणाला की बोलव त्या ब्राह्मणाला आणि द्या जेवण. दुसरे उदाहरण द्रौपदीच्या वस्त्रहरणाचे आहे. ज्यांच्यावर परमात्म्याने उपकार केले, ते तर भक्त होते. परंतु दुष्ट पापी लोक होते त्यांच्यावरही देवाने उपकार केले आहेत. अजामेळाचे उदाहरण देतो.

अजामीळ अंत मरणासी आला । तोंवरि स्मरला नाहीं तुज ॥ ९२८

ख्याती केली अजामेळें । होतें निघालें दिवाळें ॥ तु. ३५५१

महादोषांचा मरिगळा । अतिनष्ट अजामेळा ॥

तोही नामें निर्मळ केला । प्रताप आगळा नामाचा ॥ भा. ५ ॥ ३५१

मोकलिला प्रायश्चित्तीं । कोणी न धरिती हातीं ॥ तु. ३५५१

त्याच्यावर परमात्म्याने केवढे उपकार केले ! त्याने जन्मात देवाचे नाव घेतले नव्हते.

पुत्राचिया लोभें नष्ट म्हणे नारायण ।

कोण कर्तव्य तुका म्हणे त्याचें पुण्य ॥ तु. २६७३

पुत्रा पाचारिलें पापिये दुर्जनें । तो वैकुंठी अजामेळ सरता रे रे ॥ ज्ञा. अ. ३३३
अजामीळ अंत मरणासी आला । तोवरि स्मरला नाहीं तुज ॥ तु. ॥ १ ॥
प्राण जातेवेळे म्हणे नारायण । त्यासाठीं विमान पाठविलें ॥ २ ॥ तु. ९२८

असला दुष्ट दुरात्मा, पण नारायण नामाचे स्मरण केले म्हणून कृतार्थ झाला. त्याला वैकुंठात नेण्याकरता विष्णूचे दूत आणि यमाचे दूत आले. त्यांचा परस्परात मोठा वाद झाला. चित्रगुप्ताने त्याने केलेल्या पापपुण्याचा जमाखर्च काढला. विष्णूचे दूत म्हणाले, त्याने काही तरी पुण्यकर्म केले आहे. यमाचे दूत म्हणाले, याने सर्व पाप केले. कुलटा स्त्रियेशी रत झाला; पण शेवटी अंतकाळाच्या वेळी एक वेळा फक्त नामस्मरण केले. यमधर्म म्हणाला, देवा ! त्याने आपल्या कारट्याचे नाव नारायण ठेवले होते आणि त्याचे नाव घेतले. परमात्मा म्हणाला, नारायण हे नाव माझे आहे. माझे नाव त्याने त्याच्या मुलाला ठेवले. तरी ते नाव माझे आहे.

हरि उच्चारणीं अनंत पापराशी । जातील लयासी क्षणमात्रें ॥ १ ॥
सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ ।
महापातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया ॥२॥ तु. २५२६

तु. म. म्ह. ही माझी रोचक वाणी समजू नका. हे मी सत्य सांगतो. त्यावर विश्वास ठेवा.

नाम स्मरे अजामेळ । महापातकी चांडाळ ।
नामें जाला सोज्वळ । आपणासहित निवाला ॥ ज्ञा. १६६
गजेंद्राचा इतिहास असाच आहे.

परमात्म्याने अपकाऱ्यावर देखील उपकार केले आहेत. शिशुपालाने राजसूययागामध्ये भगवंताला शेलक्या शेलक्या शिव्या देऊन त्याची सभेत निंदा केली. परंतु परमात्म्याने त्याला आपले पद दिले.

हां गा राजसूय यागाचिया सभासदीं । देखतां त्रिभुवनाची मांदी ।
कैसा शतधा दुर्वाक्यशब्दीं । निस्तेजिलासी ॥ ज्ञा. ११।१०१
ऐशिया अपराधिया शिशुपाळा । आपणपयां ठावो दिधला गोपाळा ॥
ज्ञा. ११।१०२

पूतनामावशीवरही उपकार केला.

विष पाजू आली पूतना राक्षसी । सायुज्यता देणे तियेसी त्या ॥ ज्ञा.३३३

तुवा सनकादिकांचेंनि मानें । सायुज्यीं सौरसु केला पूतने ॥
जे विषाचेनि स्तनपानें । मारूं आली ॥ ज्ञाने. ११।१००

ऐसा अपकारिया तुझा उपकारु । तूं अपात्रींही परि उदारु ॥ ज्ञा ११।१००

अपकाऱ्यावर उपकार करतो, तो खरा उपकारी. उपकाऱ्यावर उपकार करणे हे साटेलोटे करण्यासारखे आहे.

काहीजण तर उपकाऱ्यावर अपकार करणारे आहेत. एकाला बारा वर्षे एका माणसाने खांद्यावर वागविले. एकदा त्यांनी थोडे खाली उतरवले, तर त्याने शिव्या दिल्या. महाराज म्हणतात,

तुका म्हणे फार । थोडा तरी परउपकार ॥ ६ ॥ तु. २६४०

नका घालूं दूध जयामध्यें सार । ताकाचे उपकार तरी करा ॥तु.२७२०
नेदा तरी हें हो नका देऊं अन्न । कुकाचें जीवन तरि पाजा ॥
तु. २७२०

मनुष्याने कायावाचामनाने परउपकार करावा. आपण एखाद्याला म्हटले की, तू दानधर्म करीत जा ! तो म्हणतो, तुम्हाला काय ? उचलली जीभ लावली टाळ्याला. उपकार करा म्हणतात तर तुम्हीच करा ! स्वतःच्या अंगावर आले नाही तोपर्यंत उदार बुद्धी असते. तु. म. म्ह. देवा, दुसऱ्यावर उपकार करणे तुझे ब्रीद आहे म्हणूनच मी म्हणतो,

देवा आतां ऐसा करी उपकार । देहाचा विसर पाडी मज ॥ १ ॥

माझ्यावर जर काही उपकार करणे असेल तर 'देहाचा विसर' पाडा. देहाचा विसर पडल्याशिवाय माझ्या जीवाला सुख मिळणार नाही, हे मला चांगले कळून आले. हीच गोष्ट दुसऱ्या चरणात सांगतात–

तरीच हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ॥ २ ॥

परंतु देहाचा विसर पडणें व सुखाची प्राप्ती होणे याचा काय कार्य-कारणभावसंबंध आहे ? देहाचा विसर पडणे हे कारण व सुखप्राप्ती हे कार्य. कसे ते भावार्थानंतर सांगेन. अभंगाच्या तिसऱ्या कडव्यात महाराज म्हणतात-

ठाव देई चित्ता राखें पायापाशीं । सकळवृत्तीसी अखंडित ।। ३ ।।

संपूर्ण वृत्तिसह माझ्या चित्ताला आपल्या पायापाशी जागा द्या. महाराजांनी अशी प्रार्थना जागजागी केली आहे.

मांझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं ।
धरोनियां बाहीं । भव हा तारीं दातारा ।। तु. ४५३
चित्तीं तुझे पाय । डोळां रूपाचें ध्यान ।
अखंड मुखीं नाम । तुमचे वर्णावे गुण ।। १ ।।
हेंचि एक तुम्हां देवा । मागणें दातारा ।। तु. १८३७
बहुत चंचळ चपळ । जाता येतां न लगे वेळ ।। तु. १७७२
मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एक पळ स्थिर नाहीं ।। तु. १५६८

आणि या मनासंबंधाने मोठमोठ्यांची अशीच ओरड आहे. अर्जुन भगवंतास म्हणतो-

चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ।। गी. ६।३४
आतां तू उदास नव्हे नारायणा । धांवें मज दीना गांजियेलें ।। तु. १५६८
तें एक ठिकाणी रहात नाहीं. चांचल्यें भावंड मर्कटाचें ।। १३।६९१

जगांत वरकोंबडी माणसे पुष्कळ आहेत. पण मनकोंबडा कोणी नाहीं. तात्पर्य, मन चोहोकडे भटकते. तुकाराम महाराज देवाला म्हणतात, देवा; माझे मन चंचल चपल आहे, कोणी म्हणेल असेना मन चंचल असले तर ! त्यात नुकसान काय आहे ? तर, चंचल मन आहे दुःखाला कारण व स्थिर मन आहे मोक्षाला कारण.

मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः ।

मनुष्य सुखाकरिता इकडे तिकडे भटकतो. वास्तविक सुख हे आपल्या जवळच आहे. मग का मिळत नाही ?

ते मनोरथ संगें नव्हे । एऱ्हवीं सिद्धि गेलेंचि आहे ।
हे दोनीचि उपाये । सुखदुःखासीं ।। ज्ञा. १३।१३३

चंचल चित्त दुःखाला कारण आहे. म्हणून महाराज म्हणतात,

ठाव देईं चित्ता राखें पायापाशीं । सकळ वृत्तींसी अखंडित ।। ३ ।।

तु. म. अभंगाच्या चौथ्या कडव्यात भगवंताला म्हणतात, माझ्या ठिकाणी अनादि कालापासून जे विकार चिकटले आहेत त्यांचा व माझा संबंध तोडा.

आस भय चिंता लाज काम क्रोध । तोडावा संबंध यांचा माझा ।। ४ ।।

आशा ही फार दुःखजनक आहे.

आशा ही परमं दुःखं नैराश्यं परमं सुखं ।। भा. ८।४३

सर्व दुःखाला कोणी जन्म दिला असेल तर या आशेने. यासंबधाने भागवतात यदु व अवधूत यांचा संवाद फार गोड आहे. राजे महाराजे किंबहुना सर्व लोक आशेने दीन केले. आशेला शेवट नाही. एक राज्य जरी असले तरी आणखी दुसरे असावेसे वाटते. दोन-चार राज्ये असली तरी सार्वभौम असावेसे वाटते. फार काय सांगावे ?

असोनि इंद्राची संपत्ति । समाधान नाहीं चित्ती ।।
आशा जैसी दुःखावते । त्याची निंदा दुरितें ।
हे असो जैसें दैन्यातें । दुर्भगत्व ।। ज्ञा. १८।१३९०

इतरांची गोष्ट सोडा.

आशा उपजली अनंतासी । नीच वामनत्व आले त्यासी ।
आशें दीन केलें देवांसी । कथा कायसीं इतरांची ।। भा. ८।३११

वास्तविक परमात्मा केवढा आहे !

अनंत ब्रह्मांडें । एके रोमीं एसें धेंडें ।। १ ।। तु. ३७१७.

एवढा परमात्मा पण आशेने त्याला किती खुजट केले ! वामन अवतार

म्हणजे बटूवेष. परमात्मा हा षड्गुणऐश्वर्यसंपन्न असून बळीकडे हात पसरीत व दात विचकत गेला व त्रिपादभूमी दान मागितली. तसेच भय वाईट आहे, हे दुःखदायक आहे. कल्पना करा. एखाद्याने सर्प पाहिला की भितो, त्याच्या सर्वांगाला घाम येतो. त्या भयभीत झालेल्या पुरुषाला काही सुचत नाही. त्याला साप देखील म्हणता येत नाही. सा सा प प प म्हणतो. हे दुःखाचे द्योतक आहे. आता चिंताः– चिंतेपेक्षा चिता बरी. चिता मृत शरीरालाच जाळते, तर चिंता जिवंत शरीराला जाळते.

सजीवं दहते चिंता निर्जीवं दहते चिता ॥

मनुष्याला काही ना काही चिंता (काळजी) असतेच. चिंतेने चेहरा काळवंडून जातो.

फोडिली गोंवरी। ऐसी दिसे तोंडावरी ॥ तु. २१७७

चिंताग्रस्ताला कितीही खाऊ घाला तरी तो पांढऱ्या पालीसारखा होतो. राममूर्तीसारखा एक संन्यासी निश्चित असायचा. मधुकरी मागून आणून ती खाल्ल्यावर निश्चित पडायचा. एकदा राजाची स्वारी राजमार्गावरून चालली असता हा त्या मार्गावर पडला होता. हुजुराच्या स्वारीला अडथळा येऊ नये म्हणून त्याला उचलून बाजूला टाकून दिले; तर त्याला चीड आली. त्याने हुजूराच्या हत्तीजवळ जाऊन हत्तीचे पुच्छ धरले. त्यामुळे हत्तीचे मागचे पाय ठेकले. माहुत हुषार होता. त्याने हत्तीला खाली बसवून हुजुराचे संरक्षण केले. हुजुराने प्रधानाला विचारले की माझ्या परवानगीवाचून हत्ती का थांबला ? चौकशीअंती संन्यासी समोर आला. राजाने त्याला पाहिले. राग येण्याऐवजी त्याचे कौतुक वाटले. माझ्या राज्यात अशी माणसे आहेत की ज्यांच्यात हत्तीपेक्षा जास्त बळ आहे. हुजूर म्हणाले– अरे, तू काय खातोस ? तो म्हणाला, हुजुर, मधुकरी मागून खातो. पग हत्तीचे बळ कसे ? प्रधान म्हणाला. याचे उत्तर थोड्या दिवसांत मीच देईन. नंतर प्रधान संन्याशाला म्हणाला, आम्ही दोन्ही वेळेला दररोज मिष्टान्नाचे भोजन देऊ. तुम्ही फक्त मारुतीच्या देवळात स्वच्छता ठेवावी. संध्याकाळी सहा वाजता दिवा लावावा एवढेच काम करा. संन्यासाला वाटले, देवाच्या सेवेपेक्षा दुसरे काही नाही

म्हणून त्याने ते मान्य केले. निश्चित मनाला दिव्याची वगैरे चिंता लागली. सहा महिन्यांनी त्याच मार्गावरून हत्ती चालला असता संन्याशाला हत्तीचे पुच्छ धरून हत्ती उभा करण्यास सांगितले. त्याने शेपटी धरली. हत्ती कुठे थांबतो ? हाच फरफटत चालला.

आता लाज :– लाज ही परमार्थाला आड येणारी आहे. आपण एखाद्याला म्हटले की तुम्ही तुळशीची माळ घाला. तर ते म्हणतात लाज वाटते. लोक बुवा म्हणतात.

लाज तेचढी नारायणीं । नांकडी वाणी पोरांचें ॥ ३ ॥ ३०८०

कित्येकांना कीर्तनात टाळी वाजवण्याची, विठ्ठल विठ्ठल असे देवाचे भजन करण्याची लाज वाटते. नामचिंतनाची लाज वाटते. मात्र कुटुंबासमोर माकडाप्रमाणे नाचतो, पोराचे मुके घेतो, पोराच्याजवळ वेडेवाकडे, बोबडे बोलतो.

जरी आड येती लाज । कैसें काज साधतें ॥ तु. २०२३
मोडिले रांडेनें सुपंथ मार्ग । चालविलें जग यमपंथें ॥ २५६१

म्हणून लाजेवर चिडून म्हणतात की– देवा, लज्जा माझे ठिकाणी राहू देऊ नकोस. कामक्रोध ही तर बळी मंडळी. यांनी तर मोठमोठ्या ऋषी-महर्षींना फसविले, धुळीत मिळविले.

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ गी. ३।३७

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ गी. १६।२१

भागवतात या कामाचा प्रताप सांगितला आहे.

मज कामाचेनि घायें । ब्रह्मा कन्येसि धरूं जाये ।
पराशरा केलें काये । भोगिली पाहे दिवा दुर्गंधा ॥ भा. ४।११७

असे हे विकार दुःखदायी आहेत. म्हणून या कामादिकांचा व माझा संबंध तोडा. त्यांनी मला जर्जर करून टाकले आहे.

**मागणें तें एक हेंचि आहे आतां । नाम मुखीं संतसंग देई ॥ ५ ॥**

देवा, तुला आणखी एक माझे मागणे आहे.
नाम मुखी संतसंग देई । वदनीं तुझें मंगळ नाम ।
हृदयीं अखंडित प्रेम ।। नामदेवराय ।। १५८१

माझ्या वाचेने नामस्मरणावाचून एक क्षणभर राहू नये आणि संतांची संगती द्यावी, अशी मागणी तुकाराम महाराजांनी ठिकठिकाणी केली आहे.

अखंड ज्या तुझी प्रीति । मज दे तयाची संगति ।
मग मी कमळापती । तुज बा नाणीं कांटाळा ।। तु. ११३९
संतसंगति देई चरणसेवा । जेणें हा तुझा विसर न पडावा ।
हाचि भाव माझिया जीवा । पुरवीं देवा मनोरथ ।। तु. ६९९

तुकाराम महाराज भोंदू, लुबाडणारे अशांच्या संगतीची मागणी करीत नाहीत; तर

आत्मज्ञानें चोखडीं । संत जे माझी रूपडीं ।। ज्ञा. १८।१३५६
अशा संतांची संगती मागतात.

अभंगाच्या शेवटच्या कडव्यात महाराज भगवंताची प्रार्थना करतात की देवा, तुझी मी सेवा करतो, पण ती माझी सेवा वरपग होते.

म्हणवितो दास ते नाहीं करणी । आंत वरी दोन्ही भिन्न भाव । तु.
गातों नाचतों तें दाखवितों जना । प्रेम नारायणा नाहीं अंगी ।। तु. १९१४

नोहे दास खरा । परि हा झालासे डांगोरा ।। १ ।।
यासी काय करूं आतां । तूं हें सकळ जाणता ।। २ ।। ५२३

पुष्कळसे लोक आपण आपल्याला भक्त म्हणवितात. लोक सुधारण्याकरता प्रयत्न करतात. पण हे स्वतःच सुधारलेले नाहीत. आता हे काय जगाचे कल्याण करणार ?

म्हणविती ऐसी आइकतों संत । न देखिजे होत डोळां कोणी ।। १ ।।
ऐसियांचा कोण मानितो विश्वास । निवडे तो रस घाई डाई ।। २ ।।
हिऱ्या ऐशा गारा दिसती दुरोन । तुका म्हणे घन न भेटे तों ।। ४ ।।
(३३६२)

देवा आता करी उपकार

भक्त म्हणवितां वाटे गोड । भजन मुद्रा अति अवघड ।
भक्तीचें अंतर अतिगूढ । न कळे उघड श्रुतिशास्त्रां ।। भा. १४।२४१

क्रिया करायची पाळी आली म्हणजे बेचैन होतो. महाराजांना हे चांगले ठाऊकी होते, म्हणून ते भगवताला म्हणतात–

तुका म्हणे नको वरपंग देवा । घेई माझी सेवा भाव शुद्ध ।। ६ ।।
दिखाऊ भक्ती नको.

तुका म्हणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ।। तु. ११८५
(भावार्थ झाला)

**व्याख्यान** :– देहाचा विसर पाडण्याकरिता देवाची प्रार्थना करतात. एवढा माझ्यावर उपकार करा असे म्हणतात. तेव्हा सकृद्दर्शनी याचे आश्चर्य वाटते, विपरीत वाटते. कारण आपण देहस्मरणावर येण्याकरिता किंवा राहण्याकरिता प्रयत्न करतो. एखादा मनुष्य बेशुद्ध झाला, तर त्याला शुद्धीवर आणण्याकरता हाका मारतात अथवा वैद्याला बोलवतात. त्याने शुद्धीवर यावे म्हणून जोराने चिमटा घेतात, अथवा डोळयांत अंजन घालतात. येन केन प्रकारेण त्याला देहाच्या स्मरणावर आणतात आणि येथे तु. म. म्हणतात की– देहाचा विसर पाडा ! तुम्ही आम्ही देहाच्या स्मृतीकरता यत्न करतो आणि तु. म. देहाला विसरण्याकरता देवाजवळ प्रार्थना करतात. हे आश्चर्य वाटते. पण तसे ते नाही. कारण मूर्च्छित अवस्थेत जसा देहाचा विसर पडतो अथवा सुषुप्तीमध्ये जसा देहाचा विसर पडतो असा विसर पडावा म्हणून ते म्हणत नाहीत. तो कसा विसर पडावा म्हणतात. हीच गोष्ट सोपपत्तिक रीतीने सांगणार आहे.

परंतु त्यापूर्वी देहाचा विसर जर तुम्ही मला पाडला तरच जीवाला सुख मिळेल, या महाराजांच्या म्हणण्यावर शंका येते त्याचा विचार करू. जीव हा सुखी नसावा अर्थात दुःखी असला पाहिजे. जीवाचे स्वरूपासंबंधाने अन्य शास्त्रकारांचे काय म्हणणे आहे ते पाहू. जीव हा मूळचा सुखी आहे किंवा दुःखी आहे, यासंबंधाने शास्त्रकारांचा सिद्धान्त आहे.

श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ।
ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मै व नापरः ॥

कोटयवधी ग्रंथांचा अभिप्राय एका अर्ध्या श्लोकातून सांगितला. सर्व शास्त्राकार मोठया कंठरवाने सांगतात की– ब्रह्म सत्य आहे आणि जग मिथ्या आहे. जोव हा ब्रह्मरूप आहे.

जो परमात्माचि परि दुसरा । जे अहंकार निदसुरा ।
म्हणोनि स्वप्नीचिया वोरबारा । संतोषे शिणे ॥ ज्ञा. ८।३५

परमात्मा गीतेतही ठिकठिकाणी अर्जुनाला हेच सांगतात,

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥ गी. १४।२६

अर्जुना, हे नामरूपात्मक विश्व माझ्याहून भिन्न नाही.

तैसें विश्व येणें नांवें । हें मीचि पै आघवें ।
घेई चंद्रबिंब सोलावें । नलगे जेवी ॥ ज्ञा. १४।३७७

या नामरूपात्मक अखिल विश्वामध्ये मला पहावयाचे म्हणजे विश्वाला बाजूला सारून कोणत्या तरी कोना कोपऱ्यात कोठे तरी मी आहे असे नाही.

म्हणोनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।
तैसा नव्हे उखिते । आघवें मीचि ॥ ज्ञा. १४।१२७

जगाचा निरास करून परमात्मा पहाणे म्हणजे पेढा सोलल्याप्रमाणे आहे. केळी, डाळिंब यातला काही भाग टाकावा लागतो, तसा पेढा सोलावयास नको. तसे करू लागला तर पेढा सोलण्यातच नाहीसा होणार. भगवंत अर्जुनाला जागजागी हीच गोष्ट सांगतात. नामरूपात्मक जगताच्या योगाने मी झाकला जात नाही; तर जास्त प्रकाशमान होतो.

जालेंनि जगें मी झांकें । तरी जगत्वें कोण फांके ।
किळेवरी माणिकें । लोपिजे काई ॥ ज्ञा. १४।१२३

माणिक नावाच्या रत्नावर जे तेज दिसते त्यायोगाने माणिक रत्न झाकले जाते काय ? तेज नसेल तर त्याला माणिक कोण म्हणेल ? काच म्हणून फेकून देतील.

तरी पार्था परियेसा । मी तंव एथ ऐसा ।
रत्नीं किळावो जैसा । रत्नचि तो ॥ ज्ञा. १४।३७२

मी विश्वाहून भिन्न नाही, तर विश्वच मी आहे.

माझेया विस्तारलेपणाचे नावें । हें जगचि नोहे आघवें ।
जैसें दूध मुरालें स्वभावें । तरी तेंचि दहीं ॥ ज्ञा. ९।६४

माझ्या विस्तारलेपणाच्या नावानें जग म्हणजे मी आहे.

आक्षेप:–जगाचा विस्तार म्हणजे परमात्म्याचा विस्तार कसा होईल ? कारण जग नामरूपात्मक आणि परमात्मा नामरूपरहित आहे.

अव्यक्त निराकार नाहीं ज्या आकार । जेथोनि चराचर हरिसी भजे ॥
(ह. पाठ ३)

रूप नही रंग नही नही बरन छाया ।
निर्विकार निर्गुणही तूंचि रघुराया ॥ कबीर २६३

त्याचे समाधान असे आहे की जरी नामरूपात्मक जगत् भिन्न दिसले व परमात्मा त्याच्या विपरीत दिसला तरी परमात्माच जगत् बनला आहे.

जैसें दूध मुरालें स्वभावें । तरि तेंचि दहीं ॥ ज्ञा. ९ ॥

दूध व दही नामरूप सारखे नाही. दूध पातळ, दही घट्ट. दूध गोड, दही आंबट. दूध निर्विकार, दही विकारी. दूध प्याले तर विकार करीत नाहीं, दही 'प्याले तर डोके दुखावयास लागते. दही हे दुधाहून विपरीत स्वभाववान् आहे. तरी दूधच जसे दही झाले, त्याप्रमाणे नामरूपात्मक जगत् जरी परमात्म्याहून भिन्न दिसले तरी परमात्माच जगत् बनला आहे. निर्गुण निराकार परमात्माच सगुण साकार झाला. दुसरा आक्षेप :– दुधाचे दही बनते पण ते आपण होऊन बनले नाही. तर दूध हे दही या परिणामाला पावण्यासाठी त्यांच्यात विरजण घालावे लागते.

जैसें विरजणियाचेनि संगे । दूधचि आटेजों लागे ॥ ज्ञा. ९।१०८

तसे परमात्मा जगत् बनण्याला कारण काय आहे? तर त्याचा संकल्प आहे.

कांहींच नहोनियां कांहीं एक होता। नामरूपातीत आपण नेणता।

होण्या न होण्याच्या नेणोनियां वार्ता। त्याचा संकल्पचि झाला त्या असवतावो ॥ ऐशा परि हा मूर्तिमंत झाला ॥ धृ० ॥ निळो. १४६

परमात्मा जगत् बनण्याला कारण त्याची स्वतःची इच्छा.

एकाकी न रमते स द्वितीयमैच्छत् ॥ बृ. उ. ४।३

एकोहंऽ बहुस्याम् ॥ ६।२।३

नव्हे तेंचि कैसें झाले रे खेळिया। नाहीं तेंचि दिसूं लागलें रे।

अरूप होतें तें रूपासि आलें। जीव शिव नाम पावलें रे ॥ नाम २१११

परमात्माच सर्व रूपाने नटला आहे.

एकीं एकपणाचा घेऊनियां त्रास। जाला नानाकार स्वरूपे बहुवस।
म्हणोनि दुसरेंचि नाडळे वो वास। जया तयामाजीं याचाचि रहिवास वो ॥ नि. १४८

दुधाचे दही झाले या दृष्टान्ताने ज्ञानेश्वर महाराजांनी जगाचा आरंभ झाला तो साधला. दृष्टान्तात दुधाचे दही झाले. पण दह्याचे दूध होणार नाही. तसेच परमात्माच जगत् झाला आहे. जगत् परमात्मा होणार नाही. सर्व जीव परमात्मा जर होणार नाही, मग जीवाला कालत्रयी सुख मिळणार नाही, म्हणून ज्ञानेश्वर महाराज दुसरा दृष्टान्त देतात.

कां बीजचि जाहलें तरु। अथवा भांगारचि अळंकारु।
तैसा मज एकाचा विस्तारु। तें हें जग ॥ ज्ञा. ९।६५

जेवढा वृक्षाचा विस्तार असतो तेवढा बीजात साठवलेला असतो.

सविस्तर वटत्व जैसें। बीज कणिकेमाजि असे।
आणि बीजकणु वसे। वटीं जेवीं ॥ ज्ञा. ९।४१०

देवा आता करी उपकार

बीजच जसे वृक्षाच्या विस्ताराच्या परिणामाला पावते व शेवटी त्याला बीज येते.

तरुवर बीजापोटीं । बीज तरुवरा शेवटीं ॥१॥ तु. ३७६९

या दृष्टान्ताने जगताचा अंत साधला.

तुका म्हणे बीजें बीज दाखविलें । फल पुष्प आलें गेलें वायां ॥ तु. ३७७०

याप्रमाणे परमात्मा जगत् झाला व सर्व जग शेवटी परमात्मा होते. मग कोणी म्हणेल, कशाला भजन–पूजन करावयास पाहिजे ? का तर शेवटी सर्व जीव सहजच परमात्मा होणार आहेत. पण ते केव्हा होणार ? त्याला किती कालावधी पाहिजे ? पुन्हा शंका येते की– बीजाचा वृक्ष झाला व वृक्षाला बीज आले. आदि बीज, अंती बीज आहे; पण मध्ये वृक्षाला बीज कोणी म्हणेल काय ? त्याप्रमाणे परमात्मा जगत् बनला व शेवटी सर्व जीव परमात्मा होत असतील; पण स्थिती काली तर जगत् दिसते ना ! याची काय वाट आहे, एवढेच सांगा. ज्ञानेश्वर महाराज दृष्टान्त देतात–

'अथवा भांगारचि अळंकारु।' सोनेच अलंकार झाले व शेवटी अलंकार आटले म्हणजे सोनेच होते. मध्य अलंकार रूपात असतानाही सोनेच आहे. सोन्यात काही बिघाड येत नाही.

नाग मुदी कंकण । त्रिलिंगीं भेदली खूण ।
घेतां तरी सुवर्ण । घेईजे कीं ॥ अमृ. ९।११

ज्ञा. म. नी या दृष्टान्ताने जगताचा आदी, अंत व मध्यस्थिती हे तिन्ही साधले. हे चित्रविचित्र अनंत प्रकारचे जग जरी आहे, तरी पण याच्या आदि मध्ये अंती एक परमात्माच भरलेला आहे.

जे ते विश्वाळंकाराचे विसुरे । जरी आहाती आनानें आकारें ।
तरी घडले एकेंचि भांगारें । परब्रह्में ॥ ज्ञा. ६।९८

जगतासंबंधाने महात्म्यांचा असाच अनुभव आहे.

ऐसा ज्याचा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥१॥ २१९३

परमात्म्याच्या व्यापक स्वरूपाला ज्यांनी जाणले, ते परमात्म्याला एक देशी परिच्छिन्न कधीच समजत नाहीत, पशुपक्षी, जीवजन्तु, वृक्ष, पाषाण वगैरे सर्व परमात्माच आहे. मग जीव परमात्म्याहून वेगळा कसा राहील ? जीव हा मूळचा ब्रह्मरूपच आहे. म्हणून सुखरूप आहे. कोणी म्हणेल हा बादरायणी संबंध कसा लावला ? जीव ब्रह्मरूप आहे म्हणून सुखरूप आहे, हे तुम्ही कशावरून समर्थन करता ? परमात्मा सुखरूप आहे.

सर्व सुखाचें आगर । बाप रखुमादेविवर ॥१॥ ज्ञा. अ. १

सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा ! माझ्या पांडुरंगासारिखें तें ॥ तु. २५८०

जगात जेवढी म्हणून सुखे आहेत, त्या सुखांच अंतर्भाव परमात्म-सुखात आहे. स्त्रीपासून होणारे सुख, मुलापासून होणारे सुख, इतर विषयापासून होणारी सुखे त्याचा परमात्मसुखात अंतर्भाव होतो. ज्यांनी परमात्मसुखाचा अनुभव घेतला, त्यांची या बाह्य विषयसुखाकडे धाव नसते. परमात्मा सुखरूप आहे, तो परम प्रेमास्पद आहे. सर्वांचा निरतिशय प्रेमाचा विषय आत्माच आहे. बाकी जे प्रेम दिसते आहे ते सर्व औपचारिक आहे. पुत्र मित्रापासून तो जीवात्म्यापर्यंत सर्व उपचारिक प्रेम आहे. पिता हा पुत्राच्या मित्रावर जे प्रेम करतो ते पुत्राच्या मित्रांकरता नसून केवळ स्वतःच्या पुत्राकरिता प्रेम करतो.

न वा रे पत्युः कामाय पतिः प्रियो भवति ।
आत्मनस्तु कामाय पतिः प्रियो भवति ॥
न वा रे जायायै कामाय जाया प्रिया भवति ।
आत्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति ॥
न वा रे पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया भवन्ति ।
आत्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवन्ति ॥
न वा रे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवति ।
आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ॥ बृ. उ. ४–५

तेवीं पुत्रापासोन सुखप्राप्ती । माता पिता होईल म्हणती ।
शेखीं पुत्र अंगोठा दाविती । केवळ भ्रांती पुत्रमोहो ॥ भा. ॥ ११।८२
तुका म्हणे सांगू किती । बाप लेकासी मारिती ॥ ४ ॥ ३०६९

कल्पना करा, मुलाचे व मागच्या कुटुंबाचे जमले नाही तर बाप मुलाला घराच्या बाहेर हाकून देतो. स्त्री अनुकूल असली तर नवरा प्रेम करतो. कर्कशा, भांडखोर अथवा व्यभिचारी असली तर प्रेम करीत नाही. याचप्रमाणे चोर उरावर येऊन बसले म्हणजे तिजोरीच्या किल्ल्या काढून देतो. सर्व द्रव्य घेऊन जा पण मला मारू नको असे म्हणतो. त्याचप्रमाणे शरीरावर जे प्रेम असते ते शरीराकरिता नसून जीवाकरता असते. एखाद्याचा पाय रोगाने कुजला, मरण्याचा प्रसंग आला म्हणजे तो म्हणतो, माझा पाय तोडा पण मला वाचवा. जीवावर जे प्रेम आहे ते जीवाकरता नसून आत्म्याकरता आहे. प्रसंगोपात माणसे जीव देताना दिसतात. येथे आत्मा म्हणजे जीवाचे अधिष्ठान चैतन्य, असा अर्थ. आत्म्यावर जे प्रेम आहे ते आत्म्याकरताच म्हणून ते निरुपचार प्रेम आहे.

तेथ प्रियाची परमसीमा । तो भेटे माउली आत्मा ॥ ज्ञा. १६।४४३
आणि निरुपचारा प्रेमा । विषय होय जें प्रियोत्तमा ।
तें दुजें नव्हे कीं आत्मा । ऐसेंचि जाणावें ॥ ज्ञा. १८।१३४६

आत्मा परमप्रेमास्पद आहे म्हणूनच सुखरूप आहे.

आनंद अद्वय नित्य निरामय । जे कां निजध्येय योगियांचें ॥ तु. ८२६
यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति भूमैव सुखं ॥ छा. उ. ७।२३।१

अर्थात जीव मूळचाच ब्रह्म आहे. या सर्व शास्त्रांच्या विचाराने जीव सुखरूप आहे असे ठरले; तेव्हा या शास्त्ररहस्याला तुकाराम महाराज जाणत होते. म्हणून ते म्हणतात–

तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥ तु. ३०२१
तुका म्हणे कैंची कींव । कोठें जीव निराळा ॥ तु. ४०५०
देवचि बरे देवचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ॥ तु. ३८७३

जीव हा परमात्मा होण्यास्तव सुखरूप आहे. मग तुकाराम महाराज देवाची का म्हणून प्रार्थना करतात ? माझ्या देहाचा विसर पाडा तरच

माझ्या जीवाला सुख मिळेल. महाराजांच्या वाक्यात केव्हाही विरोध नाही. सुखाला सुखरूप व्हावयाचे. मग जीव हा सुखी का दुःखी ? तर जीव हा सुखीही आहे व दुःखीही आहे. जरी जीव मूळचा सुखी असला तरी पण प्रस्तुत जीव दुःख भोगीत आहे. पदोपदी जीवाला दुःख होत आहे.

दुःख शोकांचां घाई । मारिलियाची मेचि नाही ।
हे सांगावया कारण काही । जे ग्रासिले माया ॥ ज्ञा. ७।१०७

रंकापासून तो राजापर्यंत सर्वच दुःख भोगतात.

राजाची राणी मेली तर त्याला सुख होईल काय ? पेढे वाटील काय ? कुटुंबाचे जर काही दुखावयास लागले तर नवरा घाबरा होतो. असो. जीव जे दुःख भोगतो ते केवळ देहतादात्म्यामुळे. म्हणून तु. म. ‘ देहाचा विसर पाडी मज ’ म्हणतात. आणि अशी अनेक प्रकारची दुःखे आहेत.

आणीक दुःखें सांगों मी किती । सकळ संसाराची स्थिती ।
न साहे पाषाण फुटती । भय कांप चित्तीं भरलासे ॥ ७०४

ते दुःख जर एखाद्या निर्जीव दगडाजवळ सांगू लागलो तर तो दुभंग होईल. संसारात अनेक दुःखे आहेत. नमुन्यादाखल चार दोन सांगतो.

एखाद्याची बायको मेली ; हे सुखका दुःख ? तो रडतो, त्याचे मित्र त्याची समजूत घालतात. बारावा झाला की तेराव्या दिवशीं, तो म्हणतो अशी बायको मिळेल का ? हे दुःखच. घरात चोरी होणे, घर फोडणे, व्यापारात नुकसान येणे वगैरे जन्मापासून मरेपर्यंत अशी अनेक दुःखे भोगावी लागतात. ही दुःखे जीवाच्या स्वरूपी नाहीत आणि भोगावी तर लागतात. कारण देहतादात्म्या-मुळे. जर दुःख हेच जीवाचे स्वरूप असते तर त्याची निवृत्ती झाली नसती आणि दुःखाच्या निवृत्तीकरता शास्त्रांनी सांगितलेली श्रवणादिक साधने व्यर्थ होतील. मूळापासूनच जीव दुःखी असता तर दुःखाची निवृत्ती करण्यात जीवाचीच निवृत्ती होईल.

निंबाचिया झाडा साकरेचें आळें । आपुलीं तीं फळें न संडीच ॥ तु. ३१०३
घुड बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥ तु. २२७२

कडू कारले तुपात तळले व साखरेत घोळले तरी गुलाब जांबूप्रमाणे गोड होणार नाही. कडू ते कडूच राहणार. कारण ज्याचा जो जन्मसिद्ध स्वभाव आहे, तो काही केल्या बदलत नाही.

गाढव शृंगारिलें कोडें । कांहीं केल्या नव्हे घोडें ॥ १ ॥
त्याचें भुंकणें न राहे । स्वभावासी करील काय ॥ १ ॥ तु. ३०५८

जित्याची खोड मेल्यावाचून जात नाही. स्वभावाला औषध नाहीं.

श्वान शिबिके बैसविले । भुंकता न राहे उगलें ॥ ३ ॥
तुका म्हणे स्वभाव कर्म । काही केल्या न सुटे धर्म ॥४॥ तु. ३०५८

कुत्र्याला पालखीत बसविले तरी त्याने दुसऱ्या कुत्र्याला पाहिले की गुरगुर करावयास लागते. याप्रमाणे जीवाचे दुःख हे स्वरूपच असेल तर त्याची निवृत्ती होणार नाही. वेदान्ताचा असा सिद्धान्त आहे की, साधन-चतुष्टयसंपन्न अधिकाऱ्यांस श्रीगुरूने तत्त्वमसी महावाक्याचा उपदेश केला की महावाक्यश्रवणाने दुःखाची निवृत्ती होते. सारांश, जीवाला दुःख होण्याचे कारण काय आहे, तर देहाचा अहंकार. देहाभिमानापासूनच जीवाला दुःख होते. यावरून देह हा दुःखरूप असला पाहिजे. देह हा दुःखाने व अनर्थाने भरला म्हणून किती सांगू ?

देहो तितुका षड्विकारी । कोटि अनर्थ एकेके विकारी ।
षडूर्मी लागल्या त्या भीतरी । जेवी अग्नीवरी घृतधारा ॥ भा. ३६६

जेवढे म्हणून देह आहेत, मग ते कोणाचे का असेना, देह म्हटला की त्याच्या ठिकाणी षड्विकार आहेत.

अस्ति जायते वर्धतेऽपि च ।
परिणामं क्षयं नाशं षड्भावविकृति विदुः ॥ वराह उ. १६३
मग क्लेशतरूची वाडी । जे तापत्रयाग्नीची सगडी ।
जे मृत्युकाकासि कुरोंडी । सांडिली आहे ॥ ज्ञा. ८।१४०
जे दैन्याचे दुभते । जे महाभयातें वाढविते ।
जे सकळ दुःखाचें पुरतें । भांडवल ॥ ज्ञा. ८।१४१

शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचे भांडार ।
शरीर दुर्गंधीची थार । नाही अपवित्र शरीरा ऐसे ।। तु. ७३९
आणिक रोगांचीं नांवें सांगो किती । अखंड असती जडोनियां ।।तु. ३१६६
शरीर विटाळांचें आळें । माया मोहपाश जाळें ।
पतन शरीराच्या मूळें । शरीर काळे व्यापिले ।।३।। तु. ७३९

मनुष्यापेक्षा जनावरांची शरीरे बरी आहेत. जनावरांची शरीरे निसर्गतःच शुद्ध असतात. त्यांना दात साफ करण्याकरता दंतमंजन लागत नाही. स्नानाला साबण लागत नाही. या दृष्टीने मनुष्याचे शरीर किती तरी घाण. नवही छिद्रांतून सारखी घाण वाहत असते.

गुदद्वारावाटे । मिष्टान्नाचा नरक लोटे ।। तु. ३०३३
नाना सुद्रव्यें गोमटीं । जालिया शरीरीं पैठीं ।
होऊनि ठाती किरीटी । मळूचि जेवीं ।। ज्ञा. १८।६७७

असे हे शरीर दुःखरूप व अनर्थमूलक आहे आणि जीवाने या शरीराचा अभिमान घेतल्यामुळे त्याला दुःख भोगावे लागते.

करितां घायाळाचा संग । अंगे अंगें गाखावे ।।२।। १८८०

जीवाला अनंत दुःखे भोगांवी लागतात. ती देहसंबंधामुळे. देहाची जेवढी म्हणून दुःखे आहेत, ती सर्व जीवाला भोगावी लागतात. ब्रह्मरूप जो जीव त्यांनी देहतादात्म्य घेतल्यामुळे त्याला दुःखे भोगावी लागतात. वास्तविक परमार्थदृष्टया जर विचार केला तर देहाचा व जीवाचा काही अर्थार्थी संबंध नाही.

कोणाचा कोणासी न धरे संबंध । आहे शुद्धबुद्ध ठायींचे ठायीं ।।
तु. ३८६३

तया देहा म्हणती भेटी । हे सपायी निर्जिव गोठी ।
वारिया वाळूवे गाठी । केंही आहे ।। ज्ञा. १३।१०९७

दुःखरूप देह व सुखरूप जीव यांचा परमार्थदृष्टया काही एक संबंध नाही. मग तुकाराम महाराज देहाचा विसर पाडा कसे म्हणतात ?

परमार्थ दृष्टीने देहाचा व जीवाचा काही संबंध नाही; पण जीवाने संबंध लावून घेतला. कसा लावून घेतला याची कल्पना करता यावी म्हणून एक दृष्टान्त सांगतो. एकाला गादीवर निजण्याची संवय व एकाला घोड्यावर बसण्याचे व्यसन होते. दोघे प्रवासास निघाले. एकाच गावी दोघे एकाच वेळी येत असताना लोकांनी पाहिले व लोकांनी तर्काने त्यांचा संबंध नसताना लावला, की जो घोड्यावर बसला आहे तो मालक असावा व गादी घेऊन त्याच्याबरोबर असलेला त्यांचा नोकर असावा. त्या दोघांनी एका धर्मशाळेत मुक्काम केला. ज्याला गादीची संवय होती. त्याने गादी टाकून तो बसला व घोड्यावर बसणारा घोड्याला दाणा, चारा, खरारा करीत होता. दुसऱ्या लोकांनी पुन्हा त्यांचा संबंध लावला की– गादीवर बसलेला मालक असावा व घोड्याला दाणा, चारा, खरारा करणारा नोकर असावा. त्याप्रमाणे जीवाचा व देहाचा अर्थार्थी संबंध नाही. पण जीवाने स्वतः संबंध लावून घेतला. भ्रांतीला जीव वश होऊन देहाशी संबंध केला.

सुखें होतों कोठें घेतली सुती । बांधविला गळा आपुले हातीं ॥तु २१५७

मी सुखात होतो, आनंदात होतो. पण बळेच संबंध लावून घेतला. हीच गोष्ट तु. म. एका रूपकाने पुन्हा सांगतात.

मोकळी गुंते रिती कुंथे नाही भार दावें ।
धेडवाडा बैसली खोडा घेतली आपुल्या भावें ॥ १ ॥
आइका बाई लाज नाही आणिका ॥ तु. २९६

जीव हा नित्यतृप्त व नित्यमुक्त आहे.

जो सर्वदा नित्यतृप्तु । अंतःकरणभरितु । ज्ञा. २२।२१२
अर्जुना हा नित्यु । अचळु हा शाश्वतु ।
सर्वत्र सदोदितु । परिपूर्ण हा ॥ ज्ञा. २।१४७
पण, मुक्त होता परि बळें झालों बद्ध । घेउनियां छंद माझें माझें ॥
तु. ३८४२

या सर्व प्रमाणांनी हेच सिद्ध करावयाचे आहे. केवळ भावनेने, कल्पनेने जीव देहादिकाचे ठिकाणी अडकला गेला आहे, हे सर्व जीव दाव्यावाचून [illegible]

जैसो ते शुकाचेनि आंगभारें । नलिका भोविन्नली एरी मोहरे ।
तरी तेणें उडावें परि न पुरे । मन शंकीं ।। ज्ञा. ६।७६
शुकें नलिकेशीं गांवियेले पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ।। तु.३०५२
शिकविले तैसा पढों जाणे पूंसा । कैंची साच दशा तैसी अंगी ।। तु. २१५५

ऐसा काजेंवीण आंतुडला । तो सांग पा काय आणिकें बांधला ।
मग नोमंडी जऱ्ही नेला । तोडूनि अर्धा ।। ज्ञा. ६।७९
पाहें पां बंधभावना दृढा । नलियेवरी तो बापुडा ।
काय मोकळेयाही चवडा । न ठकेचि पूंसा ।। ज्ञा. १८।३९३

त्याप्रमाणे जीवात्मा मुक्त होता परि बळे झाला बद्ध ।। ही मूर्ख राघूची गोष्ट सांगितली. काही पढीक राघू असतात. पढीक राघूला जसे शिकविले तसे तो बोलतो. पण त्याला त्याचा अर्थ कळत नाही.

जातीचें तें चडे प्रेम । पक्षी स्मरे राम राम । तु. २८६२

एखाद्यानें कावळ्याला म्हटले की– बोल राधाकृष्ण तर तो काँ काँ करील. भगवान शंकराचार्यांचे वेळी मंडनमिश्राचे आश्रमात राघू शास्त्रांची चर्चा करीत, असा इतिहास आहे. जेथे राघू शास्त्रचर्चा करतात ते घर मंडनमिश्रांचे समजा.

स्वतःप्रमाणं परतःप्रमाणं कीरांगना यत्र गिरं गिरंति ।
द्वारस्थ नीडांतरसंनिरुद्धा जानीहि तन्मंडणपंडितौकः ।। १ ।।

एकाने राघूला शिकवले की– राधोबा, पिंजाऱ्यातून उडून जाऊ नये, कदाचित उडून गेलास तर नळीका यंत्रावर बसू नये; कदाचित बसलास, तर उडून जावे, कोणी बांधले नाही, असे शिकविले. एके दिवशी राघू पिंजऱ्यातून उडाला व नलिका यंत्रावर जाऊन बसला व शिकलेले म्हणू लागला.

पण उपयोग काय ?

शुकनलिकान्यायें जीव हा मुक्त (मोकळा) असताना जीवाने आपण होऊन शरीराशी संबंध केला. ब्रह्मरूप असणारा जीव जेव्हा आपल्या

ब्रह्मरूपतेला विसरतो म्हणजेच अज्ञानाला वश होतो, तेव्हा जीवात्मा देहाशी संबंध करतो.

तैं अज्ञान एक रुढें । तेणें कोऽहं विकल्पांचें मांडे ।
मग विवरूनि कीजे फुडें । देही मी ऐसें ।। ज्ञा. १५।३४२

जीवाने आपल्या ब्रह्मरूपतेला विसरणे हेच आहे अज्ञान.

आपला आपणपेयां । विसरू जो धनंजया ।
तेंचि रूप यया । अज्ञानासी ।। ज्ञा. १४।७१

ब्रह्म स्वयें आपण आहाती । शेखीं ब्रह्म म्हणतां बिहिती ।
बाप विकल्पनेची ख्याती । संशयें जाती अधःपाता । हस्ता. २९७.

देवचि बरे देवचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ।। तु. ३८७३

महात्मे असे मोठ्या कंठरवाने सांगतात; पण शरीराचा अभिमान कुठे सुटतो ? जगात खरे बोलणारी माणसे फार थोडी. बाकी सर्व खोटे बोलतात. काही लोक भत्त्याच्या (पैशाच्या) आशेने कोर्टात शपथ घेऊन खोटे बोलतात.

लटिकी ग्वाही सभेआंत । देतां पतित आगळा ।। १ ।। २८६६ तु. म.

एखाद्या गरीबाचे लग्न होत असले तरी खोटे बोलू नये. तो मुलगा गरीब असतो, त्याला घरदार काहीच नसते. खुंटीवरच्या कावळ्याप्रमाणे असतो पण खोटे सांगून, त्या मुलीच्या बापाला फसवून लग्न जमवतात.

जाईल पतना यासि संदेह नाहीं । साक्ष आहे कांहीं सांगतों ते ।। तु. ३६०२
वदविले मुखे नारायण धर्मा । अंगुष्ठ त्या कर्मासाठीं गेला ।। तु. ३६०२

धर्मराज खोटे बोलले परंतु सोळा आणे खोटे बोलले नाहीत. भगवंताच्या भिडेला बळी पडून " नरो वा कुंजरो वा " एवढेच बोलले; पण—

अंगुष्ठ त्या कर्मासाठी गेला. असो. जीव हा स्वतः परमात्मा असताना देहच मी म्हणतो. हे खोटे बोलणे आहे. कोणी विचारले की— तू कोण तर " ब्रह्म मी " असे उत्तर दिले पाहिजे. हे खरे बोलणे आहे. ब्रह्मानुभव नसला तरी खरे बोलण्याचे श्रेय मिळेल. असो जीव आपल्या मूळ स्वरूपाला विसरला म्हणजे त्याला जीव हे नाव प्राप्त होते.

जया विसराच्या देशीं । प्रसिद्धि गा जीवु ऐसी ।
जेणें भाष केली देहेंसी । आघवा विषयीं ।। ज्ञा. १६।३२५

एक श्रीमंत गृहस्थ, कुलवान घराण्यात जन्माला आलेला

नवियें आवडीचेनि भरें । कामुक निजवनिता विसरे ।
मग पाडेंवीण अनुसरे । भ्रमला जैसा ।। ज्ञा. ११।१८७

तो वेश्येसी प्रेमाने लाड कोड करीत असे. तिला म्हणे 'अग माझे बायले, आणि सर्व तुला वाहिले.' तू प्राणापेक्षा मला आवडते. तुझ्यावाचून एक क्षण गोड वाटत नाही. ती वेश्या मनात म्हणते की– देव, ब्राह्मण, अग्नी यांच्या-समोर शपथविधी होऊन जिचे पाणिग्रहण केले, तिला सोडून माझ्याकडे कुत्र्यासारखा येऊन पडतो. तो मला विसरणार नाही, हे कितपत खरे ? ती त्याला म्हणाली, एक चिटकोर लिहून द्या. मग तो भ्रमिष्ट जसा त्या वेश्येला वश होऊन आपली सर्व इस्टेट तिच्या नावावर करून देतो.

त्याप्रमाणे जीव हा मूळचा ब्रह्म असून, त्या ब्रह्मरूपतेला विसरून, विजातीय दुःखरूप शरीर त्याच्याशी संबंध करतो.

उपजोनि संसारीं आपला आपण वैरी । मी माझें शरीरीं घेऊनि ठेला । या देहातें म्हणे मी पुत्र दारा धन माझें । परि काळाचें हें खाजें ऐसें नेणतु गेला ।। ज्ञा. ५१८

दुसरा कोणी कोणाचा घात करीत नाही. आपणच आपला घात करतो.

बंधुरात्माऽऽत्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ।। गी० ६।६
माझा मीच झालों शत्रु । कैंचे पुत्र दारा कैंचे मित्रु ।।
कासया घातला पसरु । अहो जगद्गुरु तुका म्हणे ।। तु. ६९५
आप आपण्या घातकर । शत्रु झालों मी दावेदार ।
तूं तंव कृपेचा सागर । उतरीं पार तुका म्हणे ।। तु. ६९२
एर्‍हवीं कोशकीटकाचिया परी । तो आपणपया आपण वैरी ।
जो आत्मबुद्धि शरीरीं । चारुस्थळीं ।। ज्ञा. ६।७२

निगणेया आणि प्रवेशा। चित्त नेदीतु आवेशा।
कोशकिटु जैसा। जाजिन्नला पैं ॥ १६।२८२
कोसलियानें घर सुदृढ पैं केले। निर्गमु न विचारितां
तेणें सुख मानियेलें। जालें रे तुज तैसें यातायाति भोगविले।
मोक्षद्वार चुकलासी। दृढ कर्म जोडलें ॥ ज्ञा. ६२१
या देहातें म्हणे मी। पुत्र दारा धन माझे ॥ ज्ञा. ५२८
हा जनकु हे माता। हा मी गौर हीन पुरता।
पुत्र वित्त कांता। माझे हे ना ॥ ज्ञा. १५।४९२

याप्रमाणें जीवाने अभिमान घेतल्यावर जीवाला सर्व दुःखे भोगावी लागतात.

देहाचा संबंध दुःखाला कारण आहे. संबंधच दुःख देतो. लग्नापूर्वी संबंध नसतो म्हणून स्त्रीपुरुषांना एकमेकांचे एकमेकांना दुःख होत नाही. पण लग्न लागले, संबंध झाला का– त्या पत्नीची काळजी नवऱ्याला करावी लागते.

आपणचि विजनि दुहिता। कीं न मम म्हणे पिता।
तो सुटे कीं प्रतिग्रहिता। जांवाई शिरके ॥ ज्ञा. १८।२३४

बायकोचे डोके दुखायला लागले की– याचे दुखायला लागते. त्याप्रमाणे देहाचा संबंध केला की देहाला आलेले दुःख आपले माथी मारून घेतो. वास्तविक हा जीवात्मा देहाचा द्रष्टा आहे. माझा पण देह असे म्हणतो. माझा देह म्हणण्यात हा देहाहून भिन्न, देहाचा स्वामी (मालक) समजायला पाहिजे. पण तोंडाने जरी माझा देह म्हणतो पण आत समजूत मीच ' देह ' अशी असते आणि या देहतादात्म्यात आहे.

ऐक राया नवल परी। आपुला संकल्प आपणा वैरी।
देहबुद्धि वाढवूनि शरीरीं। अति दृढ करी भवभय ॥ भा. २६८
जे देहचि आपणपें मानिती। आणि विषयांतें भोग्य म्हणती।
यापरतें न स्मरती। आणिक कांहीं ॥ ज्ञा. ३।१२७

देह बुद्धीचिया नरा । थोर चिंतेचा अडदरा ।
संकल्प विकल्पांचा मारा । ममता द्वारा अनिवार । भा. २।२८०

चिंतामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ।। गी. १६।११

मरण येईपर्यंत चिंता तोडीत नाही.

कथा पुराण ऐकतां । झोपें नाथिलें तत्त्वता ।
खाटेवरि पडतां । व्यापी चिंता तळमळ ।। तु. ३०६४

पाताळाहूनि निम्न । जियेचिये उंचिये सानें गगन ।
जें पाहतां त्रिभुवन । अणुही नोहे ।। १६।३३१

तैसी चिंता अपार । वाढविती निरंतर ।
जीवीं सूनि असार । विषयादिक ।। ज्ञा. १६।३३३

अहो मे पितरौ वृद्धौ भार्या बालात्मजाऽऽत्मजाः ।
अनाथा मामृते दीनाः कथं जीवंति दुःखिताः ।। भा. १३।५७

आणि ही देहबुद्धी जेथे असते, तथेच पाप येते.

मी देहीं म्हणतां ब्रह्महत्त्या कोटी । येऊनियां पाठीं थापटिती ।। ज्ञा.९४६

जया देहसंबंधाआंतु । प्रतिपदीं आत्मघातु ।
भुंजतां उसंतु । कहीच नाहीं ।। ज्ञा. १८।१२७६

कोटि ब्रह्महत्त्या गोहत्त्यांसी । प्रायश्चित आहे शास्त्रार्थेंसी ।
परी आत्महत्त्या घडे ज्यासी । प्रायश्चित त्यासी असेना ।। भा.२०।१९०

यातून सुटण्याचा एकच मार्ग. "कारणें केला त्याग देहबुद्धि ।।" एवढ्याकरतां देहाचे स्मरणच सर्व दुःखाला कारण. म्हणून महाराज देवाकडे प्रार्थना करतात कीं– "देहाचा विसर पाडी मज ।।"

यावर एक आक्षेप :– देहाचा विसर पडण्याकरिता भगवंताची प्रार्थना कशाला करावयास पाहिजे ? मद्यपान केल्यावर देहाचा विसर पडतो. दारू पिऊन बेशुद्ध होऊन पडतात.

प्रत्यक्ष पाहे पां वीरा । जो सावध घे मंदिरा ।
तो होऊनि ठाके माजिरा । तियेचि क्षणीं ।। ज्ञा. १०।११३

देवा आता करी उपकार

एक मनुष्य दारू पिऊन ' लास ' होऊन रस्त्यात पडला होता. त्याच मार्गाने हुजुरांची स्वारी चालली असता तो उठला आणि राजाला विचारू लागला–" ऐ हत्तीपर बैठनेवाले हत्ती और अंबारीकी किंमत क्या ?" राजाने प्रधानाला सांगितले, तो काय म्हणतो ते पाहा. प्रधानाने त्याला जेलमध्ये पाठवले. त्याला हुजुरांच्या समोर दरबारात हजर करण्यात आले. प्रधानांनी त्याला विचारले की, तू " हत्ती और अंबेरीका क्या किंमत " विचारीत होता. सांगू का ? तर तो म्हणाला, हुजूर, लेनेवाली तो चली गयी। दारू प्यायल्याने मनुष्य देहाला विसरतो.

तुका म्हणे मद्य सांडवी लंगोटी सांगितला शेटीं विचार त्या ।। तु.२८०२

याचप्रमाणे डॉक्टरकडून क्लोरोफॉर्म घेतला असता देहाचा विसर पडतो. मग त्याच्या शरीराचे तुकडे केले, तरी त्याला खबर पडत नाही.

भुललियासी नाही देहाचा आठव । धोतऱ्याने भाव पालटिला असे ।।
तु. ३१६८

देहाचा विसर पडण्याचे पुष्कळसे मादक पदार्थ आहेत. तसाच झोपेतही देहाचा विसर पडतो.

पैं निद्रिताचेनि आंगेंशी । सापु तैंशी उर्वशी ।
तेवीं स्वरूपस्था सरिसीं । देहीं द्वद्वें ।। ज्ञा. १४।३५६

देहाचा विसर पडण्याला पुष्कळसे उपाय आहेत. मग तु. म.. भगवंताची प्रार्थना कशाकरता करतात ?

' देहाचा विसर पाडी मज ' या आक्षेपाचे समाधान असे आहे. दारू पिऊन, अफू खाऊन, अथवा झोपेत जो देहाचा विसर पडतो, त्याला निःशेष विसर म्हणता येणार नाही. कारण त्या त्या पदार्थाचा अम्मल उतरला की मनुष्य देहस्मृतीवर येतो किंवा झोपेतून जागा झाला कीं शुद्धीवर येतो. मग विसर म्हणजे काय ? तर भ्रांतीला वश होऊन अनादिकालापासून आपल्या ब्रह्मरूपतेला विसरून देहासी तादात्म्य केले म्हणजेच देहाचा अभिमान घेतला. म्हणजे विसर पडतो. तो अभिमान घालवादयाचा हीच गोष्ट

——— सांगतात :–

ज्या देहाचेनि मद्‌भजने । माझें शुद्ध स्वरूप पावणें ।
त्या देहासि विसरिजे तेणें । मी माझेपणे देखेना ।। २ ।। १३।५८९

प्रत्येकाच्या ठिकाणी देहाचा अभिमान दोन प्रकारांनी स्फुरतो. कधी कधी जीव देह " माझा " म्हणतो व कधी कधी देहच मी म्हणतो. असा दोन प्रकारानें स्फुरणारा अभिमान नष्ट होणे म्हणजेच देहाचा विसर पडणे. भगवान म्हणतात, भक्तजन ज्या देहांत भगवद्‌भजनानें माझ्या निर्गुण अशा स्वरूपाला पावलेले आहेत, त्यांना देहाचे भान राहात नाही. म्हणजेच देहाला विसरतात. परमात्म्याच्या सगुण उपासनेनेच त्याच्या निर्गुण स्वरूपाचा प्राप्ती होते.

निर्गुणी पावले सगुणी भजतां । विकल्प धरिता जिव्हा झडे ।।
एको० ११३१

अवघ्या दशा येणेंचि साधती । मुख्य उपासना सगुण भक्ति ।
प्रगटे हृदयींची मूर्ति । भाव शुद्धी जाणोनिया ।। तु. ७२०

सगुण परमात्मा कोठे बाहेर नाही. आपल्या हृदयांतच आहे.

तैसा हृदयामध्ये मी रामु । असतां सर्व सुखाचा आरामु ।

माझ्या सगुण भक्तीनें अंतःकरण शुद्ध होऊन निर्गुण स्वरूप अनुभवास येते.

ऐसें निर्मळ झालिया चित्त । ब्रह्म प्रकाशे सदोदित । भा. १०।२३६

भक्तांना निर्गुण स्वरूपाचा साक्षात्कार झाला म्हणजे ज्या देहानें भगवंताचे भजन केले, भक्ती केली त्या देहाला ते साफ विसरतात. देह ' मी ' अथवा ' माझा ' देह असे त्याच्या वृत्तीवरच येत नाही.

आठव नाठव गेले भावाभाव । झाला स्वयमेव पांडुरंग ।। तु. ४०३८

अशा रीतीने भक्त देहाला विसरतात.

तैसिया योगिश्वराचिया मतीं । मिळणीसवें एकवटती ।
परी जे विचारुनि पुनरावृत्ति । भजतीचिना ।। ज्ञा. २।१७६

तुका म्हणे नव्हे परतो । तुझ्या दर्शने मागुती ॥ तु. ३८०२
तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय ॥तु.४०१६
पैं सरितेचनि ओघें । सिंधुजळा मीनले घोघें ।
ते काय वर्तत आहे मागें । म्हणोनि पाहों येती ॥ ज्ञा. ८।८४

तसाच जीवात्मा परमात्म्यासी समरस झाल्यावर, परत देहतादात्म्यावर येतच नाही.

नातरी साखरेचा माघौता । बुद्धिमंतपणेंही करितां ।
परि उस नव्हे पंडुसुता । जियापरि ॥ ज्ञा. ८।२००
म्हणोनि तूप होऊन माघौतें । जेवीं दुधपणा नयेचि निरुतें ।
तेंचि पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥ ज्ञा. ८।२०२
सेवावया स्वानंद नव्हाळी । प्रथम उसांचीं पाने सोली ।
मग ऊंस तोहि वळें पिळी । तोही रस आली ॥
ते सर्करा लाभे ॥ ज्ञा. २८।२२२
कां खैर चंदना काष्टे । हे विवंचना तंवचि घटे ।
जंव न घापती एकवटें । अग्नीमाजीं ॥ ज्ञा. १।४५९
अग्निमाजी गेलें । अग्नि होऊन तेच ठेलें ॥ १ ॥ तु. २१८९
तेवि पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥ ८।२०२
तैसें माझा साक्षात्कारीं । सरे अहंकाराची वारी ।
अहंकार लोपीं अवधारीं । द्वैत जाय ॥ ज्ञा. ११।६९४

असा परमात्म्याचा अनुभव आला म्हणजे भक्तजन कसे देहाला साफ विसरतात हीण गोष्ट नाथ महाराज दृष्टान्ताने सांगतात.

जेवी कां भाडियाचें घोडें । जेणें आणिलें निजधामा रोकडें ।
तें आहे कीं गेलें कोणीकडे । हें स्मरेना पुढें तो जैसा ॥ भा.१३।५९०
हो कां भेटावया भ्रतारासी । सवें मजूर आणि विश्वासी ।
ते पतिसि पहुडल्या राणिवेसीं । त्या मजुरासी विसरली ॥
भा. १३।५९१

का जो दैवयोगें पालखी चढे । तो पूर्वीला तुटके मोचडे ।
आंहेत कीं गेले कोणीकडे । हें स्मरेना पुढें तो जैसा ।। भा. १३।५९२
हो का बहुकाळें पत्नी जैसी । भर्तारू मील्या निजसेजेसी ।
निःशेष बिसरे लाजेसी । देहाची तैशी दशा जाहली ।। भा. १३।५९३
त्या दांपत्याचे सुख भेटी । पारिखे देखतां लाज उठी ।
तेवीं देहाचें भान द्वैत दृष्टीं । मदैक्यपुष्टीं देह कैचें ।। भा. १३।५९४

जीवाला परमात्मस्वरूपाचा अनुभव आल्यावर तो देहाचे तादात्म्य कशाला घेईल ?

परंतु शंका अशी की, योग, याग, जप, तप, तीर्थाटन वगैरे पुष्कळ साधने आहेत. त्यांपैकी एखादे साधन केले की देहाभिमान जाईल त्याचे समाधान. जपतपादि साधनांनी देहाभिमान तर जात नाहीच; पण उलट त्या साधनांच्या योगाने साधन अभिमान उत्पन्न होतो.

तप करूनि तीर्थाटन । वाढविला अभिमान ।। ४ ।। २९२२
तीर्थाटणे एकें तपें हुंबरती । नायिले धरिती अभिमान ।। २२१७
वांटिले तें धन । केली अहंता जतन ।। २९२२
ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ।। १५५०
आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । योगी करती रागें गुरगुरु ।।
तु. १५५०

जे जें करावें साधन । साधनीं रिघे साधनाभिमान ।
धांवणें नागवी संपूर्ण । साधनीं विघ्न होय तैसें ।। भा. १३।४४०

त्या साधनांची गोष्ट सोडा, परंतु ब्रह्मज्ञानाचा अभिमान होतो आणि ब्रह्मज्ञानानेही अभिमान जात नाही.

ज्ञानियांचे घरी चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ।। तु.१५५०

महाराज म्हणतात, मी ज्ञानवानाकडे (ज्ञानाकडे) देव पहावयास गेलो, परंतु तेथे मूर्खापेक्षां अभिमानच जास्त दिसून आला. ज्ञान्याच्या मागे अभिमान तर हात धुऊन लागतो.

नवल अहंकाराची गोठी । विशेषें न लगे अज्ञाना पाठीं ।
सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ।। ज्ञा. १३।८२

मेलेल्या उंदराकडे मांजर धावत नाही; पळणाऱ्या उंदराकडे धावते. म्हणून ज्याला देहाभिमान घालवावयाचा असेल त्याने सगुण परमात्म्याची सेवा, भक्ती केली पाहिजे. कारण सगुण परमात्म्याचा विग्रह शुद्ध सत्वात्मक मायेचा परिणाम आहे. म्हणून परमात्मा निरभिमान आहे व सर्वज्ञ आहे आणि जीवाची उपाधि मलीन अविद्या होण्यास्तव त्यावर आवरण करणे तिचा स्वभाव आहे. म्हणून जीवाच्या ज्ञानाला ती आवरण घालते. परमात्म्याचे शरीर शुद्ध मायेचा परिणाम आहे. म्हणून त्याच्या ठिकाणी

भगवद्देह चैतन्यघन । तेथें वसेना देहाभिमान ।
यालागीं करितां त्याचें भजन । अज्ञान जन उद्धरती ।।
चतुःश्लो. भा. ४५

माया आवरण घालीत नाही, अविद्या आवरण घालते. म्हणून जीव आपल्या व्यापक स्वरूपाला जाणत नाही.

ईश्वर आपल्या व्यापक स्वरूपाला जाणत नाही.

जी आपणपयातें तूंचि जाणसीं । आणिकातें सांगावयाही तूं–समर्थ होसी । तरा आता एकवेळ धाम पुसीं । आर्तीचिये–निडळींचा ।। ज्ञा.१०।१८०

कंदिलातील काच प्रकाशावर आवरण घालत नाही. माती आवरण घालते. म्हणून ईश्वर आपल्या स्वरूपाला जाणतो. भगवंताने अर्जुनाला गीतेच्या चौथ्या अध्यायात सांगितले की,

अर्जुना, माझे व तुझे अनेक जन्म होऊन गेलेले आहेत.

बहुतां काळींचा । आणि तू तव कृष्ण सांपेचा ।। ज्ञा. ४।३८
तरी तू गा हें नेणसी । पैं जन्मे आम्हां तुम्हांसी ।
बहुतें गेलीं परी तियें न स्मरसी । आपुलीं तूं ।। ज्ञा. ४।४२
मीं जेणें जेणें अवसरें । जें जें होऊनि अवतरे ।
तें समस्तही स्मरे । धनुर्धरा ।। ज्ञा. ४।४३

मी सर्व जाणतो व तू जाणत नाहीस. तू जीव अविद्या उपाधीने युक्त आहेस. असे परमात्म्याचे शरीर शुद्ध सत्त्वात्मक मायेचा परिणाम म्हणून त्याच्या ठिकाणी अभिमान नाही.

तुका म्हणे अभिमान । नारायणा न सोसे ।। तु. २८००
तिळमात्र जरी होय अभिमान । मेरू तो समान भार देवा ।। तु.१५
अभिमान नाहीं तुका म्हणे त्यासी । नेदि आणिकांसी धरू देव ।।
तु. १०२

भगवान् कृष्णाचे हातात आयुधे आहेत. ती कशाकरता ?

चक्र घेऊनी भक्ताचे ठायीं । म्हणसी तुझे कार्य कायी ।
मज जगीं वैरीया नाहीं ; भक्त द्वेषी पाहीं निजशस्त्रें नाशी ।।
भा. २१५३८

चक्रें अभिमान करी चेंदा । मोह ममता छेदी गदा ।
शंखें उद्बोधी निजबोधा । निजकमळें सदा निजभक्त पूजी ।।
भा. २१५३९

अन्य कोणत्याही उपायाने अभिमान गलित होत नाही. उलट जास्त वाढतो. म्हणून अभिमान जाण्याकरिता भगवंताची प्रार्थना करावयास पाहिजे. याच अभिप्रायाने तुकाराम महाराज देवाजवळ प्रार्थना करतात.

'देवा आता ऐसा करी उपकार । देहाचा विसर पाडी मज ।।'

(।। जय विठ्ठल, जय विठ्ठल ।।)

# मृत्युलोकी आम्हा

मृत्युलोकी आम्हां आवडती परी
नाहीं एका हरिनामेंविण ।। १ ।।
विटलें हें चित्त प्रपंचापासूनि ।
वमन तें मनी बैसलेंसे ।। २ ।।
सोनें रूपें आम्हा मृत्तिकेसमान ।
माणिक पाषाण खडे जैसे ।। ३ ।।
तुका म्हणे तैशा दिसतील नारी ।
रिसाचियापरि आम्हां पुढें ।। ४ ।।

**भूमिका** :– या अभंगातील तुकाराम महाराजांचे उद्गार कोणत्या भूमिकेवरचे असावेत याची कल्पना येण्याकरिता भूमिकेचा विचार सांगतो. या अभंगाच्या चारी कडव्यांचा विचार केला तर अभंगाची भूमिका कळून येईल. या सगळ्या अभंगातून तु. म. केवळ वैराग्य सांगतात. वैराग्याच्या भूमिकेवरचे महाराजांचे हे उद्गार आहेत. वैराग्याचे जिहासा, जिज्ञासा असे निरनिराळे प्रकार आहेत. दोषदृष्टीने उत्पन्न झालेल्या क्षणिक वैराग्याच्या भूमिकेवरचे उद्गार नाहीत. ते वैराग्य टिकत नाही. ज्यांच्या संबंधाने दोष-दृष्टि उत्पन्न झाली, पण पुढे त्याच्या संबंधाने गुणदृष्टी उत्पन्न झाली तर ते वैराग्य संपते.

स्त्रीचे प्रसूतिकाली पोट दुःखू लागले, म्हणजे वेदना होऊं लागल्या त्या वेळी ती म्हणते–

निजतां आला मोहो । वीता मेला गोहो ।। ५ ।। तु. ।। ३०३८

मग संपले का ? नाही दुसऱ्या प्रसूतीची तयारी. यालाच जिहासा वैराग्य म्हणतात.

जे विचाराने अथवा ईशप्रसादाने वैराग्य उत्पन्न होते त्याला जिज्ञासा वैराग्य म्हणतात हे खरे वेराग्य आहे.

उठिलेनि वैराग्यें जेणें । हा त्रिवर्ग ऐसा सांडणें ।
जैसें वमुनियां सुणें । आतांचि गेलें ॥ ज्ञा. १५।२५६

साधकाच्या अंतःकरणात वैराग्याने डोके बाहेर काढल्याबरोबर तिन्ही लोकांतले ऐश्वर्य कुत्र्याच्या ताज्या वांतीप्रमाणे वाटले पाहिजे. सुकलेली वांती नव्हे; ज्या वांतीतून वाफा निघतात. अशी वांती कोणाला घ्यावी वाटेल काय ? वांतीची गोष्ट सोडा, पण दूर कुत्रे ओकू लागले, ओकले नाही, असे ऐकल्याबरोबर अंगावर शहारे उभे राहतात.

असले कडकडीत वैराग्य साधकाच्या अंतःकरणात केव्हा उत्पन्न होते ? एक प्रपंचाच्या मिथ्यापणाच्या विचाराने अथवा ईशप्रसादाने.

आतां निरक्तीची कवण परी । जे येऊनि मनातें वरी ॥ ज्ञा. १५।३७

जे विषे रांधिली रससोये । जैं जेवणारा ठाउवी होये ।
तैं तो ताटचि सांडूनि जाये । जयापरी ॥ ३८ ॥ ज्ञा. १५।३८

असे वैराग्य केव्हा उत्पन्न होते ? ज्ञा. म. दृष्टान्ताने सांगतात— जेवणाराला विषयुक्त अन्नाचे ज्ञान झाल्यानंतर जसा त्या अन्नाचा त्याग करून तो निघून जातो, त्याप्रमाणे.

तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता ।
तैं वैराग्य दवडितां । पाठीं लागे ॥ ज्ञा० १५।३९

त्याप्रमाणे सत्संगतीने प्रपंचाच्या अनित्यत्वाचे ज्ञान झाल्यानंतर वैराग्य उत्पन्न होते. दुसरे ईशप्रसादाने. परंतु ईश्वर प्रसाद केव्हा करतो ?

तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मसुमांची वीरा ।
पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥ ज्ञा० १८।९१७

साधक ज्या वर्णात, ज्या आश्रमात असेल त्या वर्णाश्रमाला जे विहित कर्म सांगितले असेल, त्या स्वकर्मरूपी फुलांची पूजा केली असता, ती पूजा त्या सर्वात्मक ईश्वराच्या अपार संतोषाला कारणीभूत होते.

म्हणौनि तियें पुजे । रिझलेनि आत्मराजें ।
वैराग्यसिद्धि देईजें । पसाय तया ।। ज्ञा. १८।९१८

असे ईशप्रसादाने उत्पन्न झालेले वैराग्य असते.

जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशें ।
हें सर्वही नावडे जैसें । वांत होय ।। ज्ञा. १८।९१९

अशा ईशप्रसादाने वैराग्याच्या भूमिकेवर येऊनच, महाराज म्हणतात की :

मृत्यूलोकीं आम्हां आवडती परी । नाहीं एका हरिनामेंविण ।। १ ।।

महाराज म्हणतात– या अखिल मृत्युलोकामध्ये आम्हाला भगवंताच्या नामावाचून कोणताही प्रकार आवडत नाही. आवडत असेल तर– भगवंताचे नाम.

ज्ञानदेवा गोडी हरिनामाची जोडी । रामकृष्णीं आवडी सर्वकाळ ।।२।।
ज्ञा. ९८

त्याच अभंगाच्या दूसऱ्या कडव्यात म्हटले आहे की–

विटलें हें चित्त प्रपंचापासूनि । वमन तें मनीं बैसलेंसें ।। २ ।।

प्रपंचापासून माझे इतके चित्त विटले कीं, हा संसार माझ्या मनाला वांतीसारखा वाटू लागला. नको हा संसार अशी किळस आली.

सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आता कोण भाव निवडुं एक ।।१।।
तु. २२९५

संसाराची मज न साहेचि वार्ता । आणीक म्हणतां माझे कोणी ।।२।।
तु. २९९५

भोजनस मयीं ओकाचा आठव । ठकोनिया जीव कष्टी करी ।। ३ ।।
तु. ३१३०

भोजन करीत असलेल्या मनुष्यासमोर वांतीची कथा सांगू लागला, तर जेवणाऱ्याला ऐकावीशी वाटणार नाही.

सोनें रुपें आम्हां मृत्तिकेसमान । माणिक पाषाण खडे जैसे ।। ३ ।।

वांतीसारखा प्रपंच मनात बसला : स्त्री, द्रव्य, गाई, म्हशी, घर, दार, पुत्र, द्रव्य या सर्वांचा अंतर्भाव संसारात होतो. संसारात जीवाला मोहून टाकणारे, पागल करणारे हजारो पदार्थ आहेत, पण त्यातल्या त्यात स्त्री व धन हे दोन मोठे आहेत.

स्त्रिया धन हें बा खोटें । नागवले मोठे मोठे ।। १ ।।
म्हणोनि सांडा दोनी ! सुख पावाल निदानीं ।। २ ।।
सर्व दुःखासी कारण । हीच दोन्हींच प्रमाण ।। ३ ।। तु. ४३११

सगळा प्रपंच अनित्य, दुःखरूप आहे. पण त्या प्रपंचात हे दोन विषय मुख्य. लोकांमध्ये द्रव्याचा किती लोभ ? पैशाकरिता नाही नाही ते खोटेनाटे काम करतात.

द्रव्य जीवाहूनी आवडे या जना । आम्हांसी पाषाणाहूनी हीन ।। ३ ।।

पैशापुढे मनुष्य आई, बाप, देवधर्म कोणाची पर्वा करीत नाही. पैसा हाताचा सुटता सुटत नाही. द्रव्य अती अनर्थमूलक–

द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग ।
म्हणोनियां संग खोटा त्याचा ।। तु. ३४३२

मनातून पैसा द्यावयाचा नसला तर आणा–शपथा वाहून मोकळा होतो पदोपदी खोटे बोलतो. त्या द्रव्याचा किती मोह ? जीवापेक्षा अधिक प्रिय-तर आहे. पैशाकरिता जीवहो देतात. नामसप्ताहात मंडळी वर्गणीला निघतात. एखाद्याकडे ती पुढारी मंडळी येऊन बसली व यादी पुढे ठेवली. त्याची ऐपत ५० रु. ते १०० रु. देण्याची असते. तरी तो यादीत १ रुपया अगर २ रुपयांचा आकडा घालतो. पुढारी म्हणतो, 'शेटजी, एक रुपया देणे शोभते का ?' शेटजी म्हणतो, 'तुम्हाला काय होय ? उचलली जीभ लावली टाळयाला. तुम्ही द्या ना !' पैसा हाताचा सुटत नाही. संसारी माणसांची तर गोष्ट सोडा; पण सर्वसंगपरित्यागी, परमार्थी म्हणवणारे त्यांनाही द्रव्याचा लोभ सुटत नाही.

नाहीं त्या सुटली द्रव्यलोभमाया ।
भस्म दंड छाया तरुवराची ॥ १४ ॥ तु. ३५६

साधक परमार्थाला लागला म्हणजे तीन खड्डे ओलांडावे लागतात. बायका, पैका आणि प्रतिष्ठा.

एक मूर्ख त्यागी रानामध्ये अंगाला राख लावून, दोन्ही हात वर करून, झाडाखाली बसला होता. त्या ठिकाणाहून जवळ एक शहर होते. तेथे एक ब्राह्मण राहात होता. त्याचे कुटुंब वारले. मुले लहान होती. त्याच्याजवळ पाच हजार रुपये होते. तो नेहमी रानात त्याच्या दर्शनाला जात होता. त्या दांभिकाला त्याच्या जवळ आपले डबोले ठेवले तर सुरक्षित राहील म्हणून हा ब्राह्मण त्या बैराग्याकडे डबोले घेऊन गेला. त्या बैराग्याने विचारले–" किधर आये." ब्राह्मण म्हणाला गावात ज्याच्याजवळ ठेवावे तोच गडप करील आणून आपल्याजवळ ठेवण्यास आलो." "भले रख जाव." साधू म्हणाला. ब्राह्मण म्हणाला, कोठे ठेवू ? " कहां बी रखजाव हम तो छीते नहीं." ब्राह्मणाने ते जमिनीत पुरले. ब्राह्मण गेल्यानंतर वैराग्याच्या तोंडाला पाणी सुटले. ठेवलेल्य. द्रव्याजवळ गेला, जागा उकरली व दुसरीकडे पुरून ठेवले. ब्राह्मण काशी-यात्रेहून परत आल्यानंतर वैराग्याकडे गेला. वैरागी म्हणाला– कब आये ? ब्राह्मण म्हणाला, चार दिवस झाले. रक्कम घेण्याकरता आलो. वैरागी म्हणाला, अच्छा, ले जाव, हमकू क्या करनेका है ? हम तो छीते नहीं. ब्राह्मणाने ठेवलेल्या जागी उकरण्यास सुरुवात केली; पण द्रव्य भेटेना तेव्हा तो म्हणाला, महाराज, या ठिकाणी डबोले नाही. वैरागी म्हणाला, हमकु क्या पूछते ? निकल जाव। हमकु मालुम नही ! हम तो छीते नही. ब्राह्मण रडत चालला. त्याला एका बाईने विचारले, भटजीबुवा का रडता ? सर्व घडलेला वृत्तान्त बाईजवळ सांगितला. बाई म्हणाली– उद्या दुपारी १२ वाजता त्या बैराग्याकडे या ! रक्कम परत मिळेल असे मी काही करते. त्या बाईने आपल्या मुलीला सांगितले की मी त्या वैराग्याकडे जाते. तू एक वाजता 'बाई, भाई आया' असे म्हणत ये. बाईने एक मोठे गाठोडे घेतले व त्या वैराग्याकडे गेली. बैराग्याने गाठोडे पाहिले व बाईला विचारले, " काय के लिये आयी ?" बाई म्हणाली. माझा भाऊ देशांतराचा गेला, त्याच्या भेटीला

जावयाचे आहे. सोने, नाणे मिळून रकम दहा हजाराची आहे. तुमच्याजवळ ठेवावी म्हणून आले. तितक्यात ठरल्याप्रमाणे ब्राह्मण आला. बाईने शिकवल्याप्रमाणे बैराग्याला ब्राह्मण म्हणू लागला, 'महाराज, येथेच मी डबोले ठेवले होते ना !' बैराग्याने विचार केला की, पाच हजार दिले नाहीत तर बाई दहा हजार ठेवणार नाही. बैरागी म्हणाला–

"अरे मूरख, रखता कहां और देखता कहा ? अरे यहां नही उदर देख." त्यानेच तेथे ठेवले होते. बाईचे नुसत्या चिध्यांचे गाठोडे होते. ब्राह्मणाला ठेवा मिळाला. बाई खड्डा खोदत होती. इतक्यात तिची मुलगी ठरलेल्या वेळी आली व म्हणाली, "बाई, भाई आया." बाई म्हणाली, 'महाराज, मी जाते. आता डबोले ठेवण्याची गरज नाही. ते मी घेऊन जाते.' तिघे हसायला, नाचायला, रडायला लागले. मार्गाने जाणारा एक सभ्य गृहस्थ त्याने हे दृश्य पाहिले. ब्राह्मणाला विचारले, 'क्यो हासते, नाचते हो !' तो ब्राह्मण म्हणाला, "मेरा गठडा पाया " नंतर बाईने विचारले, तूं क्युं हासती, नाचती हो ? बाई म्हणाली, " भाई आया आया ।" नंतर बैराग्याला विचारले की," तुम क्यूं रोते गुरुराया ?"

" बहोत देखकर थोडा भी गमाया दस हजार बी गये और पांच हजार बी गये । अबी रोना नही तो क्या हसना ।"

सर्वसंगपरित्यागी, लंगोटी घातलेला, अंगाला राख फासून झाडाखाली बसलेल्या, त्यालाही द्रव्याचा मोह सुटला नाही. पण तु. म. म्हणतात–

सोनें रुपें आम्हा मृत्तिकेसमान । माणिक पाषाण खडे जैसे ।। ३ ।।

पंढरपुरात जळोजी, मळोजी दोघे भाऊ वैराग्यसंपन्न होते. एका राजाने पंढरपुरात अन्न व द्रव्य वाटले. हे दोघे गेले नाहीत. राजाने चौकशी केली, कोण राहिले म्हणून ! तेव्हा जळोजी, मळोजी आले नाहीत व येणार नाहीत असे कळले. ते झोपेत असताना राजा त्यांच्या घरी द्रव्य ठेवून गेला. सकाळी उठल्यावर मोहराकडे पाहून जळोजी मळोजीला म्हणाला, कोण येथे घाण करून गेला ? त्यांनी त्या मोहरा विष्ठा समजून उकिरड्यावर टाकल्या.

मृत्युलोकी आम्हा

हे खरे वैराग्य. अलीकडे साधू काही तरी निमित्त करून पैसा मिळवितात. या काठीला, या गाईला पैसा मिळाला करून खिसा भरायचा. 'या नाम-सप्ताहाला' 'या यज्ञाला' असा परमार्थाचे नावाने पैसा मिळवितात, निदान परमार्थाचा पैसा तरी परमार्थाला लावावा.

देखें सोनियाचें निखळ । मेरुयेसणें ढिसाळ ।
आणि मातियेचें डिखळ । सरिसेचि मानी ।। ज्ञा. ६।३२

पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें ।
देखे दगडावेनि पाडें । निचाडु ऐसा ।। ज्ञा. ६।९३

कोणी शंका करील की, नुसते सांगण्यापुरते वैराग्य असेल; पण 'आले की घे' असे नाही. तुकाराम महाराजांचे वागणे थोडे जास्तच. काही कीर्तनकार कीर्तनाला उभे राहिले म्हणजे वैराग्य असे बनबनावून सांगतात. की श्रोत्यांच्या अंतःकरणात क्षणभर वैराग्य उत्पन्न होते पण बोलल्याप्रमाणें त्यांचे आत नसते. दुष्ट वासना असते.

शाला गडवे धातु द्रव्य इच्छा चित्तीं । नैश्वर्य बोलती मुखें ।। ४ ।।
तु. २९१८

एक गुरुजी आपल्या शिष्याकडे आले. शिष्याची शालजोडी पाहिली व ती मिळावी म्हणून ध्यानस्थ बसून 'शालजोडी, शालजोडी' म्हणू लागले. शिष्याला समजले की, गुरुजी आपली शालजोडी उपटायला पाहतात. शिष्यही ध्यानस्थ बसून "घोडी घोडी" म्हणू लागला. गुरुजींच्या लक्षात आले की– शिष्य दोनशे रु. च्या शालजोडीच्या मोबदल्यात आपली पाचशे रु. ची घोडी उपटायला पाहतो. गुरुजीने आपला मंत्र बदलला, 'तुझी तुला माझी मला."

जैसे बोलती निरोपणीं । तैसी न करिती करणी ।। ४ ।।
करूनि अद्वैत व्युत्पत्ती । तें ज्ञान विकूं देशांतरा जाती ।। तु. २८२१
मूर्ख ज्ञात्यातें उपहासिती । तऱ्ही वांछिती सन्मानू ।। भा. ११।५२४

सांगे आन करी आन । तेथें कैंचें ब्रह्मज्ञान ।
जेथ वसे धनमान । तेथ आत्मज्ञान असेना ।। भा. ११।५३१

आमचे महाराज असे नव्हते. ते तावून सुलाखून निघाले होते. शिवाजी महाराजांनी तु. म. ना आपल्या घरी आणण्याकरिता पालखी, छत्री, लवाजमा पाठवला. महाराज ध्यान करीत बसले होते. या सर्व लवाजम्यासह तुकाराम महाराजापुढे सेनापती जाऊन उभा राहिला. महाराजांनी ते पाहिले. ते परमात्म्याला म्हणाले, याच्याकरता का मी डोंगरावर आलो ? जे नको तेच का पुरवितोस ?

नावडे जें चित्ता । तेंचि होसी पुरविता ।। तु. ६३८

आम्हाला कोणी नुसते घोडे पाठवले की, अमक्या अमक्या पाटलाने घोडे पाठवलं म्हणून सांगत सुटतो.

तरी कां वोळगणें । राजद्वारीं होती सुने ।। १ ।। तु. २८७१

शिवाजी महाराजांनी आपल्याला पालखी पाठविली, असे सेनापतीने म्हटल्यानंतर तु. म. म्हणाले, तुमचे महाराज आम्हाला कळले. बेल देऊन आवळा काढणारे.

तुम्ही कळले ती उदार । साटीं परिसाची गार ।। तु. ६३९

आमचे अमूल्य पुण्य उपटायचे, बदल्यात हे द्रव्य द्यायचे. संसारी लोक साधूला घरी नेतात ते साधूचे पुण्य उपटण्याकरता तु. म. नी त्याचा अंगीकार केला नाही.

अप्राप्त विषयें योगी । बहुत देखिले विरागी ।
परी प्राप्त स्वर्गांगना भोगीं । धन्य विरागी पुरुरवा ।। भा. २६।२८३

इंद्रियांचे समोर विषय आल्यानंतर त्यावर लाथ मारणे कठीण. महाराज शेवटच्या चरणात स्त्रीसंबंधाने वैराग्य व्यक्त करतात.

तुका म्हणे तैशा दिसतील नारी । रिसाचियापरि आम्हां पुढे ।। ४ ।।

हेही मोठे कठीण आहे. कसा का कोणी विरक्त असेना, सुंदर स्त्री डोळ्यांनी पाहिली की, त्याचे वैराग्य आटोपले.

जोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी ।
जंव सुंदर वनिता दृष्टि पडली नाहीं ।। ३ ।। तु. ३२३८
तुका म्हणे कामा नाही एक मुख । जिरवितां सुख होत पोटीं ।। ४ ।।
तु. ३५८२

कामाला आठ मुखे आहेत.

स्मरणं कीर्तनं केलि: प्रेक्षणं गुह्यभाषणम् ।
संकल्पोऽध्यवसायश्च क्रियानिष्पत्तिरेव च ।।

स्त्रीला पाहूनच, बोलूनच वैराग्य पाघळायला लागते.

एका गावात महादेवाचे मंदिरात बैराग्यांचा मेळा आला होता. त्यांच्या जटा, दाढी लांब लांब वाढलेल्या होत्या. त्या गावातील एका सावकाराचे मुलीचा शिवदर्शनाचा नियम होता. ती एकटी दर्शनाला आलेली पाहून साधू जागा झाला व तिला आडवा झाला. त्या दांडगेश्वराला पाहून तिने " लज्जा रक्षण कर " म्हणून मनात प्रभूचा धावा केला. यांच्या तावडीतून कसे सुटावे ? त्या मुलीला महादेवाने बुद्धी दिली. ती म्हणाली, महाराज, काय इच्छा आहे ? आपल्या या जटा आणि दाढी आहेत वाढलेल्या हे सर्व साफ करा मग मी आपल्या सेवेत हजर आहे. तिने आपले भलतेच नाव, भलताच घरनंबर, भलताच वाडा सांगितला. त्या वैराग्याला न्हाव्याचा ध्यास लागला. न्हावी म्हणाला, सर्व साफ करायचे ? त्याने सर्व साफ केले. पोषाख केला. गावात फिरला. घर काही सापडले नाही. अती दीन होऊन आखाड्यात येऊन बसला. दुसरे बैरागी म्हणाले– सिंहस्थ नही, गंगा नही, किंव साफ किया ? काय के लिये जटा उतारा ? वैरागी म्हणाला, क्या करूं आशा रे केश नाशा । महाराजांनीच असे म्हणावे.

तुका म्हणे तैशा दिसतील नारी । रिसाचिया परि आम्हां पुढें ।। ४ ।।

अप्सरांना लाजवणाऱ्या अशा सुंदर सुंदर स्त्रिया त्यांना अस्वलीसारख्या दिसतात. अस्वलीत भाळण्यासारखे काय आहे ? ती नखे काय ? केश काय ? नाचायला लागली तर पाहूनच ओकारी येते. याही बाबतीत आमचे महाराज तावून सुलाखून निघालेले. देहूमध्ये कोणी एक दुष्ट बाई होती. तिचे

महाराजांवर मन गेले. महाराज भंडाऱ्या डोंगरावर बसले होते. ती दुष्ट बुद्धीने भंडाऱ्यावर महाराज ध्यान करीत बसले असता गेली. महाराजांचे ध्यान उत्थान व्हावे, म्हणून तिने आपले पाय आपटले. महाराजांनी डोळे उघडून पाहिले. बाई एकटी. ती म्हणाली, मला बाई म्हणू नका. मी एक वर्षापासून आपल्याकरता झुरते आहे. मी दासी–बुद्धीने आले आहे. असे पाहिल्याबरोबर महाराज म्हणाले–

पराविया नारी रखुमाईसमान । हें गेलें नेमून ठायीचेंचि ॥१॥ तु.६५१
जाई वो तू माते न करीं सायास । आम्ही विष्णुदास तैसे नव्हों
॥२॥ तु. ६५१
न साहावे मज तुझें हें पतन । नको हें वचन दुष्ट वदो ॥ तु. ६५१

ती बाई म्हणाली– मी कुणाला सांगणार नाही. फारच लागटपणा करायला लागल्यावर महाराज रागावले. ते म्हणाले, पुरुषच पाहिजे तर मीच का राहिलो आहे ? तुझ्या चालीचे इतर रगड आहेत.

तुका म्हणे तुज पाहिजे भ्रतार । तरी काय नर थोडे जाले ॥४॥६५१
तिला हुसकून दिले म्हणून महाराजांनीच म्हणावे–
तुका म्हणे तैशा दिसतील नारी । रिसाचियापरि आम्हां पुढें ॥ ४ ॥

**व्याख्यान**

**अभंगाच्या प्रथम** कडव्याचा थोडक्यात विचार सांगावयाचा तो असा– संपूर्ण मृत्युलोकाकडे तु. म. नी विचाराने पाहिले, तेव्हा त्यांना या मृत्युलोकात प्रेम ठेवण्यासारखे एक हरिनामाविण काहीच दिसून आले नाही. आपण या मृत्युलोकाकडे बारकाईनें पाहात नाही. तु. म. नी. ज्या दृष्टीने या मृत्यूलोकाकडे पाहिले. त्या दृष्टीने आपण पाहिले तर प्रेम ठेवण्यासारखे तुम्हासही काहीच दिसणार नाही. तु. म. च्या या उक्तीवर कदाचित कोणी असा आक्षेप घेईल की तु. म. जर या चालू शतकात असते तर त्यांनी असे म्हटले नसते. चालू शतकात सुखाची जेवढी साधने उपलब्ध आहेत, तेवढी त्यांच्या वेळेला नव्हती. तुकाराम महाराजांना निजधामास जाऊन तीनशे वर्षे जवळजवळ होऊन गेली. तिनशे वर्षांची गोष्ट सोडा,

मृत्युलोकी आम्हा

पण आमचे लहानपणी जे होते, ते आज राहिले नाही. जणू काय नवीनच जग उत्पन्न झाले. नाटके, सिनेमा, त्या वेळेला कुठे होती ? पंजाब मेल, दख्खनकी रानी केव्हा होती ? ट्राम, मोटर बसेस केव्हा होत्या ? विमाने होती, पण वरून खाली येणारी होती. " प्रयाणकाळी देवें विमान पाठविले " वर जाणारी विमाने नव्हती. कुठे एवढ्या सुखसोयी होत्या ?

जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्गु तरी बहुसाल सांडे ।
तैसे सोकासना सांगडे । सोहपे होय ।। ज्ञा. ५।८

खाणे पिणे तरी एवढे नव्हते. राधवदास, गुलाबजांब. खाण्याचे पक्वान्नाची सुधारणा झाली सरकारपासून. कपड्यात तरी आता किती फॅशन्स निघाल्या आहेत. प्रस्तुत जेवढी सुखाची साधने उपलब्ध आहेत, तेवढी त्यांच्या वेळेला नव्हती. म्हणून त्यांनी त्या शतकात म्हटले असेल,

मृत्युलोकीं आम्हां आवडती परी । नाहीं एका हरिनामेंविण ।। १ ।।

तुकाराम महाराजांच्या वेळेला ही साधने नव्हती म्हणून त्यांनी तसे म्हटले नाही. आमचे महाराज चालू शतकात असते, तरी त्यांनी असेच म्हटले असते. मोटारीत, डेक्कन क्वीनमध्ये, विमानात बसले असते तरी त्यांनी असेच म्हटले असते. तु. म. नी म्हटल्याप्रमाणे प्रेम ठेवण्यासारखे या मृत्युलोकात काही नाही. जेवढी सुखसाधने उपलब्ध आहेत, तेवढ्यांच्या आत काय आहे, हे तुम्हा आम्हाला दिसत नाही. त्यांना दिसले म्हणून त्यांनी म्हटले, " मृत्युलोकी आम्हा " जीवाला जे स्वभावत: नको आहे, असेच या मृत्युलोकात भरलेले आहे. जीवाला स्वभावत: तरी काय नको ? दु:ख हे जीवांना स्वभावत: नको. खोटे असून ते विषयाकडे धावतात.

ते अंतर नेणती बापुडें । म्हणोनि अगत्य सेवणें घडे ।
सांगे पूयपंकींचे किडे । काय विळसी घेती ।। ज्ञा. ५।१२१

येऱ्हवी खोटे आणि दु:ख स्वभावताच कोणालाही नको आहे.

मजलागीं दु:ख व्हावें । ऐसें कोणी भावीना जीवें ।
न वांछितां दु:ख पावे । येणे न संभवे स्वतंत्रता ।। भा० १०।१४६

पाच वर्षांचे पोर असले आणि सुखदुःखापैकी काय पाहिजे विचारले, तर सुख पाहिजे असेच म्हणेल. या मृत्युलोकांत खोटे आणि दुःखच भरलेले आहे. विषय जेवढे आहेत, त्या विषयांच्या आत काय आहे ? अनित्यत्व व दुःखरूपत्व आहे आणि ते तर कोणालाही नको आहे ! प्रपंच किती अनित्य आणि दुःखरूप आहे, हे सांगावे ? भगवंतांनी गीतेच्या १५ व्या अध्यायात पहिल्या दोन श्लोकांत प्रपंचाचा अध्यारोप केला.

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्त वेद स वेदवित् ।। गी. १५।१

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ।। गी. १५।२

निष्प्रपंच वस्तूवर प्रपंचाचा आरोप करणे यास अध्यारोप म्हणतात. " वस्तुनि अवस्तु आरोपः अध्यारोपः ।"

भगवंतांनी वृक्षाच्या रूपकाने संसाराचा मांड मांडला. याप्रमाणे अध्यारोप करून तिसऱ्या श्लोकात खंडण केले अध्यारोप जो करायचा तो निषेधाकरता. लग्नात दारूची चक्रे, झाडे करणारा तो अशा हेतूनेच करतो कीं त्यांना (जाळायचे) आहे. कल्पना करा दारूचा हत्ती केला तर तो ठेवण्याकरता नाही. तसा अध्यारोप, अपवादाकरिताच करावयाचा अवाढव्य प्रतिपादन करून भगवंतांनी श्लोकात

न रूपमस्येह तथोपलभ्यते नांतो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्वा ।। गी. १५।३

भगवंतांनी अर्जुनाला अवाढव्य स्वरूप सांगितले. पण पुढे म्हणतात--

अगा पैं पंडुकुमरा । येतां स्वरूपाचिया धरा ।
करीतसे आडवारा । विश्वाभासु जो ।। ज्ञा. १५।४६

आत्मस्वरूपाकडे येताना अडथळा कोण करतो ?

तो हा जगडंबरु । नोहे येथ संसारु ।
हा जाणें महातरु । थांबला असे ।। ज्ञा. १५।४७

या प्रपंचरूपी शाखा स्वर्ग, सत्यलोकापर्यंत गेल्या आहेत.

परी तुझां हन पोटीं । ऐसे गमेल किरीटी ।
जे एवढें झाड उत्पाटी । ऐसें कायि असे ।। ज्ञा. १५।२१०

एवढे झाड उपटून टाकील असे साधन् तरी काय आहे ?

ब्रह्मयाचा शेवटवरी । ऊर्ध्व शाखांची थोरी ।
आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वी असे ।। ज्ञा. १५।२११

सत्कर्माच्या आचरणाने सत्य लोकापर्यंत फांद्या वाढत गेल्या आहेत. याचे आहे निर्विकल्प मूळ.

हा स्थावराही तळीं । फांकत असे अधींचा डाळीं ।
माजीं धांवतसे दुजा मुळीं । मनुष्यरूपीं ।। ज्ञा. १५।२१२

मनुष्ययोनीला धरून हा खाली स्थावर लोह लोष्टापर्यंत विस्ताराला पावला आहे.

ऐसा गाढा आणि अफाटु । आतां कोण करी यया शेवटु ।
तरी झणी हा हळुवटु । धरिसी भावो ।। ज्ञा. १५।२१३

तरी अर्जुना, तू क्षुद्र कल्पना घेशील आणि धावे दणाणून बसशील.

परी हा उन्मूळावया दोषे । येथ सायासचि कायिसे ।
काय बाळा बागुल देशे । दवडावा आहे ।। ज्ञा. १५।२१४

याचा निरास करण्याला सायास कशाला ? कारण तो मुळातच नाही.

एका मुलाने रडू नये म्हणून आईने बागुलबुवाची भीती दाखविली. खोलीकडे बोट करून, पहा तो केवढा बागुलबुवा. केवढे तोंड, त्याचे केवढे नाक, भले अवाढव्य वर्णन केले. गप्प बसतो का घालू त्याचे झोळीत ? पुष्कळ मुले आहेत त्याच्या झोळीत. अंधारामुळे मुलाला खरे वाटते. तशा स्वरूपाचा तो आहे का ? जर खरा तशा स्वरूपाचा असता तर या बाईला नाही का पेढ्यासारखे गट्ट केले असते? पण ते अज्ञान मूल गप्प बसते. त्या मुलाला असे वाटते की आई बाहेर गेली म्हणजे मला हा बागुलबुवा खाईल; म्हणून याला घालव बाहेर असे म्हणते. आई काठी घेऊन आपटते व म्हणते, गेला बागुलबुवा केवळ कल्पना मात्र.

अत्यंत अभावाचे चार दृष्टान्त :—बागुल, खपुष्प, वंध्यापुत्र, सशशृंग.
विवर्तवादाचे चार दृष्टान्त :—रज्जुसर्प, शुक्तिरजत, मृगजळ, स्वप्न.
अन्वयावरचे चार दृष्टान्त :—सुवर्ण अलंकार, जलतरंग, मृत्तिकाघट तंतुपट.

संसार नाहीच, हेच मुख्य दाखवावयाचे आहे.

गंधर्वदुर्ग कायी पाडावे । काय शशविषाण मोडावें ।
ओहावें मग तोडावें । खपुष्प कीं ॥ १५।२१५
तैसा संसार हा वीरा । रुख नाहीं साचोकारा ।
मा उन्मळणीं दरारा । कायिसा तरी ॥ ज्ञा. १५।२१६

भगवंतांनी संसाराचा अत्यंत अभाव दाखविला. पण अर्जुनाने भगवंताला विचारले की आपल्या बोलण्यात एकनिष्ठपणा दिसत नाही. मागच्या दोन श्लोकांत या प्रपंचाचे खूप अवाढव्य वर्णन केले ते काय ?

आम्हीं सांगितली जे परि । मूळडाळांची उजरी ।
ते वांझेचीं घरभरीं । लेंकुरे जैशीं ॥ ज्ञा. १५।२१७

हे खरे का तू समजतोस ?

वांझेची लकुरे याला कोण खरे म्हणेल ? एक मुलगा बावळट होता. तो आपल्या स्नेह्याला म्हणाला, एक गोष्ट सांग. तो म्हणाला तू हूं म्हणत जा. बरे आहे. सांग. एक होती वांझ. हूं. पुढे तिला झाला मुलगा. तो हू म्हणाला. त्याला मुलगी केली हनुमंतरायाची, सशाच्या शृंगांचा मंडप तयार केला, बिनमुंडक्याची माणसे बसली जेवायला,—कासवीचे तूप घेतले वाढायला, असा तो अपूर्व लग्नसमारंभ केवळ वाचाविलास मात्र आहे.

काय कीजती चेइलेपणीं । स्वप्नींचीं तियें बोलणीं ।
तैशी जाण ते कहाणी । दुगळीचि ते ॥ ज्ञा. १५।२१८

स्वप्नात राज्य मिळाले. पण जागे झाल्यावर काही आहे काय ? आनंद गेला. आम्ही दोन श्लोकांतून प्रपंचाचे स्वरूप सांगितले, तसे जर खरे असेल तर कोणाची अशी शक्ती आहे की त्याने झाड उपटून टाकले असते ? पण आजपर्यंत शेकडो बहादुरांनी ते केले.

तेणें आपुलेनि पुरुषार्थे जिंकिला संसार।
केला मद मत्सर देशधडी ॥ ८ ॥ नाम. ९२०

एकी केली हातोफळी। ठाया बळी पावले ॥ १ ॥ तु० १८१४

संसाराच्या हातावर हात मारून, समोरासमोर नाही तर शत्रूचे सैन्य निजलेले असताना हल्ला, विमानातून बॉम्ब गोळा, त्यात पुरुषार्थ नाहीं. महाराज संसारावर अति चिडले. आणि देवाला म्हणतात,

म्हणोनी रुसलों संसारा। सर्प हा विखार पांढरा।
तुजशीं अंतर रे दातारा। याचि दावेदारा निमित्त ॥ तु. ७३०
येणें मज भोगविल्या खाणी। नसता छंद लाविला मनीं।
माजलों मी नाझ भ्रमणीं। झाली बोडणी विटंबना ॥ तु. ७३०

देवा, तुझ्यात माझ्यात छत्तिसाचा आकडा कोणी आणला असेल तर या संसाराने.

पैं भवस्वर्गा उबगले। मुमुक्षु योगज्ञाना वळघले।
पुढती न यों इया निगाले। पैजा जेथ ॥ ज्ञा. १५।२७७

पुन्हा येणार नाही अशा प्रतिज्ञेने साधक निघाले. संसाराचे गिऱ्हाइक चाललेले पाहून त्याला वाईट वाटते. पण याने सत्यलोकापर्यंत जेवढा म्हणून संसार आहे तेवढा अनित्य व दुःखरूप अस्त्र विचाराने जाणला.

ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी। तेथें चित्त झणीं जडो देसी ॥ ३ ॥
तु. १०७०
तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म। जे जे कर्मधर्म नाशवंता ॥
तु. १०७०

संसाराचिया पायां पुढां। पळती वीतराग होडा ॥
ओलांडोनि ब्रह्मपदाचा कर्मकडा। घालिती मागा ॥ ज्ञा. १५।२७८

संसाराची हद्द सत्यलोकापर्यंत.

म्हणौनि ब्रह्मेशानापरौतें। वाढणें नाहीं जीवातें।
तेथूनि मग वरौते। ब्रह्मचि कीं ॥ ज्ञा. १५।२०३

ही हद्द संपली. मग स्वरूपाची हद्द. ही आहे वरची हद्द. तेथे झाडा द्यावा लागतो. ज्याप्रमाणे शिकारी कुत्री सशाच्या मागे लागतात, सशाची व कुत्र्याची धरपकड, त्यांत ससा जीव तोडून पळत असतो. कुत्रेही शिकारी असल्याने जोराने पाठलाग करतात. तशात ससे बिळात गेले, कुत्रे धापा टाकीत मागे येतेसे वाटते. तसेच सत्यलोकापर्यंत संसार मागे असतो. गिऱ्हाईक चाललेले पाहून संसाररूपी व्यापाऱ्याला बरे वाटत नाही. वासनाशून्य होणे म्हणजे पुढे जाणे आहे.

अहंतादि भावां आपुलिया । झाडा देऊनि आघवेया ।
पत्र घेती ज्ञानिये जया । मूळ धरासी ।। ज्ञा. १५।२७१

देव तिहीं बळें धरिला सायासें । करूनियां नास उपाधीचा ।। तु.३८२९

असे शूर, धीर महात्मे होऊन गेले.

परमार्थासी कोण त्यजी संसार । सांगा पां साचार नांव त्याचें ।। २ ।।
तु. २८३८

जन्मतां संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कलंक तुका म्हणे
।। तु. २८३८

एऱ्हवी विषय जिणोनि जन्मले । जे शुकादिक दादुले । ज्ञा. ११।१७३
त्यांनी विषयांना जिंकले नंतर जन्माला आले.

आणीकही शाखा उपरता । जिया सनकादिक नामें विख्याता ।
तिया फळीं मूळीं नाडळतां । भरलिया ब्रह्मीं ।। ज्ञा. १५।२०५

प्रपंचाभाजीं असते सुख । तरी कां त्यजिते सनकादिक ।
द्वैत तितुकें केवळ दुःख । परम सुख अद्वैतीं ।। भा. १०।२४७

प्रपंचीं जरी सुख जोडे । तरी का सेविती गिरीकडे ।
राज्य टाकुनी गेले थोडे । ते काय वेडे म्हणावे ।। आनंदलहरी ९४
भृर्तहरीने राज्य टाकिलें । तेणे श्रीगोरक्षातें पुसिलें ।
राज्य टाकुनि मुंडित जाले । कितेक गेले भूपती ।। आनंदलहरी ९५
मग श्रीगोरक्षनाथ बोलती । नव्याणव कोटी भूपती ।
इतरांची नाहीं गणती । योगाप्रती निघाले ।। आनंदलहरी ९६

याप्रमाणे शेकडो महात्म्यांनी संसाराला जिंकले. भगवंतांनी या प्रपंचरूपी वृक्षाचे जसे वर्णन केले तसाच जर सत्य असता–

तरी कोणाचेनि संताने । निपजती या उन्मूळणें ।
काय फुंकिलिया गगने । जाइजेल गा ।। ज्ञा. १५।२२०

कुणालाही संसाराचा निरास अथवा बाध करता आला नसता. एका मुलाने आईला विचारले 'आई, आकाश एवढे उंच कसे ?' ती म्हणाली-' बाळ, पूर्वी आकाश फार खुजट होते. इतके की आंगण झाडताना माझ्या पाठीला लागळे घासायला. मग मला आला राग. मी खराटयाचा फटकारा मारला की आकाश भुरकन वर उडून गेले.'

म्हणौनि पैं धनंजया । आम्हीं वानिलें रूप तें माया ।
कांसवीचेनि तुपें राया । वोगरिलें जैसें ।। ज्ञा. १५।२२१

एक मनुष्य रजोगुणी होता. हुजुरांना मेजवानी करावी अशी त्याला इच्छा झाली.

जरी राजा घरासि ये । तरी बहुत उपेगा जाये ।
आणि कीर्तीही होये । श्राद्ध न टके ।। ज्ञा. १७।१८६

त्याने व्यवस्था कशी करावी म्हणून मित्राला विचारले. त्यांनी ज्या मित्राला विचारले तो होता खुशमस्करी. यादीत फक्त तूप राहिले. तूप कुणीकडचे ? सांगली का मिरजेचे ? का नागोबाचे वाडीचे ? का खानदेशचे ? त्यांनी गंमत केली. अरे, गाई–म्हशीचे तूप तर भटाला घालतो. राजाला आणि गाईचे तूप ? मग भटाची व राजाची एकच किंमत. कासवीचे तूप आणा. पण कासवीला स्तनच नाही; मग दूध कोठून असणार !

कासवीचे बाळ वाढे कृपादृष्टी । दुधा नाहीं भेटी अंगसंगें ।। तु. ३५५८
अगा मुखमेळेंविण । पिलियाचें पोषण ।
करी निरीक्षण । कूर्मी जेवीं ।। ज्ञा. १३।१४०
मूळ अज्ञानचि तंव लटिके । मा तयाचें कार्य हे केतुकें ।
म्हणोनि संसाररुख सत्य कें । वावोचि गा ।। ज्ञा. १५।२२३

संसारवृक्षाचे कारण जर खोटे तर कार्य कुठून सत्य असणार ?

आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे ।
वातीं पाहतां जैसें । आंधारें कां ।। ज्ञा. १४।७२

खोटया कारणाचे कार्य खोटेच असणार. उदा. एकाने मूलाकरिता गाय घेतली स्वप्नात. ती गाय व्याली. तिला झाला गोरा. दूध काढले; वडया तयार केल्या. मित्र आला व उठला. गाय स्वप्नातली तर वासरू कुठून खरे असणार ? " म्हणौनि संसाररुख सत्य कें । वावोचि गा । " याचे अनित्यत्व किती सांगू ! भागवतात चार प्रकारांनी सांगितले.–

(१) श्रुति, (२) प्रत्यक्ष, (३) ऐतिह, (४) अनुमान.

(१) श्रुति सांगते–" एकमेवाद्वितीयं ब्रह्म नेह नानास्ति किंचन् "
एक अद्वैत ब्रह्म पाहीं । दुसरे आणिक कांहीं नाहीं ।
प्रपंच मिथ्या वस्तूचे ठायी । हें प्रमाण पाही वेदवाक्य ।। भा. १९।१९७
ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ।।

(२) प्रत्यक्षः–प्रत्यक्ष देखिजे आपण । देहादिकांचे नश्वरपण ।
हे दुसरें परम प्रमाण । क्षणिकत्व जाण प्रपंचा ।। भा. १९।१९८

संसाराचा मिथ्यापणा, देहादिकांचा नश्वरपणा आपण आपल्या डोळ्यांनी पाहतो. आपले पणजोबा, आजोबा, वडील गेलेत.

आजा मेला पणजा मेला बाप मसणा नेला ।
देखत देखत नातु पणतु तोही वेडा जाला ।। ५ ।। ज्ञा. अ. ९४

पित्या देखतां पुत्र मरे । पुत्रा देखतां पिता झुरे ।
काळें काळ अवघेंचि सरे । कोणीही नुरे क्रियेसी ।। भा. २८।२८५

महाप्रळयानंतर कोणी कुणाचे श्राद्ध करावे, असा काळ येणार आहे.

(३) ऐतिहः–मार्कंडेयो आणि भृशुंडी । इहीं प्रपंपाची राखोंडी ।
देखिली गा रोकडी । वेळा कोटि कोटी कल्पांतीं ।। भा. १९।१९९

किती वेळा राख राखोंडी झालेली पाहिली ?

मृत्युलोकी आम्हा

(४) अनुमान–शास्त्रप्रसिद्ध अनुमान । मिथ्या प्रपंचाचें भान ।
दिसे मृगजळासमान । वस्तुतां जाण असेना ।। भा. १९।२०१

चार प्रमाणांनी प्रपंचाचा मिथ्यापणा सांगितला. तसाच महात्म्यांचा अनुभवही आहे.

लटिका व्यवहार सर्व हा संसार । वायां येरझार हरि वीण ।। ज्ञा. २७
लटिका तो प्रपंच एक हरी साच । हरिविण आहाच सर्व इंद्रियें ।।१।।
तु. ३५९७

फलकट तो संसार । येथें सार भगवंत ।। तु. २०९०
तुका म्हणे तंचि खरा । येर वाउगा प्रसारा ।। तु. १८८७
जें जें देखणें सकळ । तें हें स्वप्नीचें मृगजळ ।
म्हणोनि चिंती चरणकमळ । रखुमादेविवर विठ्ठलाचें ।।४।। ज्ञा.अ.१७६
लावण्य मान्यता विद्यावंत । सखे स्वजन पुत्रकलत्र ।
विषयभोग वयसा व्यर्थ । देहासहित मरणांती ।। ३ ।। ज्ञा. अ. १७६

तारुण्यात पाहिले तर खूष, म्हातारपणात तोंडाचे होते बोळके; केशाच्या होतात आंबाड्या. म्हाताऱ्याकडे पाहावत नाही. मान्यता कुठपर्यंत ? द्रव्य आहे, लावण्य आहे तोपर्यंत.

कहे तुका सबहि चलणार । एक रामबिन नहिं वोसार ।। तु. ४४३
हे विषय तरी कैसे । रोहिणीचें जळ जैसें ।
कां स्वप्नींचा आभासे । भद्रजाति ।। ज्ञा. २।१२१
देखें अनित्य तियापरी । म्हणऊनि तूं अव्हेरीं ।
हा सर्वथा संगु न धरीं । धनुर्धरा ।। ज्ञा. २।१२२

पण आपण स्वप्न पाहतो. तसेच मृगजळ डोळ्यांनी पाहतो. स्वप्नात मृगजळ पाहिले. अगोदर स्वप्न खोटे; त्यात खोटे मृगजळ पाहिले. खोट्यातले खोटे. जीवाला स्वभावत: खोटे नको आहे, आणि मृत्युलोक म्हणजे सर्व आहे खोटा. असेना खोटे ! पण सुखदायी तरी आहे काय ? तर नाही. प्रपंच अनित्य आहे तसाच आहे दु:खदायी. केवळ संसार अनित्य म्हणूनच तो आम्हाला दु:खदायी झालेला आहे. असे समजू नका. असे जर म्हणावे

तर प्राप्त पुरुष तुमच्या आमच्याप्रमाणे संसारात असतात. पण त्यांना कोठे दुःखरूप आहे ? जो संसार तुम्हा–आम्हाला दुःखरूप प्रतितीला येतो तो त्यांना सुखरूप प्रतितीला येतो.

अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥
ज्ञा. अ. ३२४

जो संसार दुःखरूप म्हणून ओरड चाललेली आहे, त्या संसारासंबंधी ज्ञा. म. प्रतिज्ञा करतात. आपल्यापुरता सुखरूप करीन म्हणत नाही. संसार मात्रांचा म्हणतात.

एकचि उरलें कासा [illegible] तरा । आनंदभुवनामाजी त्रयीं ॥ तु. ४०२५

ते जिकडे पाहतील तिकडे त्यांना सुखच सुख. आम्ही तिकडे पाहवे तिकडे दुःखच दुःख मी अशी शंका केली होती की प्रपंच अनित्य म्हणून दुःखरूप असे नव्हे. तर त्यांनी अनित्यत्व अनुभवले असून त्यांना दुःखदायी होत नाही. मग प्रश्न असा उत्पन्न होतो की एकच संसार आम्हाला दुःखदायी व त्यांना सुखदायी का ? त्याचे उत्तर,

हें असो स्वातीचें उदक । शुक्तीं मोती व्याळीं विख ।
तैसा सज्ञानांसी मी सुख । दुःख तों अज्ञानासी ॥ ज्ञा. १५।४२०

तेव्हा अनित्य संसार म्हणून दुःखरूप झाला असे नव्हे, तर एकच कारण-

पडिलो हे रूढि जगा परिचार । चालविती वेव्हार सत्य म्हूण ॥ तु. २०१०

संसार अनित्य म्हणून, दुःखरूप नव्हे तर– संसार अनित्य असून दुःखरूप असून त्याच्या विषयी (ठिकाणी) सत्यबुद्धी आणि सुखबुद्धी झाली. संसाराचा खोटेपणा डोळ्यांनी पाहतो. तरी सत्यबुद्धी जात नाही. प्राप्त पुरुषांना (महात्म्यांना) संसार दुःखरूप वाटत नाही. प्रपंच जसा अनित्य तसा त्यांनी जाणलेला (अनुभवलेला) असतो.

अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंचु हें विज्ञान ।
तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान हेंही जाण ॥ ज्ञा. ७।६

मिथ्या प्रपंचाच्या ठिकाणी सत्यबुद्धी झाली म्हणून दुःखरूप वाटू लागला. आता याच दृष्टीने प्रपंचाची दुःखरूपता सांगणार आहे. दोरीवर भासलेला सर्प मिथ्या. कल्पनेने भासलेला आहे, म्हणून खोटा. मिथ्या सर्पाच्या ठिकाणी, पाहणाऱ्याच्या ठिकाणी सत्यबुद्धी म्हणून–

जो किरडू तरी कापडाचे । परी लहरी येत होतिया साचें ।
ऐसें वाया मरतया जीवाचें । श्रेय तुवां घेतलें ।। ज्ञा. ११।५४

सर्प कापडाचा मग लहरी खऱ्या का येऊ लागल्या ? सत्यबुद्धी म्हणून. आमची प्रपंचाविषयी सत्यबुद्धी म्हणून दुःखदायी झाला.

सुख नाहीं कोठें आलिया संसारीं । वायां हांवभरी होऊं नका ।।
दुःखबांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाहीं कोठें ।।तु.३६५५

या संसारात सुखाचा विचार सुद्धा नाही.

ठाउकाचि आहे संसार दुःखाचा । चित्तीं शीण त्याचा वाहों नये ।।
तु. २५०७

संसार दुःखमूळ चहूंकडे इंगळ । विश्रांति नाहीं कोठें रात्रंदिवस तळमळ
काम क्रोध लोभ शुनी पाठीं लागलीं ओढाळ ।
कवणा शरण जाऊं आतां दृष्टी देईल निर्मळ ।। ३ ।। ज्ञा. अ. ७४५
संसारसागरु गा भवदुःखाचे मूळ । जनवाद अंथरुण माजी केले इंगळ ।
इंद्रियें वज्रघातें तपे उष्ण वरी ज्वाळ ।
सोसिले काय करूं दुर्भर हे चांडाळ ।। ४ ।। तु. ३५४

अविद्या ही प्रत्यक्ष दुःखाला कारण नसून अविद्या कार्य प्रपंच दुःखाला कारण आहे. संसारात एक प्रकारची का दुःखे आहेत ? चहूकडे इंगळ आहेत विश्रांती नाही, कोठे रात्रंदिवस तळमळ ही दुःखेच.

आणीक दुःखे सांगो मी किती । सकळ संसाराची स्थिति ।
न साहे पाषाण फुटती । भय कांप चित्तीं भरलासे ।। तु. ७०४

दुःखे हजारो प्रकारची आहेत. निर्जीव दगडापुढे संसाराची दुःखे सांगायला लागलो तर तो दुभंग होईल. मग तुम्ही दगडापेक्षा कठीण म्हणायला

हरकत आहे काय ? भोगणे सहन होत नाही, असे नाही म्हटले; ऐकणे सहन होत नाही. ती सगळी दुःखे तुम्ही–आम्ही पदोपदी भोगतो. पण मौज अशी आहे. की अनादी कालापासून भोगून भोगून संवयीने पचनी पडलेली दुःखे ही दुःखासारखी वाटतच नाहीत. संवयीचा परिणाम आहे.

दुःख शोकांच्या घाई । मारिलियाची मेचि नाहीं ।
हे सांगावया कारण काई । जे ग्रासिले माया ।। ज्ञा. ७।१०७

संवयीने पचनी पडले म्हणून दुःख हे दुःख असे वाटत नाही. तुम्ही हजारो प्रकारची दुःखे सांगता आणि आम्हाला तर दिसत नाहीत; तर नमुन्यादाखल फार दोन प्रकारची दुःखे सांगतो.

(१) उदा. तरुण पुरुष संसाराला लागला. त्याची धर्मपत्नी लावण्या-गुण कुळवती । आणि पतिव्रता ।'' अशी पतिसेवा करणारी. पतिसेवेत इतकी तत्पर की– थुंका पुढे आला तर ओंजळ पुढे करणारी. कर्मधर्मसंयोगाने कॉलऱ्याच्या साथीत पत्नी मेली. तो पेढे वाटील काय ? नाही हे दुर्दैव म्हणतात. उघडा पडला, समजूत घालतात. तो रडत असता. काय झाले रडायला ? तू का म्हातारा झाला ? का खुंटीवरचा कावळा आहेस. तरणा ताठा आहे. गौरवर्णाचा आहेस, पैसा पुष्कळ आहे, बायको म्हणजे का न मिळणारा पदार्थ आहे ? शीर सलामत तर पगड्या पचास ! अरे इचा बारावा झाला की तेराव्याला मोहतार टाकलाच. तो म्हणतो, 'बायको मिळेल. जमीन जुमला आहे म्हणून हुंडया सकट मिळेल. पण अशी का मिळायला गेली.' नाही तर घाल तिचं लोणचं आणि बैस चघळत. हे काय दुःखच.

(२) एक वयोवृद्ध मनुष्य. त्याचे तारुण्य गेल्यावर नवसा–सायासाने उतारवयात एकच मुलगा झाला. "वयसेचिये शेवटी '' मुलगा मोठा बुद्धिवान. एका खांबावर द्वारका म्हणण्यासारखे. पुढे होण्याची आशा राहिली नाही. अशा स्थितीत त्या मुलाची हृदयक्रिया बंद पडून एकाएकी मुलगा मेला. म्हातारा हंबरडा फोडून रडतो. शेजारी प्रेताची तयारी करतात. शिकाळी कोणी धरावी ? बापाने धरली पाहिजे. बाबा, असं कसं केलं ? लोक

म्हणतात काय उपयोग ? शिकाळी घ्या ! कशी धरू ? खाली वाक, आणि अशी घे. ' पित्या देखतां पुत्र मरे । पुत्रा देखतां पिता झुरे ॥ भा. २८।२८५ हे सर्व दुःखच.

(३) कल्पना करा, एखाद्याच्या घराला आग लागली. बोंब मारून सर्व गाव जागा केला. ते घर धनधान्यांनी भरलेले, रोखे पुडके, कागद कीर्द, खतावणी जमाखर्च मुदतीत आलेले हुकुमनामे वजवावयाचे होते. पण तुफान वारा सुटल्यामुळे निकाल लागला. हे काय दुःखच.

(४) शरीराला रोग झाला, पायाला नारू झाला व तो काढताना तुटला. मग काय त्या वेदना ! अशा स्थितीत त्याला कोणी विचारले, तर हसून देवाची दया आहे आणि असेच जन्मभर असावे असे वाटते का ? हे दुःखच !

आणीक रोगांचीं नांवें सांगों किती । अखंड असती जडोनियां ॥ ३ ॥
तु. ३१६६

अशी हजारो दुःखें आहेत. म्हणून महाराज म्हणतात

संसार दुःखमूळ चहूंकडे इंगळ । विश्रांति नाहीं कोठें रात्रंदिवस तळमळ ।
काम क्रोध शुनी पाठीं लागली ओढाळ ।
कवणा शरण जाऊं आतां दृष्टि देईल निर्मळ ॥ ३ ॥ ज्ञा. ७४५

इंगळ म्हणजे निखारे– ते कोणते ?

संसारसागरू गा भवदुःखाचें मूळ । जनवाद अंथरुण माजी केले इंगळ ।
इंद्रियें वज्रघातें तपे उष्ण वरी ज्वाळ ।
सोसिलें काय करूं दुर्भर हे चांडाळ ॥ ४ ॥ तु. ३५४

काम क्रोध सुख का देतात ! जनवाद–लोक अपवाद काय ?

ऐसा हा लौकिक कदा का राखवेना । पतितपावना देवराया ॥ तु. ३३४९

लोक का चांगले आहेत ? (आगे चला मादरचोद, पिछे चला तो बेहेनचोद, बरोबर चला तो बेटीचोद) अबी चलना कैसा ? कोणी कोणा

चांगले म्हणत असला तर दुसरा त्याच व्यक्तीची निंदा करतो. कुठपर्यंत लौकिक सांभाळाल ?

संसार करितां म्हणती हा दोषी । टाकितां आळसी पोटपोसा ।।तु.३३४९
कवडी कवडी माया जोडी । " पैसा नो घी, घीनो पैसा ।। '

त्यात एकादा परमार्थाला लागला तर "ओ हो" "आले हे" " आयद गबु, पैसा डबु " " आयजीच्या जीवावर बायजी उदार "

न करवे धंदा। आइता तोंडी पडे लोंदा ।। १ ।। तु. ३७६०

आयता तोंडी लोंदा पडतो मग कशाला धंदा करतील ?

आचार करितां म्हणती हा पसारा ।
न करितां नरा निंदितातो ।। तु. ३३४९

देवाची पूजा, गीतेचे पारायण, तुळशीला पाणी वगैरे असा आचार-संपन्न असला. त्याला उगच करून करून भागले आणि परमार्थाला लागले म्हणतात. बाबाचे देवघर म्हणजे कासाराचे दुकानच. बरे, देवपूजा नाही केली तर ' आचारभ्रष्टी सदा कष्टी ' म्हणतात.

संतसंग करितां म्हणती हा उपदेशी ।
येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ।। ३३४९
धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा ।
समर्थासि ताठा करिताती ।। ३३४९
बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ ।
न बोलतां सकळ म्हणती गर्वी ।।
भेटिसि नवजातां म्हणती हा निष्ठूर ।
येतां जातां घर बुडविलें ।। ३३४९
लग्न करूं जातां म्हणती हा मातला ।
न करितां जाला नपुंसक ।। ३३४९

नाही लग्न केले तर त्यास नपुसक म्हणतात.

निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ ।
पातकाचें मूळ पोरवडा ।। ३३४९

निपुत्रिकाला 'चांडाळ आहे' म्हणतात. का पोर कुठे आहे ? आणि होईल कुठून ? दहा-पाच मुले असली एखाद्याला तर अरे, काय लेंढार, काय पाप केले ? असा हा लौकिक–

लोक जैसा ओक धरितां धरवेना । अभक्ता जिरेना संतसंग ।। ३३४९
तुका म्हणे आतां आइका वचन । त्यजुनियां जन भक्ति करा ।। ३३४९

इंद्रिये वज्रघाते–

जिव्हा रसांकडे वोढी । तृषा प्राशनालागीं तोडी ।
शिश्नासी रतिसुखाची गोडी । तें चरफडी रमावया ।। भा. ९।३१५
या विषयांवांचूनि कांहीं । आणिक सर्वथा रम्य नाहीं ।
ऐसा स्वभावोचि पाहीं । इंद्रियांचा ।। ज्ञा. २।१२०
त्वचा पाहे मृदुपण । उदर वांछी पूर्ण अन्न ।
श्रवण मागती गायन । मधुरध्वनी आलाप ।। भा. ९।३१६
घ्राण उद्यत परिमळा । रूप पहावया वोढी डोळा ।
हस्त वांच्छिती खेळा । नानाळीळा स्वभावें ।। भा. ९।३१७
पाय वांच्छिती गती । ऐशीं इंद्रियें ओढा वोढिती ।
जेवीं एका गेहपती । बद्धता सवती तोडिती ।। भा. ९।३१८

अशी प्रपंचात हजारो प्रकारची दुःखे आहेत.

प्रपंचामाजी असते सुख । तरी कां त्यजिते सनकादिक ।
द्वैत तितुकें केवळ दुःख । परम सुख अद्वैतीं ।। भा. १०।२४७
प्रपंची जरी सुख जोडे । तरी कां सोविती गिरीकडे ।
राज्य टाकुनी गेले थोडे । ते काय वेडे म्हणावे ।। भा० आनं. ९४
तरि कां नेणते होते मागें ऋषी । तीही या जनासी दुराविले ।। ११२१
कंदमुळें पाला धातूच्या पोषणा । खाती वास राना तरी केला ।। ११२१

त्यांनी का त्याग केला ? ते का नामर्द होते ? संसाराचे अनित्यत्व व दुःखरूपत्व सांगण्यात मृत्युलोकाचेच अनित्यत्व व दुःखरूपता सांगितली.

पर्यायाने आणि आडपडद्याने कशाला ? मग आता साक्षात् मृत्युलोकातले भगवत् उक्तीने अनित्यत्व व दुःखरूपत्व सांगतो.

किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ।। गी. ९।३३

अर्जुना, ज्या मृत्युलोकात तू जन्माला आलास तो कसा आहे. तर "अनित्यं" तसाच "असुखं" म्हणजे दुःख. मृत्युलोकाची अनित्यता मृत्युलोकापुरतीच नाही. एकदम सत्य लोकापर्यंत जाऊन थडकली.

जेथींचिये अनित्यतेची थोरी । करिता ब्रह्मयाचें आयुष्यवेरी ।
कैसें नाहीं होणे अवधारी । निपटूनियां ।। ज्ञा. ९।५०६

सृष्टीकर्ता ब्रह्मदेव त्याच्या आयुष्यापर्यंत जाऊन भिडली. मृत्युलोकात असताना

कां शत एक जन्मां । जो जन्मोनि ब्रह्मकर्मा ।
करी तोचि ब्रह्मा । आन नोहे ।। ज्ञा. १५।३१
आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ।। गी. ८।१६
कैसें थोरिवेचें मान पाहे पां । तो सृष्टिबीजाचा साटोपा ।
परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहला ।। ज्ञा. ८।१६६

केवढा थोर ब्रह्मदेव की जो सृष्टिबीजाचा कठार, पण अनित्यतेची केवढी थोरी की– त्यालाही पुनरावर्ती चुकली नाही.

कां लागोनि डोळा उघडे । तंव कोडीवरी घडे मोडे ।
तें नेणतया तरंगु आवडे । नित्यु ऐसा ।। ज्ञा. १५।१३४

तुम्हा आम्हाला कुठे कळते ? कालचाच वंकटस्वामी वाटतो. कालचा नवा आला. कालचा– आज तर फार चिरंजीव झाला. पण कीर्तनाला आरंभ करणारा वंकट नाही. नित्य वाटतो का ? तर होण्याजाण्याचा वेग अती म्हणून नजर राहात नाही. म्हणून भ्रमाने वाटतो.

मृत्युलोकी आम्हा

पैं भिंगोरी निधियें पडली । ते गमे भूमीसी जैसी जडली ।।
ऐसा वेगातिशयो भुली । हेतु होय ।। ज्ञा. १५।१३६

ती फिरत असून स्थिर वाटते !

हें बहु असो झडती । आंधारे भोवंडिता कोलती ।
ते दिसे जैसी आयती । चक्राकार ।। ज्ञा. १५।१३७
तैसीचि ययाची स्थिती । नासत जाय क्षणक्षणाप्रती ।
म्हणौनि ययातें म्हणती । अश्वत्थु हा ।। ज्ञा. १५।११४

याला अश्वत्थ म्हणण्याचे काय प्रयोजन ?

न श्वः तिष्ठतीति अश्वत्थः ।। उद्या पावेतो जो राहू शकत नाही, क्षणभंगुर, क्षणिक या दृष्टीने अश्वत्थ म्हटले आहे. पिंपळ या अर्थाने अश्वत्थ न म्हणता क्षणिक या अर्थाने म्हटले आहे. आता यात काय दुःख ? ज्ञा. म. सांगतात–

बाप दुःखाचे केणें सुटलें । जेथ मरणाचे भरे लोटले ।
तिये मृत्युलोकीचिये शेवटिले । येणें जाहालें हाटवेळे ।। ज्ञा. ९।४९६

या मृत्युलोकात माल सर्व दुःखाचा, गिऱ्हाईक सर्व सुखाची. कशी घेवदेव जमणार ? मिरच्यांच्या बाजारात पेढे कसे मिळतील ? घाण सर्व तेथे; या मृत्युलोकात जिकडे तिकडे दुःखच, सुख नाहीच. मग सुख मिळले कुठून ?

आतां सुखेंसि जीविता । कैची ग्राहिकी कीजेल पांडुसुता ।
काय राखोंडी फुंकिता । दीप लागे ।। ज्ञा. ९।४९७

मृत्युलोकात सुखाची साधने म्हणून जे जे विषय आहेत ते सगळे दुःखदायक; परमात्मा दृष्टान्ताने सांगतात. एक मनुष्य व्यवहारशून्य. त्यांनी मरू नये, अमर व्हावे या इच्छेने बचनाग आणला; सोमल, अफू, कन्हेरीच्या मुळ्या, पारा, मोरचूत सगळे विष वाटून रस काढला व अमृत नाव देऊन अमर होण्याकरिता प्याला तर अमर होईल का ? अमर होण्या-ऐवजी मरणार.

अगा विषयांचे कांदे वाटूनी । जो रस घेइजे पिळूनी ।
तया नाम अमृत ठेऊनी । जैसे अमर होणे ।। ज्ञा. ९।४९८
विषाचे अमृत ठेवूनियां नाम । करितो अधम ब्रह्महत्या ।।५।। तु.३१५८
तेंवि विषयांचे जें सुख । तें केवळ परम दुःख ।
परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ।। ज्ञा. ९।४९९

बायका, पैका, मुले या प्रत्येक विषयांचे आरंभी, मध्ये आणि शेवटी दुःखच.

एऱ्हवीं विषयीं काइ सुख आहे । हें बोलणेंचि सारिखें गोहें ।
तरी विद्युत्स्फुरणें कां न पाहे । जगामाजीं ।। ज्ञा. ५।११३

आरंभी अर्जुनाचे, मध्ये रक्षणाच, शवटी गेल्याचे.

सुखाने काय मिळते ? काहीच मिळत नाही.

बायको सुखाने का मिळते ! गरिबाला मिळत नाही.

कां रिणावरी विवाहो । विस्तारिला ।। ज्ञा. १८।७९५

लक्ष्मी घरात आणायची म्हणून घर गेले, जमीन गेली, सर्व गेले. मग आता लक्ष्मी म्हणावे का अवदसा म्हणावी ? लग्नाचे कर्ज फेडता फेडता नाकी नव येते. पाच दिवस लग्नात मोठे सुख सोहळे. घराला लागूनच मांडव पण मंडपात कड्यावर बसून येतात. मोठा का असेना. घोड्यावर नाही तर पड्याच्या गाडीवर. पुढे वाजंत्री. नंतर घोड्यावर बसून मिरवणूक पुढे दोन-चारशे माणसे, न्हावी चवरी फिरवितो. काय वाटत असेल ! लग्न झाल्यानंतर सर्व निसटते.

स्त्री हाती धरितां देख । वाढे प्रपंचाचें थोर दुःख ।
गृह पाहिजे आवश्यक । भोगार्थ देख स्त्रियेच्या ।। भा. ९।२०३

देवळात राहण्याची सोय आहे का आता ! बायकोला घेऊन धर्मशाळेत का चालेल ! घर पाहिजे. सगळे लागते. त्याला एक दोन का चार पोरे झाली. मग ते म्हणतात, स्वामी तुमचे बरे, जेथे पडले मुसळ तेथे क्षेम कुशल. आमचे पाहिले का ? चीर, पीर. बायको मेली तेव्हा दुःख. पैसा हा सुखाने का मिळतो ? घाम गाळावा लागतो.

रातिदिवस निजनिकट । मरणेंसी घेतां झटे ।
कवडीची प्राप्ती न भेटे । प्राणान्त कष्टे द्रव्य जोडे ॥ भा. ३।२४५

सुखाने मिळत नाही. म्हणजेच अर्जुनाच्या दुःख. हंगामाच्या दिवसांत तीन चार वाजेपर्यंत तुकडा मिळत नाही.

पुष्कळ पैसा मिळाला. सुखाचा ढेकर देऊन बसला का ? पुष्कळ पैसेवाला सुखी नसतो. त्याच्या दृष्टीने गरीब सुखी असतो. दार उघडे टाकून घुरर घोरत पडतात. चोर येऊन काय नेतील ? आवजाव घर तुम्हारा. ज्यांच्या-जवळ पैसा त्यांना सुखाची झोप नाही.

साठे[illegible] पडतां । व्यापी चिंता तळमळ ॥ तु. ३०६४

फिर्यादी दाखल करायच्या; हुकुमनामा बजावणीला पाठवायचा. त्यांत दुष्काळ पडलेला. पैसावसुलीचा चिंता. आत पैसा गेला तर त्याची धाकधूक चाललेली. अशात मध्यरात्रीला पाच चार चोर आले. आले ते एक बसला उरावर, दुसरा हातात सुरा घेऊन समोर उभा; तिसऱ्याने किल्ल्या सोडून घेतल्या. तिजोरी गच्च भरलेली. ते चोर दागदागिने, सोने-नाणे नोटांची पुडकी बाहेर काढतात. हा डोळ्यांनी पहात असतो. गुदगुल्या होत असतील का ? चिडीचुप. नहीं तो देखा सुरा. सकाळी पेढे वाटेल का !

नेणि विषयांचें जें सुख । तें केवळ परम दुःख ।
परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ॥ ज्ञा. ३।४३३

करावे काय या मूर्खांना. विषयांचे सेवन केल्यावाचून यांचे भागतच नाही. मृत्युलोकांतले एक एक काय काय सांगू ?

कां शीस खांडूनि आपुलें । पायींचां खतीं बांधिलें ।
तैसें मृत्युलोकींचें भलें । आहे आघवें ॥ ज्ञा. ९।५००

पायाचे बेंड बरे होईना. एकाने रामबाण औषध सांगितले. दुःखच रहाणार नाही. तो म्हणाला, तरवार आहे काय ? तरवार पाजळून घेतली.

घराची कडी लावून तरवारीने डोके कापा व वेंडावर बांधा. हा बरा होण्याचा उपाय का मरण्याचा उपाय ?

म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं ।
कैंची सुखनिद्रा आंथरुणी । इंगळांच्या ।। ज्ञा. ९।५०१

खैराच्या लाकडाचा प्रखर निखारा त्याचे आंथरूण घालून निजला तर झोप येईल काय ? का होरपळून निघेल ?

ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ।। २८०२

जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदयो होय अस्तालागीं ।
दुःख लेऊनि सुखाची आंगी । सळित जगाते ।। ज्ञा. ९।५०२

चंद्राला अंगरखा शिवण्याचे काम एका शिप्याला दिले. माप घेतल्यानंतर उशीर करण्याची सोय नाहीं, का ? चंद्राला क्षय-वृद्धि म्हणून.

सुख-दुःख ही दोन्ही मायेची मुले. दुःखाने आईकडे तक्रार केली की सर्व जग सुखाच्या पाठीमागे धावते. मला कोणी विचारीत नाही. आईने सुखाला आपले आंगडे दुःखाला देण्याला सागितले. दुःखाने सुखाचे आंगडे घालून सर्व जगाला छळायला लागले. असायचे दुःख पण सुखाचा नुसता भास.

जेथ मंगळाचां अंकुरीं । सवेंचि अमंगळाची पडे पारी ।
मृत्यु उदराचा परिवरीं । गर्भु गिंवसी ।। ज्ञा. ९।५०३

मंगळ हें नोहे कन्यापुत्रादिक । राहिला लौकिक अंतरपार ।।३।।
तु. ३६५३

एका धनिकाला मुलगा झाला, बारशाचा थाट, चौघडा वगैरे वाजंत्री, पेढे, बासुंदी, भोजनाचा समारंभ. मोठा गाजावाजा. तेराव्या दिवशी मुलगा मेला, मग त्या वेळेला बाहेरची वाजंत्री नको.

ऐसी लोकींची जिये नांदणुक । तेथ जन्मले आथि जे लोक ।
तयांचिये निश्चितीचें कौतुक । दिसत असे ।। ज्ञा. ९।५०७

वाटे या जनाचें थोर वा आश्चर्य ।
न करिती विचार का हिताचा ।। तु० २७११
काय मानुनियां राहिले निश्चिती ।
काय जाब देती यमदूतां ।। तु० २७११

जन्माला येऊन काही केले नाही. दुसरे असे की या मृत्युलोकातले व्यवहार तरी सरळ आहेत काय ?

एऱ्हवीं करेयाचां ठामीं चांग । तें तयासि कैनें नीट आंग ।। ज्ञा. १६।२९३

उंटाकडे पहा. तोंड, मान, पाय, पाठ तरी सरळ आहे काय ? पाठ म्हणजे 'पीराची मदार.' त्याचे मुतणे तरी सरळ आहे काय ?

पैं दृष्टादृष्टीचिये लोडी । लागीं भांडवल न सुटे कवडी ।
जेथ सर्वस्वे हानि तेथ कोडी । वेंचिती गा ।। ज्ञा० ९।५०८

पैसा खर्चून जेथे कल्याण आहे अशा सत्कर्माला पैसे देणार नाही. जेथे पैशाचा खर्च व्यर्थ अशा कामाला कोट खर्च. उदा० मुलाचे लग्नाला पाच हजार रुपये खर्च. कर्ज झाले तरी चालेल; गाढवाने शेत खाल्ले. पाप ना पुण्य. धर्माची बाब, कल्याणाची बाब तेथे कवडा देणार नाही. म्हणतो– दिवस कसे आहेत ते ! माहीत नाही का ? नाटक, सिनेमाकडे कसा खर्च करतो.

जो बहुवें विषयविलासें गुंफे । तो म्हणती उवायें पडिला सापे ।
जो अभिलापभारें दडपे । तयातें सज्ञान म्हणती ।। ज्ञा० ९।५०९

दुसऱ्याचे धन उपटणारा हा शहाणा. अहारे शहाणा !

जयाचें आयुष्य धाकुटें होय । बळप्रज्ञा जिरोनि जाय ।
तयाचे नमस्कारिता पाय । वडिल म्हणुनि ।। ज्ञा. ९।५१०

चोथा झाला त्याला वडील म्हणतात. बुद्धिमान पोराला धाकटे म्हणतात. वास्तविक म्हाताऱ्याची दहाच वर्षे राहिली. पोराची पन्नास वर्षे राहिलीत. सर्व उलटच आहे.

जंव जंव बाळ बळिया वाढे । तंव तंव नाचती कोडें ।
आयुष्य निमाले आतुलियेकडे । ते ग्लानीचि नाहीं ।। ज्ञा. ९।५११

आयुष्य कमी झाले हे कळत नाही. प्रत्येक वर्षाला वाढदिवस करतात. वास्तविक खुंटदिवस करायला पाहिजे. पन्नास वर्षे संपून एकावन्नावे लागले म्हणून वाढदिवस. वास्तविक रडायला पाहिजे पन्नास वर्षे कमी झाली म्हणून.

जन्मलिया दिवसदिवसें । हों लागे काळाचियाचि ऐसें ।
कीं वाढतो करिती उल्हासें । उभविती गुढिया ।। ज्ञा. ९।५१२
अगा मर हा बोलु न साहती । आणि मेलिया तरी रडती ।
परि असतें जात न गणिती । गहिंसपणें ।। ज्ञा. ९।५१३
अहा कटकटाहें वोखटें । मृत्युलोकोचें उफराटें ।
एथ अर्जुना जरी अवचटें । जन्मलासी तूं ।। ज्ञा. ९।५१५

बोलणे तरी सरळ आहे काय ?

एखादा अनवाणी का चालला त्याला म्हणतात :– 'पायामध्ये जोडा घाल. अंगात अंगरखा घाल.' घरात जाते असते, ते कुठे जाणार ! त्याला जाते म्हणतात. दोन मित्र बरोबर चालले. पैकी एक म्हणाला 'मी लघवी करून येता.' तो म्हणतो बाटली कुठे आहे. टाकतो म्हणावे, तर घेतो म्हणतात. असो. या मृत्युलोकात प्रेम ठेवण्यासारखे काही नाही. म्हणून,

तरि झडझडोनि वहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग ।
जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ।। ज्ञा. ९।५१६

या मृत्युलोकांत नित्यसुख असते तर तेथे घे म्हटले असते. "इये भक्तीचिये वाटे लाग ।।' मग माझ्या स्वरूपी प्राप्त होशील. भगवद् उक्तीवरून मृत्युलोक अनित्य, दुःखरूप कळून आले असेल. ही जी भगवंताची उक्ती तुकाराम महाराजांच्या पुढे चित्रासारखी रेखाटलेली होती, या रहस्याला चांगल्या रीतीने जाणत होते. म्हणून ते म्हणतात,

मृत्युलोकीं आम्हां आवडती परी । नाहीं एका हरिनामें विण ।। १ ।।

या मृत्युलोकांत विचाराने पाहिले तेव्हा त्यांना असे दिसून आले की या मृत्युलोकांत प्रेम ठेवण्यासारखे काही नाही. प्रेम ठेवण्यासारखे असेल तर एक हरिनाम. "नाही एका हरिनामें विण" एक हरीच्या नामावाचून संपूर्ण मृत्युलोकात दुसरा प्रकार आवडत नाही.

प्रपंच मात्र जशा स्वरूपाचा आहे, तसे त्याच्या स्वरूपाला सत्संगतीने, सच्छास्त्राचे अध्ययन करून जाणले. या संसाराचा मिथ्यापणा अपरोक्ष अनुभवाला आला. म्हणून ते म्हणतात,

मृत्युलोकीं आम्हां आवडती परी । नाहीं एका हरिनामेविण ॥ १ ॥

एऱ्हवी समाजाकडे पाहिले, तर काय दिसून येते ? पुष्कळसे लोक विषयांवर प्रेम करताना दिसून येतात. नुसते कोरडे प्रेम करीत नाहीत तर विषयाकरिता मरतात.

अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषयसुखचि परमावधि ।
जीव तैसा उपाधि । आवडे लोकां ॥ ज्ञा. ४।२१

स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयी पडिभर अतिशय ॥ १५४४

विषय पुष्कळांना आवडणारे आहेत. विरक्त व महात्मा सोडून कोणा-चेही प्रेम हरिनामावर दिसून येत नाही.

भजन नावडे श्रवण । धांवे विषय अवलोकून ॥ ३ ॥ १७८२
विषय ओढीं भुलले जीव । आतां यांची कोण करील कीव ।
नुपजे नारायणीं भाव । पावोनी ठाव नरदेह ॥ १ ॥ तु. ७०१

घरावर, गाई, म्हशी, घोडे, मुले, पैसा, बायकोवर किती प्रेम असते ?

ठेला बेडूक कुंडी । मशक गुंतला शेंबुडीं ।
ढोरू सबुडबुडीं । रुतला पंकी ॥ ज्ञा. १३।७८३
तैसें घरींहूनि निघणें । नाहीं जिवितें मरणें ।
जया साप होऊनि असणें । भाटीं तिये ॥ ज्ञा. १३।७८४

मग घरे हे झोपडं का असेना, काही माणसे घरकोंबडी.

महापुरुषाचें चित्त । जालिया वस्तुगत ।
ठाके व्यवहारजात । जयापरी ॥ ज्ञा. १३।७८९
तैसा स्त्रीदेही जो जीवें । पडोनियां सर्वभावें ।
कोण मी काय करावे । कांहीं नेणें ॥ ज्ञा. १३।७९०
हानि लाज न देखे । परापवादु नाइके ।
जयाचीं इंद्रियें एकमुखें । स्त्रिया केलीं ॥ ज्ञा. १३।७९१

चित्त आराधी स्त्रियेचें । स्त्रियेचेनि छंदें नाचे ।
माकड गारुडियाचे । जैसें होय ।। ज्ञा. १३।७९२

हे प्रेम सख्या आईवर, बापावर, भावावर नसते. बायको आली की– हा मोरासारखा थयाथया नाचतो.

'अग माझे बायले आणि तुला सर्व वाहिले.'

बायको म्हणजे तुळजापूरची भवानी आणि हा मोन्या. मुलांवर किती प्रेम असते ?

आंधळे, पांगळे मुके अनगंळ । जिवापरीस बाळ पढिये माते ।।
पैशावर किती प्रेम ?

लोभियाचें मन जैसे । जीव जावो परि नुमसे । ठेविला- ठावें ।।
ज्ञा. १३।२०२

याप्रमाणे मृत्युलोकांत निरनिराळ्या विषयांवर प्रेम करणारे आहेत.

ऐसा कोणी नाही हें जया नावडे । कन्या पुत्र घोडे दारा धन ।।
ज्ञा. १३।७०२

या पृथ्वीतलावर विरक्त सोडून कोण आहे की ज्याला हे आवडत नाही ? कन्या, पुत्र, दारा, धन आणि घोडे यासाठी ते मरतात.

जीवु तैसा उपाधि । आवडे लोकां ।। ज्ञा. ४२१
लोक किती प्रेम करतात–

आणि विषयांची गोडी । जो जीतु नेला न सांडी ।
स्वर्गीही खावया जोडी । येथीनिचि ।। ज्ञा. १३।७०२
जो अखंड भोगा जचे । जया व्यसन काम्यक्रियेचें ।
मुख देखोनि विरक्ताचे । सचैल करी ।। ज्ञा. १३।७०३

पुष्कळसे विषय आहेत आणि लोक त्यांच्यावर प्रेम करतात; परंतु आमचे महाराज म्हणतात–

मृत्युलोकीं आम्हां आवडती परी । नाहीं एका हरिनामेंविण ।। १ ।।

लोकांच्या चालीच्या विरुद्ध प्रतिपादन करतात असे दिसेल; पण नाही.

विषय तु. म. ना का आवडत नाहीत व आम्हाला का आवडतात ? ज्या दृष्टीने तुकाराम महाराजांनी त्याकडे पाहिले तर तुम्हीही असेच म्हणाल, " मृत्युलोकीं आम्हां आवडती परी ।" त्या दृष्टीने तुम्ही आम्ही पाहात नाही. तुम्ही म्हणाल, तुकाराम महाराज ज्या दृष्टीने पहातात त्याच डोळ्यांनी आम्ही पाहातो. तु. म. सगळ्या प्रपंचमात्राकडे कोणत्या दृष्टीने पाहात होते ?

हें विरक्तांचिये दिठीं । जैं न्याहाळिजे किरीटी ।
तैं पांडुरोगाचिये पुष्टी । सारिखे दिसे ॥ ज्ञा. ५।११९

अविचारी दृष्टीने विषयांकडे पाहू नका ! विरक्त पुरुषांस– ब्रह्मलोकापर्यंत असलेल्या विषयांविषयी वैराग्य उत्पन्न झालेले असते.

ब्रह्मादि स्थावरांतेषु वैराग्य विषयेष्वनु ।
यथैव काकविष्ठायां तद्धि निर्मलम् ॥

अशा विरक्ताच्या दृष्टीने पाहिले तर तुम्हाला ते विषय कसे दिसतील ?

तैं पांडुरोगाचिये पुष्टी । सारिखे दिसे ॥
पांडुरोगें आंग सुटलें । तें तयाचि नांवें खुंटलें । ज्ञा. १३।७४६

क्षयी मनुष्य वठत वठत जातो. मांस कुणीकडे जाते याचा पत्ताच नाही. पंडुरोग याच्या उलट–जसजसे मरण जवळ येईल तसतसे शरीर फुगत जाते. एकाच्या मुलाला पंडुरोग झाला होता. रोज उपाय करून बरा होईना.

हां गा रोगु कायी रोगिया । १८।१२९७

स्नेही घरी आला. मुलगा लहानपणी पाहिला होता. त्याला ओळखता आले नाही. तो विचारू लागला, हा मुलगा कोणाचा ? अहो, तुम्ही या मुलाला कडेवर घेऊन खेळवले. तो म्हणाला, मुलाने बरेच अंग धरले आहे; पूर्वी पतंगी काटकुळा होता. मुलाचा बाप म्हणाला, अहो, अंग धरले नाही; तर सोडायची वेळ आली आहे. तु म. नी विषयासक्त लोकांच्या दृष्टीने

विषयांकडे पाहिले नाही. तर विरक्ताच्या दृष्टीने विषयाकडे पाहिले.

वाटलें हें चित्त प्रपंचापासूनि । वमन तें मनीं बैसलेंसें ॥ २ ॥
सोनें रुपें आम्हां मृत्तिकेसमान । माणिक पाषाण खडे जैसे ॥ ३ ॥
तुका म्हणे दिसतील नारी । रिसाचियापरि आम्हा पुढें ॥ ४ ॥

पहिले कडवे सोडून तीन कडव्यांतून तु. म. कडकडीत वैराग्य व्यक्त करतात. तात्पर्य, तु. म. नी अखिल मृत्युलोकांकडे विरक्ताच्या दृष्टीने पाहिले. मृत्युलोकाचे अनित्यत्व व दुःखरूपत्व त्यांना दिसून आले. म्हणून एका हरिनामावाचून दुसरे काही आवडत नाही. आवडत असेल तर एक हरीचे नाम. महाराजांचे नामावर किती प्रेम होते !

माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥ तु. ४०१६

महाराजांना भगवंताचे नाम फार आवडत होते. नामाच्या ठिकाणी आवडण्यासारखे आहे काय ? नाम तरी मृत्युलोकातले ना ! जसे अन्य पदार्थ तसे नाम. मग त्याच्यावर प्रेम करण्यासारखे काय ?

नाम जरी मृत्युलोकातले आहे, तरी पण –

अवघाचि आकार ग्रासियेला काळें । एकचि निराळें हरिचें नाम ॥
तु. ३९२५

मृत्युलोकातील इतर पदार्थांप्रमाणे अनित्य व दुःखरूप नाही तर हरीचे नाम नित्य व सुखरूप आहे.

काळें खादला हा अवघा आकार । उत्पत्ति संहार घडामोडी ॥१॥
तु. ३४९३

न्याहाळी पां केवढा । पसरलासे चवडा ।
जो करूनिया माजिवडा । आकार गजु ॥ ज्ञा. १३।६४

या सगळ्या मृत्युलोकाला नाश आहे. पण हरिनामाला नाश नाही.

अंडज जारज स्वेदज उद्भिज वाटे । हरिनाम नाटें तें बरवें ॥ज्ञा.अ.१४९

या चार खाणींना नाश आहे. पण भगवन्नामाला नाश नाही.

जे नाटे तें नाम चित्तीं। रखुमादेवीपति श्रीविठ्ठलाचें ॥ ज्ञा. १४९
शरीर आटे संपत्ति आटे। हरिनाम नाटे ते बरवें ॥ ज्ञा. १४९

प्रत्यक्ष देखिजे आपण। देहादिकांचें नश्वरपण।
हें दुसरें परम प्रमाण। क्षणिकत्व जाण प्रपंचा ॥ भा. १९।१३८

नाशिवंत देह नासेल हा जाण। का रे उच्चारा ना वाचे नाम ॥ १ ॥
नाशिवंत देह जाणार सकळ। आयुष्य खातो काळ सावधान ॥
तु. ३६५२

या धनाचा न धरीं विश्वास। जैशी तरुवर छाया।
यातायाती न चुके तरी हे भोगिसील काहयां।
या हरिनामेंविण तुझें जन्म जातें वायां।
या लागीं वैकुंठनायाच्या तूं चिंती पायां ॥१२॥ ज्ञा. अ. १८९

आपल्या आयुष्यापर्यंत धन-संपत्ती राहील असा विश्वास धरू नको. ही संपत्ती म्हणजे माध्यान्हाची छाया आहे. एक वेळ श्रीमंती व एक वेळ आंबाबाईचा जोगवा (भीक मागण्याची पाळी).

तुका म्हणे धन। भाग्य अशाश्वत जाण ॥४॥ ३२५१
प्रारब्ध का पालथे पडले की-
नातरी उदासीने दैवें। संचकाचीं वैभवें।
जेथींचीं तेथ स्वभावें। विलया जाती ॥ ज्ञा. ११।४१२

कुणीकडे जातात पत्ता लागत नाही. आपण जमिनीत पुरून ठेवलेले असते. पण ते चळते. म्हणून ज्ञा. म. म्हणतात-

बापरखुमादेविवराचें नाम नाटे।
युगें गेलीं परि उभा विटे ॥ ४ ॥ ज्ञा. १४९

तात्पर्य संसारमात्राला जसा नाश आहे, तसा नामाला नाश नाही. म्हणजेच ते नित्य अविनाश आहे.

सत्य साचें खरें। नाम विठोबाचें बरें ॥ १ ॥ तु. २५३४

भगवंताचे नाम सत्य आहे असे त्रिवार सांगतात. त्रिवार सांगण्यात,

नामाचे नित्यत्व निश्चित करतात नाम जसे नित्य आहे तसेच ते स्वरूपाने सुखरूप आहे.

देह हा सादर पाहावा निश्चित । सर्व सुख येथें नाम आहे ॥ १ ॥
तु. ३८७७

हरीचे नाम नित्य आणि सुखरूप आहे. यावर शंका अशी येते संसाराला नाश का असावा व हरीच्या नामाला नाश का नसावा ?

**समाधान** :– प्रपंचाचा आश्रय कोण ?

नाहीं अज्ञानावाचूनि मूळ । ययाचें असिलेपण दवाळ ।
ऐसें झाड सिनसाळ । देखिलें जेणें ॥ ज्ञा. १५।१४०

प्रपंचमात्राला आश्रय आहे अज्ञान आणि ते अज्ञान ब्रह्मज्ञानाने नाशाला पावते म्हणून प्रपंचाला नाश आहे. आश्रयाचा नाश तोच आश्रयीचा नाश.

पडोनि गोलिया भिंती । चित्रांचीं केवळ होय माती ।
कीं पाहालिया राती । आंधारें उरे ॥ ज्ञा. १८।२६३

चित्रांना भिंत आश्रय व चित्र आश्रयी. प्रपंचाला आश्रय आहे अज्ञान. ते नाशाला पावले म्हणजे प्रपंचाचा नाश होतो. हरिनामाला नाश का नाही ? तर हरिनामाला आश्रय आहे हरीच. तो स्वरूपाने कसा आहे :–

सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला ।
कां गा हा दाखविला जगदाकार ॥ २ ॥ तु. १६०१

अथवा " ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ॥" परमात्म्याला नाश का नाही तर उत्पत्ती नाही म्हणून.

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ गी. २।२०

नामाचा आश्रय आहे सत्य आणि प्रपंचाचा आश्रय आहे अविद्या, अनित्य म्हणून प्रपंच अनित्य.

परी आश्रयो आकाशा । आकाशचि कां जैसा ।
या नामा नामी आश्रयो तैसा । अभेदु असे ॥ ज्ञा. १७।४०३
देखे आकाशा आणि अवकासा । भेदू नाही जैसा ॥ ज्ञा. ५।३०

मृत्युलोकी आम्हा

नामाचा व नामीचा अभेद आहे.

नामा म्हणे नाम ॐ काराचे मूळ । ब्रह्म तें केवळ विटेवरी ॥ ४ ॥
नाम. ६७०

म्हणून, यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालय: ॥ गी. १०।२६

नामजपयज्ञ तो परम । बांधू न शके स्नानादि कर्म ।
नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थे ॥ ज्ञा. १०।२३३

अभेद म्हणून तो जसा सत्य तसेच नामही सत्य. अर्थातच परमात्मा जसा सुखरूप तसे नामही सुखरूप.

सर्व सुखाचे आगर । बापरखुमादेविवर ॥ ४ ॥ ज्ञा. १
देह हा सादर पाहावा निश्चित । सर्व सुख एथे नाम आहे ॥ १ ॥
तु. ३८७७

नाम सत्य व सुखरूप आहे, म्हणून महाराज म्हणतात— मृत्युलोकात नामावाचून दुसरा कोणताही प्रकार आवडत नाही.

आम्ही नामाचें धारक । नेणों प्रकार आणीक ।
सर्व भावें एक । विठ्ठलचि प्रमाण ॥ तु. ८०७
नाही एका हरिनामें विण ॥ १ ॥

या उक्तीवर आणखी एक शंका व समाधान सांगतो. नाम सत्य असेल सुखरूप असेल पण त्याच्यावर प्रेम का म्हणून करावयाचे ? आम्ही नामावर प्रेम केले तर उपयोग तरी काय ?

नामाची आवडी तोचि जाणा देव । न धरी संदेह कांहीं मनीं ॥ १ ॥
तु. २५५५
कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥ १ ॥ तु. २४२१
जेथें कीर्तन हें नामघोष । करिती निर्लज्ज हरीचे दास ।
सकळ वोथंबले रस । तुटती पाश भवबंधाचे ॥ तु. ७२०

असे समजून नाम घेतले तर

ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देव ऐसा ॥ २ ॥
गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥ १ ॥ तु. ६६२

मग गोविंद ते काया। भेद नाही देवा तया ॥ २ ॥ तु. ५२९
तुका म्हणे आळी । जीवें नुरेचि वेगळी ॥ ४ ॥
कीटकासी भ्रमरत्व जोडे । हें तीव्रध्यानें, न घडतें घडे ।
विचारिता, दोन्हीं मूढं । जड जडें वेधिले ॥ भा. ९।२४३
भगवत्ध्यान नव्हे तैसे । ध्याता भगवद्रूपचि असे ।
ध्याने भ्रममात्र नासे । अनायासें तद्रूप ॥ भा. ९।२४४

विजातीयांची एकरूपता होते; मग सजातीयांची का होणार नाही ? नामावर प्रेम ठेवल्याने काय होते ! नामासारखा नित्य व सुखरूप होतो. याचे रहस्य, नामस्मरण करणारा ब्रह्मरूप होतो. नामस्मरणाने भ्रांतीचा नाश होऊन तो सुखरूप अशा आत्मस्वरूपाला प्राप्त होतो.

" भगवद्–ध्यान नव्हे तैसे ।" ध्याता हा मूळचा भगवद्रूपच आहे. ध्यानाने फक्त भ्रम निवृत्त होतो. म्हणून महाराज म्हणतात, " नाही एका हरिनामे विण " ज्ञा. म. देखील असेच म्हणतात–

गोड तुझें नाम विठो आवडलें मज ।
दुजें उच्चारितां मना वाटतसे लाज ॥ २ ॥ ज्ञाने अ. १५१
जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ॥ तु.२०७२

मात्र रडतराऊ घोड्यावर बसल्याप्रमाणे अथवा मारून–मुटकून मुसलमान होणे तसें नको. मोठ्या प्रेमाने, आवडीने त्या परमकृपाळू भगवंताचे नाव घ्यावे. सदाचरणाने राहून भजन करावे.

ते कसे करावे ?

(जय विठ्ठल जय विठ्ठल)

---

# म्हणउनि शरण जावे

म्हणउनि शरण जावें । सर्वभावें देवासी ॥ १ ॥
तो हा उतरील पार । भव दुस्तर नदीचा ॥ २ ॥
बहु आहे करुणावंत । अनंत हे नाम ज्या ॥ ३ ॥
तुका म्हणे साक्षी आलें । तरी केलें प्रगट ॥ ४ ॥

भूमिका:–कायेने, वाचेने, मनाने भगवंताला शरण का जायचे ते या अभंगात महाराज सांगतात. फलापेक्षावाचून कोणत्याही कर्माकडे मंद पुरुषाची सुद्धा प्रवृत्ती होत नाही. वेद व शास्त्र जीवाला मोठ्या कंठरवाने सांगतात की, त्या देवाला शरण जा. या संबंधाने वेदादिकांची एकवाक्यता तु. म. सांगतात.

वेद अनंत बोलिला । अर्थ इतुकाचि साधिला ॥ १ ॥ २१३७

वेदाचे ज्ञान गंभीर, व्यापक, अनंत आहे. वेदासारखा व्याख्याता जगात झाला नाही व पुढेही होणार नाही.

वेदु काय काय न बोले । अमृ० ७।१०७

जगतात ज्या ज्या गोष्टी दृष्टोत्पत्तीला येतात त्या सर्व वेदाने सांगितल्या. धर्माधर्माचा विचार, वर्णाश्रमाचा विचार, ज्ञानअज्ञान, कर्माकर्म, विहित–अविहित, आत्मानात्मविचार हे सर्व वेदांनी सांगितले. परंतु वेदाने आपल्या सर्व भाषणाचा निष्कर्ष काढला–

विठोबासी शरण जावें । निजनिष्ठा नाम गावें ॥ २ ॥ २१३७

सकळ शास्त्रांचा विचार । अंती इतुलाचि निर्धार ॥ २१३७

महाराज म्हणतात, मी शास्त्रे पुराणेही पाहिली

आणोनियां मना । अवघ्या धांडोळिल्या खुणा ॥ ७६७

पाहिलीं पुराणें । धांडोळिलीं दरुषणें ॥ २ ॥

वेदे रामायणे शास्त्रे पुराणे भारतें तथा ।
आदौ मध्ये तथा चांते हरिः सर्वत्र गीयते ॥ २

त्या विचाराने असाच निष्कर्ष निघाला, "विठोबासी शरण जावें ॥" जगद्गुरु शंकराचार्यांनीदेखील आपल्या विशाल बुद्धीने शास्त्रांचा पुनः पुन्हा धांडोळा घेतला.

आलोड्य सर्वशास्त्राणि विचार्य च पुनः पुनः ।
इदमेकं सुनिष्पन्नं ध्येयो नारायणः सदा ॥

सकळशास्त्रांचा विचार । अंतीं इतुलाचि निर्धार ॥ २१३७
अठरा पुराणीं सिद्धान्त । तुका म्हणे हाचि हेत ॥ ४ ॥

तात्पर्य, संपूर्ण वेदसूत्र, पुराणे, महात्मे मोठ्या कंठरवाने सांगतात की– त्या परमात्म्याला शरण जा. त्याचे फल काय ? ते अभंगाच्या दुसऱ्या कडव्यात सांगतात–

तो हा उतरील पार । भव दुस्तर नदीचा ॥ २ ॥

तरून जाण्याला अत्यंत कठीण अशी जी मायानदी तिच्यातून परमात्मा पार उतरील.

सत्संगतीने संसारदुःखाची जाणीव ज्याच्या अंतःकरणात उत्पन्न झाली आणि त्याविषयी जे रात्रंदिवस काळजी वाहतात त्यांना मुमुक्षू म्हणतात. संसाराचे दुःख तर मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वच भोगीत असतात. पण भोगीत असताना दुःख सवत असे वाटत नाही; त्याच्या निवृत्तीकडे कोणी प्रवृत्त होत नाही. ज्यांना सत्संगतीने संसारदुःखाची जाणीव उत्पन्न झाली आणि या संसारनदीतून तरून जाण्याची रात्रंदिवस काळजी वाहतात असे जे मुमुक्षू असतात, त्यांना आमचे महाराज सांगतात,

भवसागर तरता । कां रे करीतसा चिंता ।
पैल उभा दाता । कटीं कर ठेवूनियां ॥ १ ॥
त्याचे पायीं घाला मिठी ॥

भवसागर म्हणजेच संसारसमुद्र. तो इतका दुस्तर आहे की त्यापुढे पाण्याच्या सागराची काही किंमत नाही. पाण्याचे समुद्रातून बोटीने, जहाजाने सून जातात. पाण्याच्या समुद्रातून योगादिकांचे सामर्थ्याने बाहुबलानेही ता येईल. पण तसा हा भवसागर नाही.



संसारसिंधु हा दुस्तर । नुल्लंघवे उल्लंघितां पार
बहुत वाहविलें दूर । न लगेचि तीर पैलथडी ॥ ७४१
संसारसमुद्रातून पार होण्याकरिता कितीही उपाय करा. संसार–समुद्रातून तरून जाण्याकरिता ज्यांनी ज्यांनी उड्या घातल्या ते बुडून, फुगूनही वर आले नाहीत.

बुडाले तयांचा मूळ ना मारग । लागला तो लाग सांडूनिया ॥ ४ ॥
१८६९

यात किती बुडाले. स्वतःच्या सामर्थ्याने ज्यांनी उड्या घातल्या ते बेपत्ता झाले.

चालतां वाट पुढें भय वाटतें चित्तीं । बहुत जन गेले नाहीं आले मागुती ।
न देखों काय झालें कान तरी ऐकती ।
बैसलों संधी भागीं तुज धरुनी चित्तीं ॥ ३ ॥ तु. ३५०

बहुत जन गेले ते परत आले नाहीत. ते कुणीकडे गेले हे ऐकायलाही मिळाले नाही.

असा जरी हा संसार समुद्र तरून जाण्याला अत्यंत कठीण आहे. म्हणून पलीकडे कटीवर हात ठेवून उभा राहिलेला जो पांडुरंग त्याला शरण जा.

आड वाहे भीमा । तारावया देह आत्मा ।
पैलथडीयें परमात्मा । मध्यें राहीला पुंडलीक ॥ ५ ॥
या तिहींचें दरुषण । प्राण्या नाही जन्ममरण ।
पुनरपि आगमन । येथें बोलिलेंची नाहीं ॥ ६ ॥ ज्ञा. अ. ९०

मोगलाई, खानदेश, नाशिक, वऱ्हाडकडून येणाऱ्यांना "पैलथडिये" असेल पण वाकळीकडून येणाऱ्यांना परमात्मा "ऐलथडिये परमात्मा" असा अर्थ नाही. ज्या वेळी वाक्याचा अर्थ शक्यार्थाने लागत नसेल त्या वेळी लक्षार्थाने अर्थ लावावा. पैल म्हणजे मायेच्या पलीकडे.

जे सर्वांहीं जगा परौतें । जें एक सर्वही देखते ।
ते तच्छब्दें बोलिजे तें । पैल वस्तु ॥ ज्ञा. १७।३६९

जगात पुष्कळशी तीर्थे आहेत. पण चंद्रभागेसारखे तीर्थ, पंढरीसारखे क्षेत्र, आणि पांडुरंगासारखा देव कोठेही नाही.

ऐसी चंद्रभागा ऐसें भीमातीर । ऐसा विटेवर देव कोठें ॥३॥ २६५९
सर्वोत्तम तीर्थक्षेत्र आणि देव । शस्त्रांनीं हा भाव निवडिला ॥२६००
यद् गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥

म्हणजेच पंढरपूर. म्हणून महाराज म्हणतात– कां चिंता करता ? जा, आणि

त्याचे पायीं घाला मिठी । मोल नेघे जगजेठी ॥
भावा एकासाठीं । खांदा वाहे आपुल्या ॥२॥ २६७८

तुमच्याजवळून एक छदाम न घेतां या संसारातून पार उतरील.

तुका म्हणे फुकासाठीं । पायीं घातलिया मिठी ॥
होतो उठाउठी । लवकरीच उतार ॥४॥ २६६९
मागें उतरिले बहुत । पैलतीरीं साधुसंत ॥ ३ ॥
भवसिंधूचें काय कोडें । दावी वाट चाले पुढें ॥ १ ॥
तारूं मला पांडुरंग । पाय भिजों नेदी अंग ॥ २ ॥ ३६००
नको आतां पुसों कांहीं । लवलाहीं उसंती ॥
वचनाचा न करीं गोवा । रिघें देवा शरण ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपावंता । वहु चिंता दीनाची ॥ ४ ॥ तु. २५६३

अभंगाच्या प्रथम कडव्यामध्ये ज्या देवाला काया–वाचा–मनाने शरण गेले असता तो संसारसमुद्रातून पार उतरतो त्या देवाचा नामनिर्देश महाराजांनी केला नाही आणि देव तर रगड आहेत. देव, धर्म, जाती पुष्कळशा आहेत.

तेहतीस कोटी देव पुराणात आहेत.

तेहतीस कोटी देव, चामुंडा अष्टकोटी भैरव आहेत.

चंद्र, सूर्य, भैरोवा देव आहेत. मग आता यापैकी कोणा देवाला शरण जावे ? हीच गोष्ट आमचे महाराज अभंगाच्या तिसऱ्या कडव्यात सांगतात.

वहु आहे कृपावंत । अनंत हें नाम ज्या ॥ ३ ॥



महाराज म्हणतात, तो परमात्मा अत्यंत कृपाळू आहे. आणि अनंत हे नाम त्याला आहे. इतर दैवतें तर निर्दय आहेत.

सेंदरीं हेंदरी दैवतें । कोण तीं पूजी भूतें खेतें ।
आपुल्या पोटासीं रडतें । मागती शितें अवदान ॥ १ ॥

निष्ठुर कशावरून ?

आपुले इच्छे आणिकां पीडी । काय तें देईल वराडी ।
कळों ही आली तयाची जोडी । अल्प रोकडी बुद्धी अधिरा ॥२॥ ३८०

आमचा देव असा लागला आहे का कोणाच्या पाठीमागे ?

उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी ।
तुळशीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥ १ ॥ २६८५

षड्गुणऐश्वर्यसंपन्न असून देव अत्यंत कृपाळू आहे. भगवंताच्या ठिकाणी प्राणिमात्राविषयी दया काय सांगू ?

देवा तूं कृपाकरुणा–सिंधु । होसी मायवाप आमचा बंधु ।
जीवन सिद्धी साधन सिंधु । तोडिसी भवबंधु काळपाश ॥ ७०६
देवा तूं आमचा कृपाळ । भक्तप्रतिपाळ दीनवत्सल ।
माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ॥ ७१०

अशी कृपा मायबापाचे ठिकाणी सुद्धा नाही.

मायबापें सांभाळीती । लोभाकारणें पाळिती ॥ १ ॥ ३७३९

आईबाप मुलाला जन्म देतात पाळतात, पोसतात, पण निरपेक्ष नाही. पाळतात पण लोभ असतो. बापाला व आईला वाटते. चांगले वाढवले, वागवले, शिकवले तर म्हातारपणी सांभाळील.

मनासारीखें न होता । बाळकासी मारी माता ॥ ३ ॥
तुका म्हणे सांगू किती । बाप लेकासी मारीती ॥ ४ ॥ तु. ३७३९

मुलगा जरा बापाच्या विरुद्ध गेला आणि बाप पाणीदार का असला तर बिलकुल सहन होत नाही. पहिल्या कुटुंबाचा मुलगा असला आणि कुटुंब वारले; मग दुसरे केले. तिचे आणि त्या मुलाचे का जमले नाही, तर ती आपल्या पतीला महावाक्याचा उपदेश करते.

प्रतारासीं भार्या बोले गुजगोष्टी । मजऐसी कष्टी नाहीं दुजी ।।२९५८
वेगळें निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ।। २९५८

तो पोराला म्हणतो, तिचे आणि तुझे काही जमत नाही. तू आपले रांडरू घे आणि चालता हो. तुझा दमडा अजून माहीत नाही. ही सर्व पठ्ठ्याने मिळविली आहे.

अनंत कोणाला म्हटले आहे ?

अनंत म्हणती माझीया स्वामीतें । अनंत गुण त्यातें म्हणोनियां ।।
नाम. ३८४

सत्य ज्ञानानंत गगनाचें प्रावर्ण । नाहीं रूप वर्ण गुण जेथें ।। ज्ञा. ३

तो हा रे श्रीहरी पाहिला डोळेभरी ।

महाराज जे हे विधान करतात, ते कशावरून ? शास्त्र प्रतीती, आत्मप्रतिती का गुरुप्रतीती हे शेवटच्या कडव्यात सांगतात.

तुका म्हणे साक्षी आलें । तरी केलें प्रगट ।

अनुभवे आले अंगा । तें या जगां देतसें ।। ३४२३

नव्हती हाततुकें बोल । मूळ ओल अतरींचो ।। २ ।।

सगळ्यांमध्ये आत्मप्रीतीती श्रेष्ठ आहे.

ऊर्ध्वमुखें आळविला सोऽहं शब्दाचा नाद ।
अरुप जागविला दाता घेऊनि छंद ।
घेऊनि आला दान निजतत्त्व निजबोध ।
स्वरूपीं मेळविलें नाव ठेवियेला भेद ।। ४ ।। ३५३

वर मुख करून आळविले; अंतःकरण वृत्तीचे मुख वर केले. म्हणजे वृत्ती अंतर्मुख केली. ऊर्ध्व कोण आहे ?

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् । गी. १५।१

" सोहं " या शब्दाने आळविले व अरूप जो परमात्मा त्याची करुणा भाकून जागविले. त्या परमात्म्याला माझी दया आली. मग निजतत्त्व निजबोध मला दान देण्याकरिता घेऊन आला व मला स्वरूपी मिळवले.

काढूनि बाहेर ठेविली निराळा । कवतुक डोळां दाखविलें ।।१।।२११६



मायाजाळात बुडत असलेला त्या मला काढून वेगळे ठेवले. अशी माझ्यावर दया केली. काम, क्रोध, काळ, माझ्या नावाने लागले शिमगा करायला. मी त्याचे गिन्हाईक गेलो म्हणून,

रडती रात्रंदिवस काम क्रोध माया । म्हणती हाय हाय यमधर्म ।। ४०५१

परमात्म्याने अशी दया केली. यमधर्म आपले उर बडवून घेऊ लागला. याप्रमाणे माझ्या अनुभवाला आले म्हणून.

तुका म्हणे साक्षी । आलें तरी केलें प्रगट ।।

**भावार्थ समाप्त**

**व्याख्यान–** या अभंगात सांगण्याचा प्रतिपाद्य विषय पुष्कळ आहे. त्यात मुख्यत्वेकरून दोन गोष्टी आहेत.

(१) भवनदी म्हणजे काय ? व ती तरून जाण्यास कशी कठीण झाली ?

(२) दुसरी– परमात्मा हा भवनदीतून पार कसा करतो.

भवनदी म्हणजे काय हे प्रथम सांगावयाचे आहे. भवनदी म्हणजे मायानदी. शब्द जरी भिन्न भिन्न असले तरी एकाच अर्थाचे सूचक आहेत त्या मायानदीचे उगमस्थान स्वतः परमात्माच सांगतात.

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ।। गी. ७।१४

या श्लोकाचा अभिप्राय ज्ञानेश्वर महाराजांनी नदीच्या रूपकाने बहारदारीचा सांगितला आहे. ज्ञा. म. नी नदीचेच रूपक का केले ? त्यांना श्लोकात आधार मिळाला. श्लोकात " तरन्ति ते " हे पद आहे. या पदाच्या आधारावरून नदीचे रूपक केले आहे. कारण तरणे हे नदीवरच होते. या नदीचे उगमस्थान कोण आहे ? ज्या मोठमोठ्या नद्या आहेत. ( गंगा, भागीरथी, नर्मदा, तापी वगैरे) यांचे उगमस्थान डोंगरावरच आहे. भागीरथीचे उगमस्थान हिमालयात आहे. जिला गंगा म्हणतात तिचे उगमस्थान त्र्यंबकेश्वरी ब्रह्मगिरीतून निघाली. तशी ही भवनदी ही ब्रह्मगिरीतूनच निघाली. मात्र, ही गंगा ज्या त्र्यंबकेश्वराच्या ब्रह्मगिरी पर्वतातून निघाली त्या पर्वतातून ही मायानदी निघाली नाही. तर–

जियें ब्रह्माचळाचां आघाडां । पहिलिया संकल्प जळाचा उभडा ।
सर्वेचि महाभूतांचा वुडवुडा । साना आला ॥ ७।६९

अचळ म्हणजे पर्वत. शुद्ध, वुद्ध जे ब्रह्म हाच आहे पर्वत. याला पर्वत का म्हटले ? पर्वत जसा अचल, स्थिर, शांत असतो तो कधी फेरफटका मारीत नाहीत. त्याप्रमाणे ब्रह्म स्थिर, शांत व्यापक आहे; त्याला ढळणे नाही. ब्रह्म आकाशाइतके व्यापक आहे. म्हणून त्याने जायचे कोठून कोठे ?

जैसे येथूनी पऱ्हां जाणें । आकाशा नाहीं ॥ १५।३००

एखादे पर्व आले. कपिला षष्ठीसारखे मोठे पर्व आले. तेव्हा कोणी कोटल्या तीर्थाला जातात. कोणी इंद्रायणीला, कोणी चंद्रभागेला, कोणी त्रिवेणीला जातात. तसे आकाशही निघाले, स्टेशनावर आले आणि तीर्थाला गेले असे कोठे झाले आहे काय ?

अगा आकाश कें नाहीं । हें न रिघेची कवणें ठायीं । १३।१११६
तो नाहीं ऐसा ठाव उरलासे कवण । सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ९२२

आकाशाची सापेक्ष व्यापकता आहे. ब्रह्म हे निरपेक्ष व्यापक म्हणून त्याला अचळ म्हटले आहे. नित्य शुद्ध, वुद्ध, मुक्त, निर्विकल्प अशा ब्रह्मरूपी डोंगरातून मायानदी निघाली.

पहिलीया संकल्प जळाचा उभडा ॥

प्रथम संकल्पाच्या उभळीच्या रूपाने निघाली. सृष्टीच्या उत्पत्तीच्या पूर्वी प्रथम संकल्प (मूळ संकल्प) जो " एकोऽहं वहुस्यां " त्या रूपाने ही निघाल्यावर पंचभूतांचा लहानसा वुडवुडा आला. हे निर्विकल्प ब्रह्म आहे. ईश्वर नाही.

तदैक्षत वहुस्यां प्रजायेय ॥ छां. ६।२।३

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।
भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ गी. ८।३

कर्म म्हणजे काय ? भगवंताने कर्म म्हणजे वर्णाश्रमास विहित असणारे कर्म सांगितले नाही, तर प्राणिमात्रांच्या उत्पत्तीला कारणीभूत जो मूळ संकल्प त्यालाच कर्म म्हटले आहे.



पैं निर्विकल्पाचिये वरडी । कीं आदि संकल्पाचीं फुटे विरुढी ।
आणि ते सर्वेंची मोडोनिये ढोंढी । ब्रह्म गोळकांची ॥ ८।२२

निर्विकल्प ब्रह्माच्या ठिकाणी एक आहे ते अनेक व्हावे अशा संकल्पापासून अनंत ब्रह्मांडे निर्माण झाली. असा जो संकल्प स्फुरला त्या संकल्पाच्या रूपाने मायानदी निघाली. ब्रह्माच्या ठिकाणी संकल्प स्फुरला कसा ? एक आहे ते अनेक व्हावे का ? संकल्प स्फुरण्याला अंतःकरण पाहिजे. कारण अंतःकरणावाचून संकल्प स्फुरत नाही. लाट उत्पन्न होण्याला पाणीच लागते. वाऱ्याचा स्पर्श झाला म्हणजे वरवर जो आकार तयार होतो, त्यालाच लाट म्हणतात. वाऱ्याचा संबंध पृथ्वीलाही होतो व जळालाही होतो.

जळीं स्थळीं वायु झगटी । जळीं तरंग स्थळीं नुठी ।
तैं तरंगता जळाचे पोटीं ॥ भा. २८।१८९

सो सो वाऱ्याचा संबंध पृथ्वीला झाला तरी लाट उत्पन्न होईल काय ? लाट पाण्यावरच होईल. तसे संकल्प स्फुरण्याला अंतःकरणच लागते आणि अंतःकरण शरीराच्या आत राहते; पण परमात्म्याला शरीर नाही, तेव्हा अंतःकरण कोठून राहणार ?

अर्जुना कांहींची जेय नाहीं । तो प्रकृतीचा भर्ता पाहीं । १३।९८३
जे अनंग तो पेंधा । निकवडा नुसधा ।
जीर्णु अतिवृद्धा । पोसोनि वृद्ध ॥ १३।९८०
उपाधी वेगळे तुम्ही निर्विकार । कांहींचि संसार तुम्हां नाहीं ॥ ३७६३

कार्यकारणरूपाने असणाऱ्या सर्व उपाधीहून तुम्ही भिन्न आहात आणि कोणत्याच प्रकारचा संसार तुम्हाला नाही. मग संकल्प स्फुरला कसा ? ही झाली शंका. या शंकेचे समाधान सांगता येणे शक्य नाही. संकल्प स्फुरला हे खरे आहे. निर्विवाद आहे. संकल्पाचे कार्य पिंडब्रह्मांड दिसते. त्या आर्थी संकल्प स्फुरला, हे मानायलाच पाहिजे. तुम्हाला ज्या ह्या अनंतावधी सृष्ट्या दिसतात, हे जे सर्व नक्षत्र (तारे) दिसतात त्या सर्व सृष्ट्या आहेत. आपल्याला एवढेच ब्रह्मांड वाटते. पण महाराजांनी म्हटले आहे–

उंबरांतील कीटका । हेंचि ब्रह्मांड ऐसें लेखा ॥ १ ॥
ऐसीं उंबरें किती झाडीं । ऐसीं झाडें कीती नवखंडी ॥ २ ॥ ३९०५

ही अनंतावधी चित्र विचित्र ब्रह्मांडे उत्पन्न झालेली दिसतात त्या अर्थी संकल्प स्फुरला असे मानायलाच पाहिजे. कारण त्याचे कार्य जर दिसते तर त्याचे कारण मानलेच पाहिजे. धूर दिसतो त्यावरून अग्नीचे अनुमान करता येते. डोळ्याला प्रत्यक्ष अग्नी दिसत नाही. धुराची आहे प्रत्यक्षता. एक म्हातारा मनुष्य बाहेर ओटीत बसला होता. एक मुलगा आला. त्याला समोरच्या घरातून विस्तव घेऊन ये सांगितले. तो म्हणाला, विस्तव कोठे दिसला ? पण धूर दिसतो. त्यावरूनच अग्नीची सिद्धता झाली. कार्य अग्नी आहे; कारण त्याचप्रमाणे अनंतावधी ब्रह्मांडे हे कार्य दिसते त्या अर्थी त्याचे कारण संकल्प मानायलाच पाहिजे. संकल्प स्फुरला कसा ? त्याचा विचार करीत बसू नका. त्याच्यातून बाहेर पडण्याचा विचार करा. कल्पना करा, मध्यरात्रीला एकाच्या घराला आग लागली. त्यांनी बोंब मारून सर्व गाव जागा करायला पाहिजे. कोणी नदी येऊन विझवतील त्याऐवजी तो विचार करू लागला की माझ्या घराला आग लागली कशी ? कारण माझ्या घरात दारू नाही; तेल, तूप, गवत, आग लावण्यासारखे काही नाही. असा विचार करण्यात घर जळून जाईल. बोंब मारून गाव जागा कर. संकल्प का स्फुरला, कसा स्फुरला, हे कळण्यासारखे असते तर नामदेवरायांनी असे म्हटले नसते,

नव्हे तेंचि कैसें झालें रे नेणिया । नाहीं तेंचि दिसूं लागलें रे ।
अरूप होतें तें रूपासि आलें । जीव शिवनाम पावलें रे ॥१॥ नाम.२१११
आपलीच आवडी धरुनि खेळिया । आप आपणातें व्यालें रे ।
जोपनाकारणें केली बायको । तिनें एवढें वाढविलें रे ॥ २ ॥

नामदेवराय म्हणतात, अघटित गोष्ट कशी घडून आली ? न होणारे झाले कसे ? झाले खरे; झाले कसे हे नको विचारू. जे नाही तेच लागले दिसायला.

न झाला प्रपंच आहे परब्रह्म । अहं सोहं ब्रह्म आकळलें ॥ ४०३६
मुळीच नाही तेच लागले चहुकडे दिसायला.



प्रपंच एक झाला होता । हे समूळ मिथ्या वार्ता
पुढे होईल मागुता । कदा कल्पांती घडेना ॥ हस्ता० ११६

तुम्हा–आम्हाला प्रतीत होणारा जो हा भेदात्मक प्रपंच मुळात काही नाही. तिन्ही कालामध्ये जो संसार नाही, तो संसारच चहूकडे दिसायला लागला. ब्रह्मच रूपाला आले.

आला नावरूपा । तु. म्ह. झाला सोपा ॥ ३३१६

अरूप होते मूळचे

रंग नही रूप नही नही वर्ण छाया ।
निराकार निर्गुणही तूंचि रघुराया ॥ कबीर ॥ २६३॥

तात्पर्य अरूप होते ते रूपासी आले. हे कसे, का असे झाले ? चैतन्याला अशी आवड उत्पन्न झाली की– मी मला पाहवे, मी मला आलिंगन द्यावे.

ऐके आजानुबाहो नृपनाथा । ऐसें आठवलें भगवंता ।
तो आठवो झाला सृजीता । महाभूतां भौतीकां ॥ भा. ३१७६

ती माया एवढी ढालगज. तिने एवढे वाढवीले रे ।

जोपनाकारणें केली बायको । तिनें एवढें वाढविलें रे ॥ ना. २१११
कांहींच न होनियां कांहीं एक होता ।
नामरूपातीत आपण नेणता । होण्या न होण्याच्या नेणोनियां वार्ता ।
त्याचा संकल्पचि झाला त्या प्रसवतावो ॥ १ ॥
ऐशापरी हा मूर्तिमंत झाला ॥ ध्रु. ॥ निळोबा० १४६

तात्पर्य, निर्विकल्प ब्रह्माचे ठिकाणी सृष्टी उत्पत्तीच्या पूर्वी मी एक आहे, अनेक व्हावे असा संकल्प स्फुरला. ही आहे उकली ...पण हा संकल्प स्फुरला केव्हा ? सगळ्या जीवांचे प्रारब्धभोग देण्याला सन्मुख होते तेव्हा हा संकल्प स्फुरतो. ब्रह्मगिरीतून गंगा गौतमामुळे निघाली. तशी संकल्परूपी गंगा उत्पन्न होण्याला सर्व जीवांचे भोग देणारे प्रारब्ध हे आहे कारण.

सर्वेचि महाभूतांचा बुडबुडा ॥

संकल्प स्फुरल्याबरोबर पंचमहाभूतांचा लहानसा बुडबुडा आला. खालून जोराने पाणी आले म्हणजे तेथे बुडबुडे येतात.

संकल्प स्फुरल्यावरोबर म्हणजेच संकल्पापासून अपंचीकृत पंचमहाभूते उत्पन्न झाली. डोंगरातून नदी निघाली व वाहू लागली; मग वाहता वाहता ओघ पडतो. ओघातून नदी वाहात जाते त्याप्रमाणे,

जे सृष्टि विस्तारगचेनि ओघें । चढत काळकलनेचेनि ।
वेगें प्रवृत्ति निवृत्तिचि तुगें । तटें सांडीं ।। ७।७०

अनंतावधी ज्या सृष्टचा निर्माण झाल्या हाच ओघ. त्या ओघातून ती वाहू लागली. आणि दिवसेंदिवस त्या मायानदीला पाणी चढू लागले. काळाची जी ग्रासक शक्ती आहे त्या शक्तीच्या रूपाने लागली चढायला. " काळे खादला हा अवघा आकार । उत्पत्ती संहार घडामोडी ।। म्हणजे पंचमहाभूतां-पासून जेवढी सृष्टी उत्पन्न झाली तिच्या पाठीमागे काळ लागला आहे.

जन्मलिया दिवसदिवसें । हों लागे काळाचियाचि ऐसें ।। ज्ञा. ९।५१२
देह जैंपासूनि जाहला । तैंपासूनि मृत्यु लागला । भा. ९।३३६

देह उत्पन्न झाल्यापासून त्याच्या पाठीमागे मृत्यू लागला आहे. म्हणजे हे सर्व विश्व काळाने व्यापले आहे.

न्याहाळी पां केवढा । पसरलासे चवडा ।
करूनियां माजिवडा । आकार गजु ।। ज्ञा. १३।६४

काळ हाच कोणी वोका आहे आणि त्यांनी चवड्यात विश्व घेतले आहे. ब्रह्मा, विष्णु, शंकर यांच्याही पाठीमागे काळ आहे.

चौदा कल्प आयुष्य जोडी । त्या मार्कंडेयासी काळ झोडी ।
युगांतीं लोम झडे परवडी । त्या लोम हर्षाचि नरडी मुरडीजे काळें ।।
भा. २८।६४४

स्रजित्या ब्रह्मातें काळ पिळी । पाळी त्या विष्णु तें काळ गिळी ।
प्रलयरुद्राची ही होळी । काळ महावळीं स्वयें करी ।
येथें नाहीं उरों आले अवतार । येर ते पामर जीव किती ।। तु. २८०७

या सृष्टीच्या रचनेत जो कोणी जन्मास आला आहे, त्याला मेलेच पाहिजे. राजीखुषीने मेला नाही तरी मरावेच लागते. आजोबा आहेत काय ? पणजोबा आहेत काय ? कोठे गेले ?

आजा मेला पणजा मेला बाप मसणा मेला ।।
देखत देखत नातुपणतु तोही वेडा झाला ।। ज्ञा. अ. ९४

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ।। गी. २।२७

उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दिसे ।
हें घटिकायंत्र तैसे । परिभ्रमे गा ।। २।१५९
देहाचिया गांवा आलिया । जन्ममृत्यूचिया सोहळिया ।
ना म्हणों नये धनंजया । जियापरी ।। १८।१०१
उपजल्या पिंडाते मरण सांगतें । मरतें उपजतें सर्वेचि तें ।। ३६१०
मरणाचीं तंव गाठोडी पदरीं । जिणें तोचिवरी माप भरे ।। ३ ।। २७१५

शरीर ज्या वेळेला उत्पन्न होते, त्या वेळेला मरणाची गाठोडी घेऊनच उत्पन्न होते. शरीर उत्पन्न झाल्याबरोबर जातक नावाचा विधी करतात. राहतक कोणी करते का? राहिले असते अथवा राहणारे असते तर रहातक केले असते.

नाशिवंत देह जाणार सकळ । आयुष्य खातो काळ सावधान ।। २६५२

हे शरीर कधी तरी जाणारच. तुम्ही कितीही राखा शरीराला; तळहातावरच्या फोडाप्रमाणे वागवतात. उपासतापास करायचे नाही. मरू नये म्हणून कितीही जपा. पण आली वेळ की ठेच लागते त्याचे निमित्त होते.

राखत राखत देह पडे ।।

जेवढे म्हणून सृष्टीच्या रचनेत उत्पन्न झाले आहे, तेवढ्याच्या पाठी-मागे काळ लागला आहे.

पित्या देखता पुत्र मरे । पुत्रा देखतां पिता झुरे ।
काळें काळ अवघेंची सरे । कोणीही नुरे क्रियेसी ।। २८।२८५

एक काल असा येणार आहे की, या सगळ्या सृष्टीचा एकाच वेळी संहार होणार. सर्वच सपल्यावर कोणाचे श्राद्ध कोणी करावे? तात्पर्य, ही जी काळाची ग्रासक शक्ती ती वाढायला लागली.

त्रढत काळ कलनेचेचि वेगें । प्रवृत्तिनिवृत्तिची तुंगें तटें सांडी ।। ७।७०

प्रवृत्ति मायानदीच्या अलीकडचा तीर, निवृत्ती पलीकडचा तीर. उंचउंच ब्रह्मलोकापर्यंत सर्व प्रवृत्ती निवृत्तीच भरली आहे. या मायानदीला इतका पूर आला की– किनाऱ्याच्या बाहेर लागली वाहायला. धो धो मुसळधार पाऊस पडला. जोरदार वृष्टी केली म्हणजे नदीला पूर येतो. मायानदीला एवढा पुर जो झाला तो मेघांचा वर्षाव झाला.

जे गुण घनाचेनि वृष्टीभरे। भरली मोहाचेनि महापुरें।
घेऊनि जात नगरें। यमनियमांची ।। ७।७१

गुणरूपी मेघाची जोराची वृष्टी झाल्यामुळे तीं पाण्याने भरली. प्राणीमात्रांचा ठिकाणी जो मोह आहे तेच मायानदीचे पाणी आहे. संसाराचे प्रेम कोणाचे ठिकाणी नाही ?

स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर। विषयीं पडिभर अतिशय ।।१।। १५४४
पूर्ण मृत्युची पायरी। तें वार्धक्य वाजलें शरीरी।
तरी धांवे विषयावरी। आठवू न धरी मरणाचा ।। भा. १३।२१७

वायका– मुले पैशाकरता मरतात.

अव्हांटलिया आस्थाबुद्धि। विषयसुखाचि परमावधि।
जीव तैसा उपाधि। आवडे लोकां ।। ४।२१

मोह हा सर्वांना रडवणारा आहे. ईश्वरनिर्मित सृष्टी दुःखाला कारण नाही. तर जीवनिर्मित सृष्टी आहे. ईश्वराने निर्माण केलेले जे पदार्थ त्या पदार्थाच्या ठिकाणी, ही माझी वायको, हा माझा बाळया, ही माझी गाय, हे माझे घर असे म्हणावे. हे सर्व ईशनिर्मित आहेत, पण जीवाने असे प्रेम करणे हेच आहे जीवनिर्मित, मुलगा झाल्याबरोबर मेला, तर एवढे दुःख होत नाही. पण थोडा ४ ते ५ वर्षांचा झाला आणि मेला तर अतिदुःख होते. तितका मोह वाढला. म्हणून व्यक्तीने दुःख दिले नाही. मोहाने दुःख दिले. व्यक्तीच जर मोहाला कारण मानली, तर सर्व जगाकरता रडायला पाहिजे. एका घरात लहान मोठी बरीच माणसे होती. त्यात एक म्हातारी होती. ती सर्वांवर सारखी प्रेम करीत होती. पुढे ती म्हातारी वारली तेव्हा लहानमोठी माणसे रडू लागली. तेवढ्यात एक बाहेरचा मनुष्य

लांब उभा राहून पाहू लागला. ती माणसे का रडतात म्हणून विचारले, तर म्हातारी वारली हे कारण कळले. आई, मावशी, आत्या या नात्याने रडत होते. त्यात प्रेतयात्रेकरिता जमलेल्यांपैकी एक मनुष्य तंबाखू व चुन्याचा बार तयार करीत होता. तो काही रडत नव्हता. त्याला विचारले तुम्ही का रडत नाही ? तो म्हणाला, ही माझी कोणीच नाही. मी काय म्हणून रडू ? त्याच्या डोळ्यांत पाण्याचा टिपूस नाही. इतर माणसांना व्यक्तीने रडविले नाही, तर त्यांच्या प्रेमाने रडवले. अशा या मोहाने मायानदी भरली. मोहाचा एवढा पूर आला की, ती दोन्ही काठांवरून वाहू लागली. या मोहाच्या महापुरामुळे यमनियमाची गावे होती. ती पार वाहून गेली. म्हणजेच या मायामोहामुळे मनाचे नियमन, इंद्रियांचा निग्रह राहिला नाही इंद्रिये नेतील तिकडे मनुष्य जातो.

जिव्हा रसांकडे ओढी । तृषा प्राशनालागी तोडी ।
शिश्नासी रतिसुखाची गोडी । तें चरफडी खावया ।। ९।३१५
त्वचा पाहे मृदुपण । उदर वांछी पूर्ण अन्न ।
श्रवण मागती गायन । मधुरध्वनी आलाप ।। ९ ।। ३१६
घ्राण उद्यत परिमळा । रूप पहावया डोळा ।
हस्त वांछीती खेळा । नाना लीला स्वभावें ।। ९।३१७
पाय वांच्छिती गती । ऐशीं इंद्रियें वोढा वोढीती ।
जेवीं एका गेह्र पती । बहुता सवती तोडीती ।। ९ ।। ३१८

डोळ्याला सिनेमा पाहण्यास पाहिजे. नाकाला पाहिजे अत्तराचा फाया, कानाला पाहिजे बाईचे गाणे, जिव्हेला पाहिजे श्रीखंड, बासुंदी.

इंद्रियांचीं दीनें । आम्ही केलों नारायणें ।। १७१२
येकाचेंही मज न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ।। १५४८
विषयी लंपट शिकवी कुविद्या । मना मागें नांद्या होऊनि फिरें।।२८४८

मनात जे जे येईल ते करायला तयार होतो. या मायेला ( मायानदीला ) मोहाचा पूर आल्यामुळे ही यमनियमांची गावे वाहून गेली. या मायानदीला मोठमोठे भोवरे आहेत. पोहताना भोवऱ्यात जर सापडला की मेलाच म्हणून समजावे.

जे द्वेषांचा आवर्ती दाटत । मत्सराचे वळसे पडत ।
माजी द्वेषाचें प्रमदादि तळपत । महामीन ॥ ७१७२

जगांत माणसे एकमेकांचा द्वेष करतात. एखाद्या दरिद्र्यानें एखाद्या श्रीमंताकडे पाहिले, त्याचे ऐश्वर्य पाहिले, मग त्याचे तळपीठ होते, काय बाबाची रेषा उठली; काय बाबाचा भाग फळफळला.

दुर्बळें सदैवा । म्हणे नागवेल केव्हा ॥ १ ॥ ३१०२
आपणा ऐसें करूं पाहे । स्वभावासी करील काय ॥ २ ॥ ३१०२

मांजराने उंदीर का पाहिला तर आदरसत्कार करील काय? सर्पाने बेडूक पाहिले, धीवराने मासे पाहिले.

काय केलें जळचरीं । ढीवर त्यांच्या घातावरी ॥ ३१४४
हा तों ठायींचा विचार । आहे याति वैराकार ॥ २ ॥

या भोवऱ्यात का सापडला की मेला म्हणून समजावे. प्रत्येकामध्ये मत्सर असतो. आमच्यासारखे बुवालोक कीर्तनामध्ये सांगतील;

कोणाही जीवाचा न घडावा मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचे ॥तु. ३८६९

पण बुवांनी बुवाला पाहिले, महाराजांनी महाराजांना पाहिले, विद्वानाने विद्वानाला पाहिले की, गुरगुर करतात. एका कुत्र्याने दुसऱ्या कुत्र्याला पाहिले की, गुरगुर करतो. या मायानदीमध्ये मत्सराचे वळसे, तसेच या मायानदीमध्ये मोठमोठे मासे आहेत. समुद्रामध्यें जसे पर्वतप्राय मासे, तशीच मायानदी समुद्राप्रमाणें असल्यामुळे हिच्यात मोठमोठे मासे आहेत. तरुण स्त्रिया, धन हे मायानदीतले मोठे मासे आहेत. सुखबुद्धीने का गेला की माशाने गट्ट केलेच. स्त्री आणि धन या रूपाने मायाच व्यक्त झाली. नाथ महाराज म्हणतात, माया अव्यक्त आहे. अमूर्त आहे. अमूर्त मायेचे मूर्त स्वरूप पहावयाचे असेल तर, स्त्रिया आणि धन पहा. या दोन विषयाकरता जग मरत आहे.

स्त्रिया धन हें वा खोटे नागवले मोठेमोठे ॥ १ ॥ क्षेपक ४३११

विश्वामित्राचा कुत्रा झाला. या प्रचंचात सगळयांच्या समजुतीने सुखाचा मुख्य विषय म्हणजे कांता. स्त्रियांच्या ठिकाणी सुखबुद्धि झाली आहे.

सुखाकरिता बायको करतात. एखाद्याने कर्ज काढून लग्न केले; म्हणतो की लक्ष्मी आली. लक्ष्मी आली का अवदसा आली ?

कां रिणावरी विवाहो । विस्तारीला ॥ १८।७९५

प्रयत्न करतात सुखाकरता; पण प्रत्यक्ष होते दुःख.

स्त्री हातीं धरीतां देख । वाढे प्रपंचाचें थोर दुःख ।
गृह पाहीजे आवश्यक । भोगार्थ देख स्त्रियेच्या ॥ ९।२०३

बायको का केली की, तिच्या भोगार्थ घरच पाहिजे.

जाहली प्रजांची वृद्धी ॥ ९।२०३
पतनासि नेति । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥१॥ ३५०८

स्त्री-संगामुळे मोठ मोठे अधोगतीला गेले. म्हणून तिच्यावर फारसे प्रेम करू नये. परस्त्री तर अधोगतीला नेतेच नेते. कबीर महाराज म्हणतात–

परस्त्री प्रसन्न भई देत नही कुच आवर ।
मूत्रपात्र आगे धरे येही नरक का घर ॥

पशुवृत्तीचा जो मनुष्य आहे त्याच्या ठिकाणी विचार करा.

आणि स्त्रीजात तितुकें । त्वचेंद्रियेंचि ओळखे ।
तिये विषयीं सोयरिके । एकचि बोधु ॥ ज्ञा. १८।५६१
पाप तया नांव परदारागमन । पाप ते परधन अपहार ॥ निळो.१३६०
परदारा अभिलाषिती । ते अवश्य नरका जाती ।
मा स्वदारा कामासक्ति । तेथही अधोगती साडीना ॥ भा. २६।१४२

परस्त्री तर नेतेच नेते; पण लग्नाच्या स्त्रीशी जर आसक्त होऊन राहील तर तीही नरकाला नेईल.

चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेनि छंदें नाचें ।
माकड गारुडियाचे । जैसें होय ॥ ज्ञा. १३।७९२

काही लोक बायकोच्या आधीन झालेले असतात. नेहमी बायकोची मनधरणी करतात. काम करता करता बायकोची आठवण झाली की घरी येतात. बायकोचा मुखडा पाहावयाचा; मग पुन्हा कामावर जातात. काही माणसे बायकोचा फोटो नेहमी खिशात ठेवतात. ' जय जगदंबे देह तुज अर्पिला

ज्याप्रमाणे गारुडी माकडाला जसजसे नाचवील तसे तसे ते नाचते. 'ए देवजी धसाडे ! रत्निकु समजाव.' तसे काही पुरुष स्त्रीच्या आधीन झालेले असतात.

धिग जिणें तो बाईले आधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ॥ तु.२९५६

बाहेर यांचा मोठा दरारा; घरात आले की म्यांऊ.

लग्नाची स्त्री का असेना पण वर सांगितल्याप्रमाणे आसक्त होऊन राहिले ती तर नरकाला नेते.

पतनासी नेति तिचा खोटा स्नेह प्रीति ॥ तु. ३५०८

तिच्यावर प्रेम करायचे नाही. मग विधीपूर्वक देवब्राह्मणांसमोर वरले याची वाट काय ?

कन्या सवेद सवर्ण । जिसो नाहीं रजोदर्शन ।
तेहि पित्यापासीं याचून । करावें लग्न विधानोक्त ॥ भा. ५।२२४
करितां वधूवरां पाणिग्रहण । साक्षी देव द्विज हुताशन ।
इतर स्त्रिया मातेसमान । स्वदारागमन नेमिलें वेदें ॥ भा. ५।२२६
विधी पुरतें कारण । बहू वारावें वचन ॥ तु. ३५०८
सर्वस्वासी नाडी । ऐसी लाघवाची बेडी ॥३॥ ३५०८
तुका म्हणे दुरी । राखतां हे तेचि बरी ॥४॥ ३५०८
ऋतुकाळी ज्या स्त्रीगमन । पुरुष ब्रह्मचारी पूर्ण ।
वेद निवृत्तिपर आपण । त्यागरूपें जाण भोगातें नेमी ॥ भा. ५२३०

विधीपुरता संबंध ठेवून बाकी तिला दूर ठेवावे.

स्त्रियांचा तो संग नको नारायण ।
काष्ठा या पाषाणा मृत्तिकेच्या ॥ तु. ६५२

हाडामांसाच्या नव्हत तर लाकडाच्या जरी असल्या तरी फोटोकडेसुद्धा निरखून पाहू नये.

नाठवे हा देव न घडे भजन । लांचावलें मन आवरेना ॥२॥ तु. ६५२

देव आठवत नाही, भजन घडत नाहीं; घरांत नवरा बायको दोघेच असली आणि गावात कीर्तन असले. आमंत्रण देणारी मंडळी म्हणतात, आज कीर्तनाला या बर का ! त्याच्या मनातून यायचे नसते. कीर्तन कोणाचे ?

वंकट स्वामीचे. कीर्तन चांगले करतात. तो म्हणतो. पण आपल्याला तो नादच नाही.

दुसरे असे– आलो असतो पण ती घरी एकटी आहे. अंधारी रात्र. कसे एकटे सोडून येऊ ? अरे, पण उद्या मुक्काम आहे काय ? उद्या एखादे पोरसोर ठेवून येऊ. अरे, पण उद्या जर तू मेलास तर ?

क्षणभंगुर हे जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाही हाती ॥
कथेसी साक्षेपे पाचारिलें जरी । म्हणे माझ्या घरी कोणी नाही ॥
तु. २४५३

आमंत्रण देणारा जरा सलगीचा असला तर तो म्हणत असतो, कीर्तन ८ ते १० थोडा वेळ तर असते. चल. असे त्याला आणले. त्याला कीर्तनकार बोवांनी वीणा घेऊन रामकृष्णहरीला सुरुवात केली की त्यांचा घोरायला आरंभ होतो.

वलात्कारे जरी आणिला कथेसी । निद्रा घे लोडासि टेकूनियां ॥३॥
तु. २४५३

वहुतेक लोक असेच आहेत.

असेच धन आहे. पैसा अनर्थमूलक आहे. भागवतकारांनी द्रव्याचे पंधरा अनर्थ सांगितले आहेत. द्रव्य कोणाला सुखाने मिळत नाही ! खोटे रोखे, खोटचा प्रॉमेसरी नोटा, खोटे जमाखर्च, खोटी साक्ष देतात. पैशासाठी नाही, नाही तसे वाईट काम करतात.

राति दिवसू निज निकटे । मरणेंसी घेतां झटे ।
कवडीची प्राप्ती न भेटे । प्राणांत कष्टें द्रव्य जोडे ॥ भा. ३।२४५

पैसा मिळविण्याचे दुःख. मिळाला तरी रक्षणाचे दुःख. ज्याच्या जवळ पुष्कळसा पैसा आहे, ते का सुखात असतात ? काय आहे 'उपरकी तो खूपती है। अंतरकी जाने राम।' ज्याच्याजवळ दमडा नाही 'टिकोबा टिकाई आणि विठोवा रखुमाई' नऊ वाजता खाल्ले की झोपतात. कुणीकडे फट-फटले त्यांना खबरही नसते; पण ज्यांच्या जवळ पुष्कळ पैसा आहे, त्यांना रात्रभर झोप नाही; 'खाटेवरी पडता। चिंता व्यापी तळमळ ॥' अमक्याचे

खाते बाहेर चालले आहे, फिर्याद करून हुकुमनामा बजवावयाचा, त्याला तर घर नाही. त्यातल्या त्यात गावोगाव का चोऱ्या व्हायला लागल्या मग तर काय विचारता ! तशात रात्री चोर आले आणि त्यांपैकी एक उरावर बसला, दुसरा समोर उभा राहिला. चार पाच चोर तिजोरीजवळ गेले. तिजोरी उघडली. सोने, नाणे, नोटा बाहेर काढायला लागले. तो टकटक पाहात असतो. गुदगुल्या का होत असतील ? बोंब मारायची सोय नाही. त्याचा बाप समोर सुरा घेऊन उभा असतो चिडीचूप. सर्व ऐवज, होता नव्हता तेवढा नेला; मग सकाळी उठून पेढे वाटतो का ?

स्त्रिया धन हें बा खोटें । नागवले मोठमोठे ।। १ ।।
द्रव्याचिया मागे कळिकाळाचा लाग ।
म्हणोनियां संग खोटा त्याचा ।। तु. ३४३२

हे सर्व आहेत दुःखजनक, हे मायानदीतले मोठमोठे मासे.

जेथ प्रपंचाची वळणें । कर्माकर्मांचीं वोभाणें ।
वरी तरताती वोसाणें । सुखदुःखांचीं ।। ज्ञा. ७।७३

मायानदीमध्ये प्रपंचाची म्हणजे भेदाची, द्वैत कल्पनांची वळणे असताना आपण प्रपंच बायका, मुले, घर, दार, पैसाअडका याला संसार म्हणतो. पण शास्त्रकार याला प्रपंच, म्हणत नाहीं. जोपर्यंत मायाधीन जीव आहेत, तोपर्यंत द्वैतच द्वैत दिसते. आता पहाना ! तुम्हा आम्हाला जिकडे पाहवे तिकडे द्वैतच दिसते. वस्तुतः द्वैत काही नाही, एक अद्वैत ब्रह्म आहे.

तुका म्हणे दुजें । हें तो नाहींच सहजें ।
संकल्पाच्या काजें आपेंआप वाढलें ।।१।। तु. ३८४१
एक अद्वैत ब्रह्म पाही । दुसरे आणिक कांहीं नाहीं ।
प्रपंच मिथ्या वस्तूचे ठायीं
हें प्रमाण पाही वेदवाक्य ।। भा. १९।१९७

द्वैत दिसते याला माया कारण आहे. त्यात कर्माकर्माला म्हणायचे पाप पुण्य. हाच पूर आला. यावर सुखःदुखांचे पुराड आले आहे. नदीला पूर आला म्हणजे त्याच्यावर कांटी लाकडे हे वाहत जाते; याचेच नाव पुराड.

निवडुंगाच्या फण्या, केर, कचरा, काटे यालाच पुराड म्हणतात. पापपुण्याचा पूर, त्यावर सुखदु:खाचे पुराड वाहत चालले आहे. याचे रहस्य जो पुण्यकर्म करील त्याला सुख मिळेल, पापकर्म करील, दु:ख भोगावे लागेल. पापकर्म करताना बरे वाटते; पण दु:ख भोगावे लागते. सुखदु:खाची उत्पत्ति पुण्य-पापापासून होते.

रतीचिया बेटा । आदळती कर्माचिया लाटा ।
जेथ जीव फेन संघाटा । सैंघ दिसे ।। ज्ञा. ७।७४

या मायानदीमध्ये हे भयंकर बेट आहे. वारा सुटला म्हणजे पाण्याच्या लाटा बेटावर आदळतात. आदळल्यावर फेस तयार होतो. ' रतीसुख ' हेच आहे बेट. त्या बेटावर कामाच्या लाटा आदळतात. मग तेथे जीवरूपी फेस तयार होतो.

अहंकाराचिया चळीया । वरि मदत्रयाचिया उकळिया ।
जेथ विषयोर्मीचिया आकळिया । उल्लाळे घेती ।। ज्ञा. ७।७५

नदी जी असते तिला जागजागी धारा असतात. प्रत्येक जीव शरीराचा अभिमान घेतो. गाढवाच्या ठिकाणी गाढव शरीराचा, बैलाचे ठिकाणी बैलाच्या शरीराचा, अभिमान असतो. गाढव म्हशीबरोबर संसार करणार नाही.

तेथ जें देह जयापुढें । अनुरूपपणें मांडे ।
तें भूत तिये आरूढे । हे मी म्हणौनि ।। १८।१३०५
या देहातें म्हणे मी पुत्र दारा धन माझें । ज्ञा. अ. ५१८

कर्मानुसार जे शरीर प्राप्त होईल, त्याला ' मी ' म्हणतो. वास्तविक देह याचा नाही. तो कधी तरी सोडून जातो. या मायानदीमध्ये तीन मद आहेत विद्यामद, धनमद, कुलमद. थोडे का ज्ञान झाले, ज्ञानेश्वरी थोडी का ऐकली, चार टिपणे पाठ केली म्हणा, बैलासारखे चार माणसात मागे पुढे सरला, म्हणजे झाले बुवामहाराज.

विद्या अल्प परी गर्व शिरोमणी । मजहुनी ज्ञानी कोण आहे ।। तु. ३०४९

द्रव्य ज्याच्या जवळ आहे तो इतका उन्मत्त होतो की नाही नाही तसे अनाचार करतो. अनन्वित कर्मे करतो. एखादा चांगल्या कुळात का जन्माला आला, त्याला आपल्या कुळाचा अभिमान चढतो. ते अक्करमासे आम्ही साडेबारा मासे. आम्ही गोड ते कडू. त्याची आजी मोहतराची, त्यांच्यात पुर्नविवाह; ते कमी प्रतीचे (हलके) अशा ऊर्मी उत्पन्न होतात.

उदो अस्ताचे लोंढे । पाडीत जन्ममृत्यूचे चोंढे ।
जेथ पांचभौतीक बुडबुडे । होती जाती ॥ ज्ञा. ७।७६

हे मोठमोठे लोंढे जन्ममरणाचे चोंढे पाडतात. किडा, मुंगी हे किती मरतात व जन्मतात ते कळायचे नाही. पंचमहाभूतापासून उत्पन्न झालेले हे बुडबुडे येतात. अशी ही मायानदी दुस्तर आहे.

येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो ।
तो तो अपावो । होय तें ऐक ॥ ७।८२

या मायानदीतून तरून जाण्याचा जो उपाय म्हणून करावा तो अपायच होतो.

सुटायाचा कांहीं करितों उपाय । तों हें देखे पाय गोवियेले ॥ १५०७

या मायानदीतून सुटण्याचा, तरण्याचा जसा जसा उपाय करतो तसतसा गुंतत जातो, बुडत जातो, अधिक फसत जातो.

गोडपणें मासी लिगाडीं गुंतली । सांपडे फडफडी अधिकाधिक ।
तुका म्हणे प्राण घेतला आशा । पंढरीनिवासा धाव घाली ॥
तैसी परी मज जाली पांडुरंगां ॥ धृ. ॥ तु. १५०६

एक प्रकारचा चिक्कट असा पातळ गूळ असतो, त्याला लिगाडचा गूळ म्हणतात. तो पातळ असून चिक्कट असतो. तो गूळ उघडा असला म्हणजे माशी आशेने त्या लिगाडच्या गुळावर जाऊन बसते. एक पाय चिकटला की मग ती माशी निघण्याकरिता तडफड करते. जसजसी तडफड करील तसतसी गुंतत जाते. सगळी गूळमय होते. शेवटी मरते. त्याप्रमाणे या मायानदीतून सुटण्याकरता जे जे उपाय करतो तसतसा अधिकच फसत जातो.

साधने घालिती काळाचिये मुखे ।
गर्भवास शेखी न चुकती ॥ ३ ॥ तु. ५२६
एक स्वयंबुद्धिच्या बाहीं । रिगाले तयांची शुद्धीचि नाहीं ।
एक जाणिवेच्यां डोहीं । गर्वेचि गिळिले ॥ ज्ञा. ७।८३
बुडाले तयांचा मूळ ना मारग । लागला तो लाग सांडोनिया ॥
तु. १८६१

नदीत एखादा मनुष्य बुडून मेला तर त्याचे शरीर मुरमुऱ्याचे पोत्या-प्रमाणे फुगून आपण होऊन पाण्यावर येऊन तरंगते. स्वतःच्या बुद्धीरूपी बाहुबलाने मायानदीत उडी टाकली ते वर आले नाहीत.

मनुष्य आपल्या बुद्धीने किती विचार करील ? स्वतःच्या बुद्धिबलाने भयंकर पुरातून कसा पोहून जाईल ? आपण ज्ञानप्राप्ती करता भागवत, ज्ञानेश्वरी, शांकरभाष्य, उपनिषदे साधनसामुग्री गोळा केली, वरील ग्रंथांचे अध्ययन केले. ज्ञान प्राप्त करून घेतले. ज्ञानाने मायेचा नाश झाला पाहिजे. कारण मायेचे नाशक कोणी असेल तर ब्रह्मज्ञान. अंधाराचे विरोधी प्रकाश, स्वप्नाचे विरोधी जागृती, त्याप्रमाणे मायेचे विरोधी कोणी असेल तर ज्ञान. सत्संगतीने अभ्यास करून "मी ब्रह्म" असे ज्ञान का विकासाला पावले की माया मरते.

म्हणोनि स्वप्नींचिया भया । ओखदं चेवोचि धनंजया ।
तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥ ज्ञा. १५।२५४

त्याला जागे करणे हे औषध आहे. त्याप्रमाणे अज्ञानमूलक संसार त्याचे निवर्तक ज्ञानच समर्थ आहे.

वांचूनि ज्ञानेंवीण एके । उपाय करिसी जितुके ।
तिही गुंफसी अधिकें । रुखीं इये ॥ ज्ञा० १५।२४९

ज्ञानाला सोडून या संसारवृक्षातून बाहेर पडण्याचे जितके उपाय करिशील तितका अधिक फसत जाशील. मग संसारवृक्षाच्या फांद्यावर भ्रमण करावे लागेल.

मग किती खांदोखांदी । यया हिंडावें ऊर्ध्वीं अधीं ।
म्हणोनि मूळची अज्ञान छेदीं । सम्यक ज्ञाने ।। ज्ञा० १५।२५०

संसारवृक्षाचे मूळ जे अज्ञान ते निवृत्त केले पाहिजे, कारण माया निवर्तक ब्रह्मज्ञानच आहे. ज्या साधकाने अभ्यास करून ज्ञान प्राप्त करून घेतले ते पार गेले का ? तरले का ? नुसत्या ज्ञानाने पार गेले असते. पण बरोबर अभिमान घेतला. हे थालीपीटे ज्ञान आहे.

विद्या अल्प परी गर्व शिरोमणी ।.मजहुनी ज्ञानी कोण आहे ।। ३०४९

ज्ञान असते थोडे; पण अभिमान फार ! गारुडी तमाशा दाखवतात. त्यांच्याजवळ मंत्र वगैरे थोडे खरे तर नसतातच पण चलाखी असते. तो एवढे अवसान आणतो की– ब्रह्मांड कोणीकडे नेतो कोणाला ठाऊकी.

जैसें विंचुवा विष थोडें । परी प्रवळ वेदनेसी चढे ।
तेवीं विद्या थोडी परी गाढें । गर्वाचें फुडें अति भरितें ।। भा० ५।१५६

ज्ञान थोडे पण अभिमान फार. मूर्खापेक्षा ज्ञान्याच्या ठिकाणी अभिमान फार असतो; कथा चालू असली, एखादा मूर्ख आला तो कोठे तरी उभा राहातो. त्याला या बसा म्हटले नाही तर त्याला काही वाईट वाटत नाही. पण थोडा शिकलेला असला की तो मुद्दाम बाजूला उभा राहतो. तो म्हणतो हे सर्व मूर्ख लोक आहेत. आम्ही एवढे विद्वान असून आम्हाला या बसा म्हटलें नाही. तो तेथून निघून जातो.

आणि येणही न सरे । लांकण लागे दुसरें ।
जे विद्वत्तेचें भरे । भूत अंगीं ।। ज्ञा. १४।१५२

मूर्खापेक्षा ज्ञानवानाचे ठिकाणीं अहंकार जास्त दिसून येईल.

नवल अहंकाराची गोठी । विशेषें न लगे अज्ञाना पाठी ।
सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ।। ज्ञा. १३।८२

मूर्ख तर मेलेलेच. त्या मेलेल्यांच्या पाठीमागे लागण्यात काय पुरुषार्थ ? मांजर मेलेल्या उंदरावर झडप घालत नाही. त्याचेच हे गिऱ्हाईक झालेले आहे. पण जे या बिळातून त्या बिळात पडतात त्याच्यावर झडप घालते.

सज्ञानाचे ओंबे कंठी " सज्ञानाचे ओंबे पोटी, पाठी नाहीं— कंठी; मनुष्याचे मर्मस्थान कंठ आहे. हत्ती केवढे धूड आहे ! त्याचे मर्मस्थान गंडस्थळ आहे. प्रत्येकाचे मर्मस्थान ठरले आहे. मांड्या दाबल्या तर मरणार नाही. पण कंठ का धरला की संपले. ज्ञानवान प्रत्येक गोष्टीची चिकित्सा करणारा असतो.

ज्ञानियांचे घरी चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठीलागे ॥ तु. १५५०

महाराज म्हणतात, मी ज्ञानवानाचे घरी देव पहावयास गेलो. कारण ते परमात्म्याचे प्रतिपादन करतात. अभिमान नसता तर ज्ञानाने माया-नदीतून तरून गेला असता.

तुका म्हणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥ २७८१

ज्ञानाचा थोडा का अभिमान घेतला की अभिमान नरकाला घालतो.

जाणिवेच्या भारें भवाचिये डोहीं । बुडाली तीं कहीं निवसीना ॥ २७०२

ज्ञान प्राप्त करून घेताना कष्ट केले.

ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठी । तरि कां हिंपुटी.वेदशास्त्रें ॥ २२४९

शास्त्राचें भांडण तरि तीर्थाटन । उर्वीचे भ्रमण याजसाठीं ॥ २२४९

याजसाठीं जप याजसाठीं तप ।

असे श्रमाने ज्ञान मिळविले आणि त्याचा अभिमान घेतला; मग नरकाला गेले; हे आपले तिसरे साधक. हे जरी शहाणे होते; ते दोघे मूर्ख होते. बाहुबलाने कसे तरणे होईल, म्हणून भोपळ्याची सांगड असते. पुरातून तरून जाण्याचे पुष्कळसे उपाय आहेत. नौका, तारका, सांगड या साधकाने मायानदीतून पार होण्याकरता सांगड तयार केली.

ऋग्वेदादि तिन्ही । प्रतिष्ठीजती वाग्भुवनीं ।

केली जैसी वदनी । ब्रह्म शाळा ॥ ज्ञा. १७।२२२

मायेचा निरास करण्याकरिता तिन्ही वेदांचे सांगोपांग अध्ययन केले. तिन्ही वेदरूपी तीन भोपळ्यांची सांगड पोटासी घेऊन उडी टाकली. नुसती सांगड पोटासी बांधून मायानदीत उडी टाकली असती तर पार गेला असता; पण अभिमानाचे मोठमोठे धोंडेही घेतले.

आम्ही वैदिक, आम्ही वेदपाठक, हे उरांवर दगड घेतले. आता सांगड काय करील? या मायानदीत मद नावाचा मोठा मासा होता. त्याने त्याला सांगडीसकट गट्ट केले. जे जे उपाय करावे ते ते अपाय होतात.

एकीं वयरोचें जाड बांधले । मग मन्मथाचिये कासे लागले ।
ते विष मगरीं सांडिले । चघळूनियां ।। ज्ञा. ७।८५

या साधकाने भरतारुण्याचा कासपेटा कंबरेला बांधला. कासपेटा एकच भोपळ्याचा असतो. एखादा उतारू आला. त्याच्याजवळ एक सांगड असते. मग ते कासेला लावून एक भोपळा त्याच्या कंबरेला बांधतात. त्याला कासपेटा म्हणतात. नुसता भोपळा कंबरेला बांधून गेला असता तर पार गेला असता; पण मन्मथाच्या कासेला लागला. काम अति दुष्ट. तारुण्यात एकनिष्ठ ब्रह्मचारी राहिला असता तर तरला असता. पण कामाच्या कासेला लागला. विषयइच्छा याचे नाव काम. कामात काम उत्पन्न झाला. त्याने एका पंचविषयरूपी मगरीला धरले. त्या मगरीने चवळून त्याचा चोथा करून फेकून दिला. नैष्ठिक ब्रह्मचारी व्रताने राहिला असता तर तरला असता. कामाचा प्रताप काय सांगू ?

मज कामाचेनि घायें । ब्रह्मा कन्येसि धरूं जाये ।
पराशरा केलें काय । भोगिली पाहे दिवा दुर्गंधा ।। भा. ४।११७
नारद नायके माझी गोठी । त्यासि जन्मले पुत्र सांठी ।
माझी साहों शके कांठी । ऐसा बळिया सृष्टी असेना ।। भा. ४।११७

मी नारदाला पुष्कळ सांगितले की– एकटा राहू नको. त्याने ऐकले नाही. वाढवून बसला डोंगर. मत्स्यकर्म पाहून देवाकडे गेले. बायको मागायला गेले. देवाची बायको म्हणजे नारदाची आजी. नारदाचे येणे देवानी जाणले पण मुद्दाम विचारले, कुणीकडे आला? नारद म्हणाला, मला संसार करण्याची इच्छा झाली. पण कोण लागले म्हातारपणी मुलगी द्यायला. देव म्हणतात, मग म्हणणे काय आहे? तुझ्याजवळ पुष्कळ आहेत, दे एक झालं. असे नारदाने सांगितले.

नारद वडा जगद्भारी । औरत मागे दान ।
सांठ संवत्सरके लडके किये । हो गये दानादान ।। एकनाथ म. ३९५५

नारदने किसनसे एक औरत माँगी । नारद की नारद भई पोंगडे जनन लागी ॥ ० ॥ एकनाथ ३९६६

असा हा का दुष्ट आहे. कामविकार उत्पन्न झाला की म्हातारपणापर्यंत कितीही विषयसेवन केले तरी तृप्ती होत नाही.

विषय सेविलां कोण तृप्त झाला । इंधनी निमाला अग्नी कोठे ॥
काम वाढतच वाढतो.

न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ मनुस्मृति. २।९४

जैसा नोणीं वाढू पाडें । कां इंधनें आगीसि हाकाक चढे ॥ ज्ञा. ११।४३२

साधारण अग्नी; दोन, चार शेर लाकडा. पुन्हा लाकूडाचा टाकायला गेला तर नको म्हणेल काय ? जेवढी लाकडे टाकाल तेवढी अग्नीची भूक वाढेल. सगळे जग जाळले तरी अग्नीची भूक शमणार नाही. तसे म्हातारपणापर्यंत विषयसेवन केले तरी तृप्ती होत नाही. असे विषयसेवन करून म्हातारपण का आले, मग कोण ती दुर्दशा.

म्हातारपणी येटे पडसें खोकला ।
हात कपाळाला लावुनी बैसे ॥ तु. ३१७३

कफाचा होतो जोर. आपल्याला रात्र झाली की याला उजाडलं. खोकल्याची सारखी उबळ येत असते.

उभळीचा उजगरा । सेजारिया सोईलिया घरा ।
शीणवील म्हणती म्हातारा । बहुतांते ज्ञा. १३।५७४

शेजाऱ्यांना जागरण घडते म्हणून ते त्रासून जातात.

शेजारी म्हणती मरेना कां मेला ।
आणिला कंटाळा येणें आम्हां ॥ तु. ३१७३

ते म्हणतात, तुम्हाला आम्हाला जागरण घालून पुढे करील, नंतर हा मरेल. डोळे रुपेरी रंगाचे होतात. खालचे दात पडतात. तो म्हातारा जेवायला लागला म्हणजे त्याची हनुवटी सारखी हलत असते.

बोलों जातां शब्द नयेचि हा नीट। गडगडी कंठ कफ भारी ॥ ३ ॥
३१७३

आणि शोकाचां कडा उपडत। क्रोधाच्या आवर्ती दाटत।
आपदागिधीं चुंबिजत। उधवला ठायीं ॥ ज्ञा. ७।८७

नेहमी कुरकूर कोंबडीप्रमाणे ओटयावर बसून मुस्च असते. सूनबाईने का दाटले ' गप बसा ' मग मुळूमुळू रडत बसतो. असे कामाच्या कासेला लागले ते वाया जातात. एकाने शंभर यज्ञांची पेटी करून पोटाशी बांधून मायानदीत उडी टाकली, पण ते स्वर्ग नावाच्या कपारीत अडकून राहले. याच्याने मायेची निवृत्ती होत नाही. कर्मठ वर्ग तर मरेपर्यंत कर्मच करीत राहतात. त्यांना भजन, कीर्तन आवडत नाही. या मायानदीचा पलीकडचा तीर आहे मोक्ष. त्या काठावर जाण्याकरता.

एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा। केला कर्मबाह्यांचा भरवसा।
परि ते पडिले वळसां। विधिनिषेधांच्या ॥ ज्ञा. ७।९०

कर्मबाहुंचा भरवसा केला. काम्य, निषिद्ध कर्माचा त्याग करून विहित कर्म जे नित्यनैमित्तिक त्याचे आचरण केले. कर्माने मोक्ष मिळत नाही, तर तो ज्ञानाने मिळतो.

" ज्ञानदेव तु कैवल्यं ॥ "

कर्माच्या मागे विधिनिषेध लागले आहेत. कर्म अती सूक्ष्म आहे. कर्माचा विचार मोठा गहन आहे.

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ गी. ४।१६
कर्म म्हणिजे तें कवण। अथवा अकर्मा काय लक्षण।
ऐसें विचारितां विचक्षण। गुंफोनि ठेले ॥ ज्ञा. ४।८५
कर्माकर्म विकर्मेति वेदवादो न लौकिकः।
वेदस्य चेश्वरात्मत्वात्तत्र मुह्यति सूरयः ॥ भा. ३।४३
वांचूनी मूर्खांची गोठी कायसी। एथ मोहले गा क्रांतदर्शी ॥ ज्ञा. ४।८८

विश्वामित्रासारखे फसले कर्म करीत असताना! थोडा का विधी चुकला की अधोगती प्राप्त होते. संध्या करताना आचमन करायचे असते. त्याचा विधी आहे मापमात्र पाणी घ्यावे. तळहातातल्या पाण्यावर उडदाचा दाणा बुडेल इतकेच घ्यायला पाहिजे. जरा का जास्त घेतले की मद्यपान घेतल्यासारखे होते. कडाक्याची थंडी असली आणि संध्येला बसला की हात बाहेर काढायची सोय नाही. थंडीमुळे एका पळीत तीन आचमने करून मोकळे. उन्हाळी संध्या. अती तहान लागलेली असते. तीन आचमनांत तहान भागली पाहिजे. येथे कोठं मापमात्र पाणी आहे ?

कर्म धर्म करिती सांग । उण्या अंगें पतन ।। तु. २५१८
जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तागा न लगे ।
वरि कांहीं तरी ये योगें । तरी विपायें तो ।। ज्ञा. ७।९१
तयां महेंद्रादिपदें । करिताती वाटवधें ।। १२।६१
आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ।। ज्ञा. १२।६१

माया नदीला भयंकर पूर येतो. रानोमाळ पाणी होते. मग वैराग्याची नाव कशी सोडेल ? विचाररूपी वेळूचा ठाव लागत नाही. स्वतःचे बुद्धीने या मायानदीतून तरून जाणे अशक्य आहे.

ऐसें जीवाचियें आंगवणें । इये माया नदीचे तरणे ।
हें कायसासारिखें बोलणें । म्हणावें पां ।। ज्ञा. ७।९२

जीवाने स्वतःच्या सामर्थ्याने तरून जाणे अशक्य आहे.

अपुलिया अंगें तोडी मायाजाळ । ऐसे नाहीं वळ कोणापाशी।।तु.२७०५
करितां विचार। तो हा दृढ संसार ।
ब्रह्मादिकां पार । न लंघवे सामर्थ्यें ।। १ ।। तु. १५४२

जीवाने आपल्या बुद्धीने तरून जाण्याचे प्रयत्न फोल आहेत.

जरी अपथ्यशीळा व्याधी । कळे साधूसी दुर्जनाची बुद्धी ।
कीं रागी सांडी रिद्धी । आली सांतीं ।। ज्ञा. ७।९३

वैद्य सांगतो, पथ्य सांभाळले पाहिजे. दातुळ पदार्थ– वांगी, पिठले, तेलकट, आंबट वगैरे– खाऊ नये तुरीची डाळ, ज्वारीची भाकर, सारभात

खावे. वैद्याने पथ्य सांगितले. पण याची जिभली चावट असते. कुपथ्याने वागणारा रोगी, रोगातून मुक्त होणे शक्य नाही.

म्हणऊन गा पंडुसुता । जैसो सकामा न जिवणेचि वनिता ।
तैसो मायामय हे सरिता । न तरवे जीवा ।। ज्ञा. ७।३६

कामी पुरुष बायकोच्या अंकित झालेला. बायको म्हणजे तुळजापूरची भवानी आणि हा म्हणजे भोप्या. ती सांगेल तसे वागतो. पंचवीस माणसांचे कुटुंब होते. बायकोला काम करावे लागायचे. तो कामाला कंटाळली. तिच्या मनात असे आले की, वेगळे निघायला पाहिजे. त्याच्याशिवाय सुख लागायचे नाही. तिने आपल्या पतोला एकान्तात महावाक्याचा उपदेश केला.

भ्रतारासी भार्या बोले गुजगोष्टी ।
मज ऐसो कष्टी नाहीं दुजी ।। तु. २९५८

पायलीच्या भाकरी ठोकायच्या वरतो बोलणी सहन करावयाची.

तुमची व्यालो माझे डोई पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ।।२९५८

किती जाच काढू ? नेहमी फुसफुस. ती नणंद टीचभर, पण अशी चुरचुर बोलते. शेवटी तिने निक्षून सांगितले,

वेगळें निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ।। २९५८

तेव्हा नवरा म्हणतो,

कामाचा अंकित कांतेतें प्रार्थित । तूं कां हो दुश्चित निरंतर ।।२९५९

ग, तुझ्या पाया पडतो, असे करू नको.

सकाळी उठोन वेगळा निघेन ।
वाहातों तुझी आण निश्चयेंसि ।। तु. २९५९

सकाळी उठल्याबरोबर वेगळा निघेन. ती म्हणाली, लाखदा असे झाले. मग त्याने शपथच वाहिली. मग तुम्ही आणि मी. " टिकोबा टिकाई आणि विठोबा रखुमाई " तू म्हणशील तसे करीन. तू मागशील चंद्रकला (लुगडे) घे सूर्यकळा. पठ्ठयाला एकशे पन्नास रुपये पगार आहे. असल्या कामी पुरुषाकडून स्त्रीला जिंकणे शक्य नाही. त्याप्रमाणे जीवाला मायानदी तरणे शक्य नाही, इतका दुस्तर संसार असला तरी एक रामबाण उपाय आहे.

येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले ।
तयां ऐलीच थडिये सरलें । मायाजाळ ॥ ज्ञा. ७।९७
भवनदी आड नव्हतीसी जाली ।
कोरडीच चाली जावे पायीं ॥ तु. २६२७

ही भगवंताची उक्ती तुकाराममहाराजांच्या पुढे चित्रासारखी रेखाटलेली होती. सर्व भावाने जे मज भजले ते मायानदीतून तरले.

भवसिंधूचेनि माजें । कवणासि धाक नुपजे ।
येथ जरी कीं माझें । विहिती हन ॥ ज्ञा. १२।८८

संसारसमुद्राचे उन्मत्त स्वरूप पाहून कोण भिणार नाही ?

म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ।
करूनि त्यांचिया गांवा । धांवतु आलों ॥ ज्ञा. १२।८९
नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारीं ।
सजूनियां संसारीं । तारु जाहलों ॥ ज्ञा. १२।९०

अनाम जो मी त्याला हजार नावे ठेवून घेतली. त्याच हजार नौका आहेत. अशा रीतीने जीवांना तारले.

सडे जे देखिले । ते ध्यानकासे लाविले ।
परिग्रही घातले । तरियावरी ॥ ज्ञा. १२।९१
अंतर्बाह्य परिग्रह शून्य, शुकाचार्यासारखे होते.
जन्मतां संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कळंक तुका म्हणे ॥ तु.२८३४
एऱ्हवीं विषय जिणोनि जन्मले । जे शुकादिक दादुले ज्ञा. ११।१७३
नाना रंभेचेनिही रूपें । शुकीं नुठिजेचि कंदर्पें ॥ ज्ञा. १६।१२७
ब्राह्मणाचें पोर एक खेळासि भ्यालें । तें बारा वर्षे लपालें रे ।
कांपत कांपत बाहेर आलें । तें नागवेंचि पळून गेलें रे ॥ नाम. २१११

एकटा उतारू असला तर नावाडी नाव सोडत नाही. त्याला कांसेला लावतो. तसे परमात्म्याने ध्यानाच्या कांसेला लावले, आणि पार केले. दुसरे चीरपीरवाले, बायका, मुले, सर्व संसार बरोबर घेऊन आलेले, त्याच्यासाठी नको का नाव सोडायला ? अशा परिग्रहींना नामचिंतनाच्या

नौकावर पार नेले. प्रेमळांना प्रेम देऊन त्यांना पार नेले. मग पशु का असेना ! गजेंद्र हा हत्ती होता. तो नक्राच्या तावडीत सापडला. गजेंद्राने धावा केला तेव्हा त्याच्या धाव्याला परमात्मा धावून आला, आणि त्याला मुक्त केले अशा रीतीने जे जे शरण आले त्यांना त्यांना त्याने पार नेले. म्हणून आमचे महाराज म्हणतात–

तो हा उतरील पार । भव दुस्तर नदीचा ॥ २ ॥

ध्यायन्कृते यजन्यज्ञैस्त्रेतायां द्वापरेऽर्चयन् ।

यदाप्नोति तदाप्नोति कलौ संकीर्त्य केशवम् ॥ वि. पु. ३।२।१७

कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटी ॥ तु २४८७

कलियुगात नामाशिवाय दुसरा मार्ग नाही. महाराज स्वतःचा अनुभव सांगतात,

कोणी तरी कांहीं केलीं आचरणें ।

मज या कीर्तनेंविण नाहीं ॥ १८ ॥ तु. ३५६

हरि हरि तुम्हीं म्हणा रे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ॥०॥तु.२७१६

परमात्म्याच्या नामचिंतनाच्या सेवेने, परमात्मा मायानदीतून पार नेतो. मनुष्यजन्म मिळाला आहे. त्या भगवंताला शरण जा. परमात्मा म्हणतात–

जो मज होय अनन्य शरण । त्याचें निवारीं मी जन्ममरण ।

यालागीं शरणागता शरण्य मीचि एकु ॥ ज्ञा. ९।२८८

याप्रमाणे कायावाचामनाने भगवंताला शरण । जाऊन कृतार्थ व्हा.

(जय विठ्ठल, जय विठ्ठल)

----

# काय नव्हे करिता तुज

काय नव्हे करितां तुज । आतां राखे माझी लाज ।। १ ।।
मी तो अपराधाची रासी । शिखा अंगुष्टतोपाशीं ।। २ ।।
त्राहे त्राहे त्राहे । मज कृपादृष्टि पाहे ।। ३ ।।
तुका म्हणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ।। ४ ।।

भूमिका– परमात्मा हा सर्वशक्तिमान म्हणजे कर्तुम, अकर्तुम, अन्यथा कर्तुम् सामर्थ्यवान आहे; म्हणून तुकाराम महाराज भगवंताची करुणा भाकतात, कीं– हे प्रभो, तू केलेस तर काय होणार नाही ? वाटेल ते तुला करता येते. म्हणून आता माझी लज्जा रक्षण कर.

आतां माझी लाज राखे नारायणा । हीन दीन जना याचकाची ।।
याचप्रमाणे मिराबाई भगवंताची प्रार्थना करतात.

लाज रखो तुम मेरी । प्रभूजो लाज रखो तुम मेरी ।।ध्रृ.।। मीरा. १८

तु. म. भगवंताची लज्जा रक्षण कर म्हणून प्रार्थना करतात. ते कशा-विषयी वगैरे ते पुढे सांगू. अभंगाच्या दुसऱ्या कडव्यात महाराज म्हणतात की– मी नखशिखान्त पापाची राशी आहे.

मी तो अपराधाची रासी । शिखा अंगुष्टतोंपाशीं ।। २ ।।
भगवंताची करुणा भाकताना, त्यांनी जागजागी असेच म्हटले आहे.

पापाची मी राशी । सेवाचोर पायांपाशीं ।।१।। तु. १७५०
पतित पतित । परि मी त्रिवाचा पतित ।।१।। तु. १७८७
अपराधाचा केलों । तुका म्हणें किती बोलों ।।४।। तु. १७८७
मी तंव अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंद बुद्धि ।

मी असा आहे म्हणूनच देवा, तुमची प्रार्थना करतो, की **माझे रक्षण** करा ! हेच अभंगाच्या तिसऱ्या चरणात म्हणतात :

त्राहे त्राहे त्राहे । मज कृपादृष्टि पाहे ।।३।।
त्राहे त्राहे त्राहे सोडवीं अनंता । लागों दे ममता तुझे पायीं ।।०।। तु. १११६

आता तु. म. भगवंताची प्रार्थना करतात की हे देवा, माझी लज्जा रक्षण कर !

पतित मी राशी शरण आलों तुज ।
राखीं माझी लाज पांडुरंगा ।। तु. १६६७

अशी प्रार्थना करण्यासारखे तु. म. यांच्यावर कोणते संकट प्राप्त झाले होते ? काय त्यांच्यावर सावकारांनी फिर्याद करून त्यांचे घर, दार लिलावाला काढले होते, अथवा त्यांच्यावर कोणी फौजदारी केली होती, अथवा त्यांच्या कुटुंबातील कोणी असह्य रोगांनी आजारी पडलेला होता अथवा त्यांच्या स्वतःच्या शरीराला काही असाध्य रोग झाला होता ? अशी त्यांच्यावर कोणती अस्मानीसुलतानी गुदरली होती की ते भगवंताची प्रार्थना करतात की हे प्रभो, माझी लज्जा रक्षण कर ! वर निर्दिष्ट केलेली संकटे, त्यांपैकी एकही संकट महाराजांवर आले नव्हते. कदाचित वरील एकंदर संकटे महाराजांवर एकदम जरी कोसळली असती, तरी त्यांच्या निवारणार्थ तुकाराम महाराजांनी भगवंताला असे सांकडे घातले नसते. कारण त्यांना हे पक्के ठाऊक होत की–

प्रारब्धेंचि होय सुख । प्रारब्धेंचि पावें दुःख ।। तु. ३३८९
हां गा रोगु काय़ी रोगिया । आवडे दरिद्र दरिद्रिया ।
परी भोगविजे बळिया । अदृष्टें जेणें ।। ज्ञा, १८।१२९७
अदृष्टा आधीन जें शरीर । तेथें आलियाहो हरिहर ।
अन्यथा न करवे अणुमात्र । हें वेदशास्त्रसंगत ।। भा. ११।२३७
दैवास्तव देहाचें पाळण । ऐसा निश्चयो परिपूर्ण ।
जो चिंतीना देहभरण । तो महायोगी जाण दैवयोगें ।। ज्ञा. ४।१२५

असे हे प्रारब्ध बलवत्तर आहे की ते हरिहराला टाळता येत नाही. तु. म. या वरील अभिप्रायाला चांगल्या रीतीने जाणत होते. म्हणून ते शारीरिक अथवा प्रापंचिक संकटांच्या निवारणार्थ अशी प्रार्थना करीत नाहीत.

आणखी दुसरे असे की– जरी प्रारब्धबलेंकरून त्यांना ही अशी संकटे प्राप्त झाली असती तरी त्यांच्या ठिकाणी ही संपूर्ण संकटे सहन करण्याचे धैर्य होते.

आणि मातलिया इंद्रियांचे वेग । कां प्राचीनें खवळले रोग ।
अथवा योगवियोग । प्रियाप्रियांचे ॥ ज्ञा. १६।११९१
यया आघवियाचाहि थोरु । एके वेळे आलिया पुरु ।
तरी अगस्ति कां होऊनि धीरु । उभा ठाके ॥ ज्ञा. १६।११९२
आकाशीं धूमाची रेखा । उठिली बहुवा आगळिका ।
ते गिळी येकीं झुळुका । वारा जेवीं ॥ ज्ञा. १६।११९३
तैसें अधिभूताधिदैवां । [illegible] उपद्रवां ।
पातलेया पांडवा । गिळूनि घाली ॥ ज्ञा. १६।११९४

विषयोपभोगाकरिता इंद्रिये उन्मत्त झाली, प्रारब्धबलेकरून शरीरात रोगांनी उठाव केला, प्रियाचा वियोग व अप्रियाचा योग आला. या सर्वांचा ए[illegible] वेळी पूर आला तरी अगस्ति मुनीने ज्याप्रमाणे समुद्राला प्राशन केले, तसे हे धैर्य या सर्व लोंढ्याला गिळते. धुराच्या लोटाला वारा जसा एका झुळुकीसरसा गिळून टाकतो त्याप्रमाणे आधिभौतिक, आधिदैविक, आध्यात्मिक ताप (दुःख) प्राप्त झाले असता गिळून टाकतो (धैर्याने सहन करतो). तात्पर्य, असे जर आहे तर मग ते भगवंताची अशी प्रार्थना का म्हणून करतात ? अभंगाच्या शेवटच्या कडव्यावरून लक्षात येईल की केवळ सेवेविषयी भगवंताची प्रार्थना करतात की, हे प्रभो ! माझ्या हातून खरी खरी सेवा करून घ्या.

तुका म्हणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ॥ ४ ॥

सेवा घ्या म्हणून का प्रार्थना करतात ? तर तु. म. नी आपल्याकडे मुरडून पाहिले की आपल्या हातून भगवंताची खरी खरी सेवा होते की नाही. तेव्हा त्यांना असे कळून आले की आपण भगवंताचे दास आहोत अशी आपली जगामध्ये प्रसिद्धी झाली आहे.

नोहे दास खरा । परि हा झालासे डांगोरा ॥ १ ॥ ५२३
यासी काय करूं आतां । तूं हें सकळ जाणता ॥ २ ॥ ५२३

तुझा दास ऐसें म्हणती लोकपाळ । म्हणऊनी सांभाळ करी माझा ॥
याचप्रमाणे मीही मला तुझा दास म्हणवतो. तु. ॥ १६८८

म्हणवितों दास तें नाहीं करणी ।
आंत वर दोन्हीं भिन्न भाव ॥ तु. १२१४

भगवद्भक्त म्हणविणे सोपे आहे.

भक्त म्हणवितां वाटे गोड । भजनमुद्रा अति अवघड ।
भक्तीचें अंतर अतिगूढ । न कळे उघड श्रुतिशास्त्रां ॥ भा. १४।२४१
ज्ञान सांगतां अतिसुगम । भक्ति रहस्य गुह्य परम ।
अकृत्रिम उपजे प्रेम । ऐसें हे वर्म लाविल्या नलगे ॥ भा. १४।२४२

गातों नाचतों तें दाखवितों जना ।
प्रेम नारायणा नाहीं अंगीं ॥ तु. १९१४

लोक आपल्याला भगवंताचे दास म्हणतात आणि मीही मला भगवंताचा दास म्हणवतो. परंतु भगवंताची खरी खरी सेवा आपल्या हातून घडत नाही हे महाराजांना कळून आले. म्हणून प्रापंचिक संकटापेक्षाही त्यांना याविषयीचे अतिशय दुःख वाटत होते.

भजनीं विक्षेप तेंचि पैं मरण ।
न वजावा तो क्षण एक वाया ॥ ० ॥ तु. ६४८

तुका म्हणे नको वरपंग देवा ।
घेई माझी सेवा भावशुद्ध ॥ ६ ॥ तु. ११३३

त्यांना वरपंग दिखाऊ सेवा नको होती, खरी खरी सेवा आपल्याकडून व्हावी एवढ्याकरिता भगवंताकडे प्रार्थना.

तुका म्हणे देवा । सत्य घ्यावी आता सेवा ॥ ४ ॥

## व्याख्यान

तुकाराम महाराज भगवंताची करुणा भाकतात की हे प्रभो ! तू केलेस तर काय होणार नाही ?

करिसील तरी नव्हे काई । राईचा डोंगर पर्वत राई ।
आपुले करुणेची साई । करीं वो आई मजवरी ॥ तु. ६९६

तुजकरितां होय ऐसें काय नाहीं।
डोंगराची राई रंक राणा ॥ १ ॥ तु. ३४८

तुजकरितां होते ऐसे। मूढ चतुर पंडित पिसे ॥ १ ॥ तु. ३७८५

मूढ चतुर होतात, तू केलेस तर–

नातरी मधुवनीं ध्रुवासि केलें। जैसें कपोल शंखें शिवतलें।
आणि वेदांचियेही मती ठेलें। तें लागला बोलों ॥ ज्ञा. ॥ ११।१८४
उल्लंघिती पांगुळ गिरी। मुकें करी अनुवाद ॥ ३ ॥ ३७८५
मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्।
यत्कृपा तमहं वंदे परमानंद माधवम् ॥ ० ॥
तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं। भग्नावयवा चौरंगी।
भेटला कीं तो सर्वांगीं। संपूर्ण जाला ॥ ज्ञा. १८।१७५३
आनंद तेथींचा मुकियासी वाचा। बहिरे ऐकती कानीं रे।
आंधळयासी डोळे। पांगुळांसी पाय।
तुका म्हणे वृद्ध होती तरणे रे॥ तु. २४६
अवघें हेळामात्रें हरि। मुक्त करी ब्रह्मांड ॥ ५ ॥ ३७८५

ज्ञानेश्वर महाराजही देवाला म्हणतात कीं– हे देवा, तूं वाटेल ते करतोस.

आवडे तें करिसी देवा। कवण करी तुझा हेवा रे ॥ धृ. ॥ ३३३
यम-नियम पाप-पुण्य आम्हांसी। आपण भलतेंचि करिसी।
तुझिया थोरपणा विहुनि असावें। कवणें शंकावें रायासी।
प्रत्यक्ष जगी बाटली नारी। तिचें स्मरण लोकांसी।
पुराणें डांगोरा पिटिताती। हें पतिव्रतापण तयेसी ॥१॥ ज्ञा. अ. ३३३

यमाचे पाच प्रकार आहेत :

अहिंसा सत्यमास्तेय ब्रह्मचर्यपरिग्रहा यमाः। पातं० योगसूत्र २।३०

नियमाचेही पाच प्रकार आहेत :–

शौचसंतोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः ॥ पा. यो.सूत्र.२।३२

ज्ञा. म. म्हणतात– देवा ! हे यम–नियम आमच्या मागे लावलेत म्हणजे आम्ही करावे असे सांगितलेस त्याचप्रमाणे शम-दमही आम्ही करावे असे सांगितलेस. पण,

या जालियां मानसा कहीं। युक्तीची कांबी लागली नाहीं।
तरी निश्चळ होईल काई। कैसेनि मांगें ।। ज्ञा. ६।४२३
म्हणोनि मनाचा निग्रहो होये। ऐसा उपाय जो आहे।
तो आरंभी मग नोहे। कैसा पाहों।। ज्ञा. ६।४२४
शम तरी सर्वेंद्रियाचिया वृत्ती । घेऊनि आपल्या हातीं ।
बुद्धि आत्मया मिळे कांतीं । प्रिया जैसी ।। ज्ञा. १८।८३३
दमः– आणि बाह्येंद्रियाचे धेंडें। पिटूनि विधीचेनि दंडें।
नेदिजे अधर्माकडे। कहींचि जावों।। ज्ञा. १८।८३५

याचप्रमाणे अमुक केले तर पुण्य, अमुक केले तर पाप लागते असे हे पुण्यपापाचे विधान तू आम्हाला सांगतोस, आणि तू स्वतः वाटेल तसे करतोस. आता फार काय सांगावे, आम्हाला लग्नाची एक स्त्री असताना दुसरी केली तर हे करणे तू पाप म्हणून सांगतोस.

या आशयाचे तु. म. नी आपल्या अभंगात विधान केले आहे.

एका पुरुषा दोघे नारी। पाप वसे त्याचे घरीं।। तु. २९६०

काय आश्चर्य आहे ! आम्ही दोन बायका केल्या तर पाप आणि तुला बायका पाहिल्या तर :–

भीमातीरीं एक वसविलें नगर। त्याचे नांव पंढरपुर रे।
तेथील मोकासी चार भुजा त्यासी।
बाइला सोळा हजार रे।। १ ।। तु. २४६
नाचत जाऊं त्याच्या गांवा रे खेळिया।
सुख देईल विसावा रे।। धृ. ।। तु. २४६

एवढें करून तू आपल्याला ब्रह्मचारी म्हणवतोस.

एका जनार्दनी हरि तू लाघवी होसी।
इतुक्याही भोगूनि ब्रह्मचारी म्हणविसी।। ० ।।

तुका म्हणे नटधारी । भोग भोगून ब्रह्मचारी ।।४।। तु. १६६
गोकुळम्याने राज करत है । नाम रखा गिरीधारी ।
सोळा सहस्र लौंड्या भोगे होय ब्रह्मचारी ।। एक. ३९५५
बरे, ब्रह्मचारी नाही म्हणावे तर जड यमुना साक्ष देते.

मज भुली पडली केशापरी । आम्हां भोगूनी म्हणे मी ब्रह्मचारी । दिली वाट यमुने माये खरी । तुम्हां आम्हां न कळे अद्यापवरी ।। तु. १२१
बोले दूतिकेशी राधा हे वचन ।। धृ०।।

सोळा सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा । निराहारी दुर्वासा नवल नव्हे
।। ३ ।। ९४८

तुझिया थोरपण। बिहुनि असावें । तुझ्या मोठेपणाला भिऊन आम्ही असावे– प्रत्यक्ष जगी बाटली नारी तिचें स्मरण लोकांसी । पुराणें डांगोरा पिटिताती हें पतिव्रतापण तयेसी ।। •

अहल्या ही ब्रह्मदेवाची मानसकन्या. हिचा विवाह गौतमऋषींशी झाला.

इंद्राने गौतमरूपाने हिच्याशी समागम केला हे कळल्यावर गौतमाने हिला शिळा होशील असा शाप दिला.

अहल्येचिया संगतीं । गौतमें विटंबिला अमरपती । भा. ८।१३४
अहल्या जे व्यभिचारिणी । लागतां श्रीरामचरणीं ।
तिचेनि नामें पापाधुणी । प्रातःस्मरणी पढविली ।। भा. २३।९९०

अशी प्रत्यक्ष जगात बाटलेली (व्यभिचाराने दूषित) तिचे पतिव्रता म्हणून प्रातःस्मरण केल्याने पाप जाते असा पुराणे डांगोरा पिटतात.

पापी होती पुण्यवंत । न करी घात दुर्जन ।। ४ ।। तु. ३७८५
बहुता परी उणें ऐकिजे पांडवा सांगो या गोष्टी ।
पांचापासूनि जन्मले पांचैजण । एक पत्नीच्या पोटीं ।
गोत्रवध करुनि राज्य करिती । विश्वासि वंद्य शेवटी ।
जन्मेजया ऐसें बोलिला सत्य तो पापिया जाला कुष्टी ।। २ ।।
पांडव हे किती तरी निंद्य म्हणू सांगावे !

कागाचिये विष्ठे जन्म पिंपळासि । पांडव कुळासि पाहतां दोष ॥३॥
तु. ३२५०

पांडवांचे कूळ कडू म्हणून म्हणायला काही खोटे नाही. एक का उणे म्हणून सांगावे ? काय काय उणे सांगा !

पाचापासून पाच झालेत. बरे एका पत्नीच्या पाठी-पाचात एक बायको आणि तीही पतिव्रता !

तात्पर्य, जग निंद्य राज्य मिळविले तेही गोत्रजांचा वध करून.
पाहा पां काई नारायणें । तया पांडवांचें उणें ।
कीजेचि ना पुराणें । विश्ववंद्य ॥ ज्ञा. १५।२५
अंगीकार ज्याचा केला नारायणें । निंद्य तेंहि वंद्य केलें ॥ १॥ ३६३०
प्राण जाइ तंव बोभाइला । तुज पतन तया दशरथा ।
गणिका एक पारिवरू पोरिवलें होतें पाचारिलें प्राण जातां ।
कीं तयेसी ऊर्ध्वगति ऐसीं बोलती पुराणें कासया न मिळे पाहतां ।
दोन्ही खुंटले तुजपासीं देवा । वेव्हारु नाहीं सर्वथा ॥ ३ ॥

महाराज म्हणतात, देवा !

आम्ही भाव जाणों देवा । न कळती तुझिया मावा ।
गणिकेचा कुढावा । पतना न्यावा दशरथ ॥ १ ॥ तु. १२५२
कुंटिणी ते दोष वहु आचरली । नाम घेतां आली करुणा तु. २५२८
तूतें आराधी ना आयके । होती पूंसा बोलाविंत कौतुके ।
तिये वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाडु केला ॥ ज्ञा. ११।१०७

प्राण जातेसमयी दशरथाने स्मरण करून प्राण सोडला. त्याला अधोगती आणि जन्मभर जिने पापाचरण केले त्या गणिकेला वैकुंठाला नेले.

तु. म. म्हणतात. बोलणे संपले । हा व्यवहार आहे काय ?
धुंद झाला तुझे दरबार । पांडुरंग सरकार अंधेरी ॥ धृ. ॥

जनाबाई, अ. ३३७

एक गुरु व शिष्य फिरत फिरत एका राजधानीच्या शहरात आले. शिष्य काही खाण्यापिण्याचे सामान खरेदी करण्यास गेला. "अंधेरी नगरी बेबंद राजा। टक्के शेर भाजी, टक्के शेर खाजा ॥ भाजी घ्या का खाजा घ्या,, काही घ्या, टक्क्याला शेरभर." शिष्याला मोठा आनंद झाला. तो म्हणाला येथे काही दिवस राहू. टक्क्याला शेरभर खाजा मिळतो. मजा आहे. गुरुजी म्हणाले, येथे क्षणभर थांबणे बरे नाही. शिष्याच्या हट्टामुळे थांबले. राजवाड्यात मोठा दरोडा पडला. चोर पळून गेले. ज्याच्या हाताला बेड्या बसतील त्यांना धरून आणा. असा हुकूम सुटला. गुरु–शिष्य तगडे होते. शिपायाने त्यांना पाहिले. धर्मशाळेत आणून त्यांच्या हातात बेड्या टाकल्या. त्याबरोबर बसल्या. राजदरबारात नेले. राजाला सांगण्यात आले. चोर धरून आणले. न्याय न करताच 'द्या त्यांना फासावर.' शिष्य धाय मोकलून रडू लागला. गुरुजी म्हणाले, हे मी तुला सांगितले होते. परंतु तुला त्या वेळी पटले नाही. गुरुजी म्हणाले, तू म्हण की मी पहिल्यांदा फासावर जाईन. मी म्हणेन की मी पहिल्यांदा जाणार ! असा वाद निर्माण कर. शिष्य म्हणाला, याच्याने काय निष्पन्न होईल ? त्यांनी वादाला सुरुवात केल्यावर राजाच्या कानावर ही वार्ता गेली. राज व प्रधान आले. राजाने विचारले, वाद का म्हणून करता ? हुजूर, हा शिष्य म्हणतो की या जन्मात मी तुमची सेवा केली. आता मला पहिल्यांदा फासावर जाऊ द्या म्हणजे मी या नगरीचा राजा होईन व तुम्ही मागाहून फासावर जाऊन तुम्ही प्रधान व्हावे. माझे म्हणणे मी तुझा गुरु आहे, मला प्रथम फासावर जाऊ दे. म्हणजे मी राजा होईन. तू मागाहून फासावर जा आणि तू प्रधान हो, असा हा वाद आहे. राजा म्हणाला, आम्ही दोघे फासावर जाऊ व आम्हीच या नगरीचे राजे होऊ असा हा कारभार आहे.

मांडव्यऋषी हे महान तपस्वी, तसेच थोर पुण्यवान असून तीर्थरूप झालेले, तसेच मंत्रच त्यांच्या रूपाने अवतरलेले. तेजःपुंज असे हे ऋषी एका राजाकडे त्यांचे गुरुजी म्हणून राहात होते. एकदा राजवाड्यात मोठा दरोडा पडला. चोरांचा पाठलाग शिपाई करीत असता चोरांनी पाहिले की, आपल्याला पोलिस गाठणार; म्हणून असलेला ऐवज नदीकिनाऱ्यावर ध्यान

करीत बसलेल्या मांडव्य ऋषीजवळ टाकून पळून गेले. शिपायांनी ऐवजासह मांडव्य ऋषीला दरबारात आणले. हुजुरांना सांगण्यात आले, ऐवजासह चोराला दरबारात हजर केले आहे. राजाचा हुकूम, त्याला शूळावर द्यावे. मांडव्य ऋषीला शूळावर बसवले. कंठापर्यंत शूळ आला तरी मांडव्य मरत नाही. आश्चर्य म्हणून बातमी राजाच्या कानावर गेली. राजा खाली येऊन पाहतो तो आपले परमपूज्य आचार्य शूळावर. त्यांना खाली उतरवण्यात आले. झालेल्या अपराधाची क्षमा मागितली. मांडव्य ऋषीने यमधर्माला व चित्रगुप्ताला जमाखर्च घेऊन बोलावले. विचारले की, मी कोणते पाप केले की ज्या पापामुळे मला शूळावर चढवण्यात आले. जमाखर्चात जमेला मोठमोठ्या रकमा होत्या. नावेला नाही. फक्त एक रकम नावेला पडलेली मिळाली. बाल्यावस्थेत मांडव्याने एका भिंगाच्या ढुंगणात कांटा घालून फिरवला होता, तेवढ्याकरिता एवढ्या महान तपस्वी, थोर पुण्यवानाला तीर्थरूप, तेजःपुंज मांडव्य ऋषीला शूळावर दिले आणि,

पुत्रा पाचारिलें पापियें दुर्जनें । तो वैकुंठी अजामेळ सरता रे रे ।
अजामीळ अंत मरणासी आला । तोंवरि स्मरला नाही तुज ।। तु. १२८
ख्याती केली अजामेळें । होते निघाले दिवाळे ।। ३५५१
मोकलिला प्रायश्चित्तीं । कोणी न धरती हातीं ।। ३ ।। ३५५१
पुत्राचिया लोभें नष्ट म्हणे नारायण । कोण कर्तव्य तुका म्हणे त्याचे पुण्य ।
महादोषांचा मरिगळा । अतिनष्ट अजामेळा ।
तोहि नामें निर्मळ केला । प्रतापु आगळा नामाचा ।। भा. ५।३२१

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात त्या दुष्टाला, वैकुंठाला आणि महान तपस्वी थोर पुण्यवानाला शूळावर– देवा हे काय आहे ?

आवडे तें करिसी देवा । कवण करी तुझा हेवा रे ।। धृ ।। ज्ञा. ३२३

याप्रमाणे भगवंताचे कर्तुम् अकर्तुम्, अन्यथाकर्तुम् असे सामर्थ्य तुकाराम महाराजांच्या डोळ्यांपुढे, चित्राप्रमाणे रेखाटलेले होते. म्हणजे भगवंताच्या सामर्थ्याला तु. म. चांगल्या रीतीने जाणत होते. म्हणूनच ते

भगवंताची करुणा भाकतात, " काय नव्हे करितां तुज । आता राखे माझी लाज । " तुकाराम महाराज देवाला काय करायला सांगतात, ते अभंगाच्या शेवटच्या कडव्यात महाराजांनी स्पष्ट केले आहे.

तुका म्हणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ॥ ४ ॥

तुका म्हणे नको वरपंग देवा । घेई माझी सेवा भावशुद्ध ॥३॥ तु.११३३
महाराजांनी जागजागी सेवेचीच मागणी केली आहे.

आतां मज साह्य येथे करावें देवा ।
तुझी घेई सेवा सकळ गोवा उगवूनि ॥ तु. ४५७
संतसंगति देई चरणसेवा । जेणें हा दुरा निरर न पडावा ।
हाचि भाव माझिया जीवा । पुरवीं देवा मनोरथ ॥ २ ॥ ६९
आणीक कांहीं नाहीं मागणें । सुख संपत्ती राज्यचाडधनें ।
सांकडें न पडे तुज जेणें । दुजें भक्तीविण मायबापा ॥ तु. ६२९

खरी सेवा घ्या म्हणजे काय ? भावशुद्ध प्रेमयुक्त सेवा घ्या. पर्यायाने तुकाराम महाराज देवाजवळ प्रेमाचीच मागणी करतात.

प्रेमाचीच का ? आणि देवाजवळच का ? वगैरे दोन गोष्टी सांगावयाच्या आहेत.

प्रेमावाचून कोणत्याच प्रकारची सेवा घडत नाही. पारमार्थिक दृष्टीने भगवंताची यथार्थ सेवा, प्रेम असेल तरच घडेल. सेवा करणे वेगळे व सेवा घडणे वेगळे. सेवा घडते ती प्रेमानेच.

प्रेमाविण भजन नाकाविण मोती । अर्थाविण पोथी वाचू नये ॥
प्रेमेंवीण श्रुतिस्मृतिज्ञान । प्रेमेंवीण ध्यानपूजन ।
प्रेमेंवीण श्रवण कीर्तन । वृथा जाण नृपनाथा ॥ भा० २।३२५

एवढ्याकरता महाराजांनी जागजागी प्रेमाची मागणी केली आहे.

करूनी उचित । प्रेम घाली हृदयांत ॥ १ ॥ ४११०
आलों दान मागायास । थोर करूनियां आस ॥ २ ॥ तु. ४११०

ठाकलोंसें द्वारीं । उभा याचक भिकारी ॥ १ ॥ तु. ११८२
मज भीक कांहीं देवा । प्रेम भातुकें पाठवा ॥ २ ॥ तु. ११८२

याप्रमाणे प्रेमाची मागणी केली, प्रेमावीण देवाची खरी सेवा घडत नाही. आता देवाजवळच का मागतात ? स्वतःच्या सामर्थ्याने संपादन करणे कठीण म्हणून देवाजवळ मागतात. आणि भगवान भक्तांना देत असतील तर प्रेमच देतात.

तया माझिया सायुज्याची चाड । तरि तेंचि पुरवीं काड ।
कां सेवा म्हणती तरी आड । प्रेम सुये ॥ ज्ञा. ९।३४१
प्रेम देयाचे देणे । देहभाव जाय जेणें ।
न धरावी मने । शुद्धी देशकाळाची ॥ तु. २२४६

ज्या प्रेमामध्ये देशाचा, काळाचा आठव रहात नाही असले प्रेम परमात्माच देतात. हे भगवद् उक्तीवरून दिसून येते. ते कसे प्रेम असते ?

गायनाचे रंगीं । शक्ति अद्‌भुत हे अंगीं ॥ १ ॥ ३७६५
हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडित सेवा ॥ २ ॥ ३७६५
अंगी प्रेमाचें भरतें । नेघे उतार चढतें ॥ ३ ॥ ३७६५

ज्या सेवेला खंड नाही.

अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका म्हणे गंगे मिळणी सिंधू ॥
मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें ।
मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥ ज्ञा. १३।६०७
गंगा जैसी अनन्य गती । मिळालीचि मिळे ॥ ज्ञा. ११।६८७
तैसें सर्वेंद्रियां सहित । मज माजीं सूनि चित्त ।
जे रात्रि दिवस न म्हणत । उपासिती ॥ ज्ञा. १२।३८
नाठवुनि देह पायांचें चिंतन । अवसान तें क्षण नाहीं मधी ॥ १५९४

व्यापार अखंड चालण्यासाठी भांडवल अखंड लागते म्हणून ज्या प्रेमाला चढ-उतार नाही असे अखंड प्रेम मागतात.

अंगीं प्रेमाचें भरतें । नेघे उतार चढतें ।। ३ ।। तु. ३७६५
कीं वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पांडुसुता ।
तैसी नीच नवी भजतां । श्रद्धा दिसे ।। ज्ञा. १२।३६
परी ठाकिलियाही सागरु । जैसा मागीलही यावा अनिवारु ।
तिथे गंगेचिये तैसा पडिभरु । प्रेमभावा ।। ज्ञा. १२।३७

गंगा समुद्रास मिळाल्यानंतरही जसा मागील पाण्याचा अनिवार लोट येत असतो. त्याप्रमाणे प्रेम नित्य नवे त्याला खंड नसतो. तुम्ही आम्ही देवाची सेवा करतो, पण प्रेम कुठे आहे ? प्रेम नाही हे कशावरून ! देवाकरता कोणी कधी तरी रडतो का ? मुलाकरिता बायकोकरिता रडतात.

वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च ।।शा.१४।२४
नयनी अश्रूंचा पुर लोटी । उभंडू संटेचि पोटिं । भा. १४।३१९

असे होत नसेल समजावे, भगवद्‌विषयक प्रेम नाही.

न ये नेत्री जळ । नाही अंतरी कळवळ ।। १ ।। २९४०
तों हे चावटीचे बोल । जन रंजवणें फोल ।। २ ।। तु. २९४८

भगवद्‌विषयक प्रेम निर्माण झाले असता–

तुका प्रेमें नाचे गाय । गाणियांत विरोन जाय ।। २३४१
तुका वेडा अविचार । करी बडबड फार ।। १ ।। २१७३
बोल नाड्कें कोणाचे । कथे नागवाचि नाचे ।। ५ ।। २१७३

भगवंताकडून प्रेम मिळाल्यानंतर अशी अवस्था होते. असे प्रेम द्या आणि खरी खरी सेवा घ्या अशी मागणी करतात.

( जय विठ्ठल जय विठ्ठल )

# जिंकावा संसार

**जिंकावा संसार । येणें नांवें तरी शूर ॥ १ ॥**
**येर काय तीं बापुडीं । कीर अहंकाराचीं घोडीं ॥ २ ॥**
**पण ऐशा नांवें । देव धरिजेतो भावें ॥ ३ ॥**
**तुका म्हणे ज्यावें । सत्कीर्तीनें बरवें ॥ ४ ॥**

उपोद्घात – या अभंगात महाराज शूराची व्याख्या सांगतात. शूर कोणास म्हणावे ? खरा क्षत्रिय कोण आहे ? कोणी म्हणेल, शूराची व्याख्या सांगत असतान। मध्येच क्षत्रियाचे काय काढले ? तर शौर्य हे क्षत्रियाचे ठिकाणी असते. ब्राह्मणादि चार वर्ण आहेत. त्यांमध्ये क्षत्रियाचे कोणते गुण आहेत ते गीता सांगते.

शौर्य तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ॥
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ गी. १८।४३

क्षत्रियाच्या ठिकाणी मोठे शौर्य असते. एखाद्या दळुबाईला क्षत्रिय म्हणावयाचे नाही. तु. म. शूर कोणाला म्हणावे, शूराचे कर्तव्य काय हे प्रथम चरणात सांगतात :–

जिंकावा संसार । येणें नांवें तरी शूर ॥ १ ॥

संसाराला जो जिंकील, संसाराचा पराभव करील, त्याचे नाव शूर आहे. पण संसार म्हणजे काय व त्याला जिंकावयाचे कसे हे आपल्याला सांगावयाचे आहे.

या कीर्तनाला घेतलेल्या अभंगाचे दुसऱ्या चरणात महाराज संसाराचे स्वरूप सांगतात. देहाभिमानाला त्यांनी संसार म्हटले आहे. अहंकाराला संसार का म्हटले, वगैरे विचार पुढे सांगण्यात येईल, जे संसाराचे आधीन आहेत ते बिचारे संसाराला काय जिंकणार ?

येर कार तीं बापुडीं । कीर अहंकाराचीं घोडीं ॥ २ ॥

तुकाराम महाराजांच्या मते संसार म्हणजे देहाभिमान. सर्वच प्राणी देहाभिमानाच्या तडाक्यात सापडलेले आहेत. म्हणजे सर्वजण अहंकाराचे बसण्याची घोडी आहेत. अहंकार कोणाच्या ठिकाणी नाही ? पशुपक्ष्यादिकांचे ठिकाणीदेखील अहंकार आहे. कशावरून म्हणाल तर– गाढव, डुक्कर, कुत्रे, बैल यांना स्वतःच्या देहाचा अभिमान आहे. कारण ते आपआपल्या जातीत मिसळतात. गाढवाला वाटते की, मी गाढव व ही गाढवी माझी बायको आहे. याचप्रमाणे चिमण्या, राघू सर्वांचे असेच आहे. कोणीही असो, ज्यांनी देहाहंकाराला जिंकले नाही, ते अहंकाराला बसण्याची घोडीच आहेत. त्यात काही घोडी जास्त किमतीची आहेत. कोणी म्हणेल हे तुम्ही कशावरून जाणता ? त्यांची परीक्षा खोगिरावरून कळते. ज्या घोड्यांच्या पाठीवर जसा खोगीर असेल तशी त्याची किमत समजावी. काही घोड्यांच्या पाठीवर शालजोडी असते, काही घोड्यांच्या पाठीवर साधे उपरणे असते. आम्हीसुद्धा अहंकाराचे बसण्याचे घोडेच, पण कमी किमतीचे. शास्त्री, पुराणिक इत्यादी मंडळींच्या ठिकाणी अभिमान फार असतो. ते एखाद्या सभेला का गेले, त्यांना बहुमानाने या बसा म्हटले नाही की रागावतात. आणखी यात काही खडतर घोडे असतात. खडतर घोडी लगाम घालू देत नाहीत व खोगीरही ठेवू देत नाहीत. मनुष्य लगाम घालण्याकरता पुढे गेला, तर चावण्यास धावतात आणि खोगीर ठेवण्यास मागे गेला तर लाथा मारतात.

पुढें चाविरा मागें लातिरा। ऐक तिसरा रजोगुण ॥ भा. १३।१२२

जबरदस्तीने लगाम देऊन खोगीर ठेवले तरी वाटेने नीट चालणार नाही. स्वारी करू देत नाही. तसे खडतर घोडे कोण आहे ?

तैसा शास्त्रागुरुचेनि नांवें । जो वाराही टेंकों नेदी सिवें ।
केवळ मौढ्याचेनिचि जीवें । जियाला जो ॥ ज्ञा. १८।३९०

ज्या दिशेला शास्त्र व गुरु आहेत तिकडचा वाराही शिवेवर टेकू द्यायचा नाही. मग साधूंची संगती कशाला करतील ? नाटक, तमाशा, सिनेमाकडे हटकून जातील. चहाडी, चोरी, निंदा, शिंदळकी करतील.

देखोनि हरखली अंड । पुत्र झाला म्हणे गांड ।
तंव तो झाला भांड । चहाड चोरटा शिंदळ ॥ १ ॥
जाय तिकडे पीडी लोकां । जोडी मांडवल थुंका ।
थोर झाला चुका । वर कां नाहीं घातली ॥ २ ॥
भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें ।
बोले निष्ठुर उत्तरें । पाप दृष्टि मळिण चित्त ॥ ३ ॥
दुराचारी तो चांडाळ । पाप सांगातें विटाळ ।
तुका म्हणे खळ । म्हणोनियां निषिद्ध तो ॥ ४ ॥ तु. २७७३

गर्भाचे आवडी मातेचा डोहळा ।
तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥ तु. ३९५

असे हे सर्व खडतर घोडे. याच्या उरावर अहंकार बसला आहे. म
तु. म. म्हणतात–

येर काय तीं बापुडीं । कीर अहंकाराचीं घोडीं ॥ २ ॥

कीर्तनाला घेतलेल्या अभंगाच्या तिसऱ्या कडव्यात मनुष्याने प्र
काय करावी ते सांगतात.

पण ऐशा नांवें । देव धरिजेतो भावें ॥ ३ ॥

अशीच प्रतिज्ञा केली पाहिजे की, मी मनुष्यजन्माला आलो आहे
परमात्म्याची प्राप्ती करून घेणार. कारण मनुष्यजन्म परमात्मप्राप्तीकरता
आहे. संसार वाढविण्याकरता नाही. परमात्मप्राप्ती करून घेईन तरच मरेन.
परमात्मप्राप्तीच्या साधनात वाटेल ते कष्ट झाले, तरी हरकत नाही. कि
दुरात्मे भलतीच प्रतिज्ञा करतात.

कुटुंबाच्या सांगण्यावरून आईला नागवी उघडी करण्याची प्र
करतो. आईला शिव्या देतात व तुला घराच्या बाहेर ओढून काढीन
प्रतिज्ञा करतो. वास्तविक आईचे केवढे पावित्र्य !

सकळ तीर्थांचिये धुरे । जियें का माता पितरें ।
तयां सेवेसि कीर शरीरें । लोण कीजे ।

ज्ञा. १७।२०७

...मातृदेवो भव" "पितृदेवो भव" किंवा एखादा मनुष्य प्रतिज्ञा करितो ... तुझा मुडदा पाडीन. या अवनतीला, अधोगतीला नेणाऱ्या प्रतिज्ञा ... भक्तिभावाने देवाची प्राप्ती करून घेण्याची प्रतिज्ञा करावी. ...जन्मात हाच प्रतिज्ञेचा विषय आहे. इतर प्रतिज्ञेचे विषय आहीत.

...वटच्या कडव्यात महाराज म्हणतात. मनुष्याने असेच जगावे की ... या लोकात कीर्ती होईल.

तुका म्हणे ज्यावे । सत्कीर्तीनें बरवें ।। ४ ।।

नाही तर सर्वच लोक जन्माला येतात व मरतात. पण कुठे कीर्तीचा लागलेला आहे?

उदंडचि झाले जन्मोनिया मेले । होऊनिया गेले राव रंक ।। ३६७३

त्यांचे नाम कोणी नेघे चराचरीं ।। ३६७३

...हा सर्वांच्या पाठीमागे लागला आहे.

देहाचिया गांवा आलिया । जन्म–मृत्युचिया सोहळिया ।

...ना म्हणों नवें धनंजया । जियापरि ।। ज्ञा. १८।१०१

भगवान श्रीकृष्ण व प्रभू रामचंद्र हे का मानवी पुरुष होते?

...कृष्णस्तु भगवान स्वयम् । "

दुर्जनांचा येणेंकरूनी संहार । पूर्ण अवतार रामकृष्ण ।। तु. १५।१४

पण ते आज आहेत का? तर नाहीत. वास्तविक ते जन्म–मरणाचे ...आधीन नव्हते. किंतू जन्ममरण त्यांच्या आधीन होते. पण या मृत्युलोकाची ...ही काही मौज आहे, कोणी जन्ममरणाचें आधीन असो अथवा जन्ममरण ...ज्याचे आधीन असो, पण त्याला मरावे हे लागतेच.

येथे नाही उरो आले अवतारा । येर ते पामर जीव किती ।। तु.२८०७

मनुष्याने मरावे पण कीर्तीच्या रूपाने जगावे.

तुका म्हणे एका मरणेंचि सरे । उत्तमचि उरे कीर्ति मागें ।। तु. ३३४३

उभय लोकीं उत्तम कीर्ति । देव चित्ती राहिला ।। ३ ।। ३३०१

मनुष्यजन्माला येऊन कोटचवधी रुपये मिळविले, बायका केल्या, प्रजा निर्माण केली म्हणून त्याची कीर्ती जगात राहील काय ? हे द्या सोडून, पण सार्वभौमपद मिळवून सर्व जगावर ज्यांनी सत्ता चालविली, तरी त्याची कीर्ती राहील काय ?

उदंडचि झाले जन्मोनिया मेले। होऊनिया गेले राव रंक ॥ ३६७३

कित्येक मरणानंतर आपले नाव राहवे म्हणून स्वतःला मुलगा नसला तर दुसऱ्याचा मुलगा दत्तक घेतात. म्हणून कीर्ती राहते का ? कीर्ती फक्त त्यांचीच राहते की ज्यांनी देव चित्तात धरला.

'देव चित्तीं राहिलिया' तु. ३३०१

वैष्णवांची कीर्ति गाइली पुराणीं। साही अठरा जणीं चहूं वेदीं॥ तु. २३२५

जो ज्येष्ठ पुत्र भरत जाण। तो नारायण परायण।

अद्यापि भरतवर्ष उच्चारण। त्याचेनि नावें जाण विख्यात ॥ ० ॥

नामे ख्याती केली उदंड। यालागीं त्यातें म्हणती भरतखंड।

भा. २।१३९,४०

तसेच आमचे महात्मे–

उभारिला ध्वज तिहीं लोकांवरी। ऐशी चराचरी कीर्ति ज्यांची ॥०॥

ते हे निवृत्तिनाथ ज्ञानेश्वर सोपान। मुक्ताबाई ज्ञानदीप्ती कळा ॥०॥

निळो. १५५१

गोरा कुंभार, सावता माळी, रोहिदास चांभार, चोखा मेळा इत्यादी मंडळींची कीर्ती अद्याप जशीच्या, तशीच आहे. तसेच व्यास, वसिष्ठ, अंबऋषी, शंकराचार्य वगैरे मंडळींची कीर्ती युगेनि युगे गेली तरी ताजी आहे.

तुका म्हणे ज्यावें। सत्कीर्तीनें बरवे ॥ ४ ॥

## व्याख्यान

तु. म. संसाराला जिंकण्यास सांगतात. खरे खरे शौर्य संसार जिंकण्यातच आहे. पण संसार म्हणजे काय ते प्रथम सांगतो. मग त्याला जिंकावयाचे कसे ते सांगेन.

संसार कशाला म्हणतात, हे समजावयास पाहिजे. कोणी म्हणेल संसार म्हणजे काय, हे सांगण्याची तुम्ही कशाला तसदी घेता ? त्याचे कारण तुम्ही-आम्ही ज्याला संसार समजतो, त्याला शास्त्रकार संसार म्हणत नाहीत. तु. म. नी सांगितले की संसार म्हणजे देह-अहंकार. हे जरी काही शहाण्या मनुष्याला समजले तरी बहुतेकांच्या मते संसार म्हणजे बायको, मुले, घर, दार, पैसा-अडका इत्यादी. सुदैवाने एखाद्याला सर्व काही अनुकूल असते, मग तो म्हणतो– आमच्या संसाराचा गाडा चांगला चालला आहे. पण कल्पना करा, एखाद्याचे कुटुंब आटोपले, मग तो म्हणतो संसार बुडाला. कोणाचा एकुलता एक मुलगा मेला की तो म्हणतो संसार संपला. एखाद्याच्या घराला आग लागली, की तो म्हणतो, संसाराची राखरांगोळी झाली. तु. म. नी देहअहंकाराला संसार म्हटले, ते का याची चांगली कल्पना करता यावी म्हणून पहिल्यांदा देहअहंकाराच्या आश्रयाचा विचार करू या. देहाहंकाराचा कोणी तरी आश्रय असला पाहिजे. संसार निराश्रित राहू शकत नाही. कारण तो आहे कल्पित. आणि कल्पित वस्तू निराधार राहूच शकत नाही. तेव्हा या संसाराला आश्रय तरी कोण आहे हे पाहू. या विश्वा-कडे जर पाहिले; तर आपल्याला दोनच पदार्थ दिसतील. अनंतावधी पदार्थ जरी असले, तरी सर्वांचा ज्याच्यात अंतर्भाव होतो, असे दोनच पदार्थ दिसून येतील, एक चिद् व दुसरा जड.

चिद् म्हणजे ज्ञानरूप व जड म्हणजे ज्ञानशून्य. याशिवाय तिसरा पदार्थ दिसावयाचा नाही. आत्मा हा चिद् आहे आणि शरीर मात्र जड आहे. मग ते कोणाचे का असेना ! शरीर जड कशावरून ? तर मनुष्य झोपेत असतो, त्या वेळेस त्याला कोणाचा काय व्यवहार चालला आहे याची खबर नसते. लोकांची गोष्ट सोडा. पण स्वतःच तो वेडावाकडा, कसा तरी पडतो. कमरेचे धोतर सुटले तरी त्याला खबर नसते. मग प्रेत शरीराची तर गोष्टच सांगावयास नको. मेलेल्या मनुष्याची नातलग मंडळी त्याच्या भोवती गाणी का गातात ? नाही, रडतात. आई किती तरी रडते, पण त्याला आहे का खबर. म्हणून आत्मा चिद् आहे व शरीर मात्र जड आहे. अथवा संसार म्हणून ज्याला म्हणतात– तो आत्म्याच्या आश्रयाने असला पाहिजे किंवा देहाच्या आश्रयाने तरी असला पाहिजे. ते आता आपण पाहू.

संसार हा कल्पित होण्यास्तव निराधार राहाणे शक्य नाही. ज्या-प्रमाणे दोरीवर भासमान होणारा सर्प कल्पित असल्यामुळे रज्जूला सोडून राहणे शक्य नाही, त्याप्रमाणे कल्पित संसार निराधार रहाणे शक्य नाही. मग हा देहाच्या आश्रयाने का आत्म्याच्या आश्रयाने आहे ?

जडाची व्याख्या– वेदान्त शास्त्रदृष्ट्या– जे आपण आपल्याला जाणत नसून अन्याला जाणत नाही त्याला जड म्हणतात. कोणी म्हणेल शरीर हालते, चालते; मग ते जड कसे म्हणावे ? त्याचे उत्तर असे की शरीराची जी हालचाल होते, ती सर्व चैतन्याच्या सत्तेने होते.

चालें हें शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवितें हरीविण ॥ तु. ३३३९

आतां असंगा साक्षिभूता । देहीं चैतन्याची जे सत्ता ॥
तिये नाम पांडुसुता । चेतना येथें ॥ ज्ञा. १३।१३४

येथे देहेंद्रिये प्राण । हे जडमूढ अचेतन ।
त्यांसी चेतवि आत्मा चिद्घन । तेंहीं उपलक्षण अवधारीं ॥ भा. २८।५४८

चैतन्याची सत्ता शरीरात आहे. म्हणून पाठीवर मुंगी चढली तरी कळते. चैतन्याची सत्ता निघून गेली की शरीर प्रेत होऊन पडते. म्हणून शरीर जड आहे. झोपेत कोणी जवळ असला तरी खबर नसते व उठल्यावर विचारतो की– तुम्ही केव्हा आलात ?

पैं निद्रिताचेनि आंगेंशी । साप तैशी उर्वशी ।
तेवीं स्वरूपस्था सरिसी । देही द्वंद्वें ॥ ज्ञा. १४।३५६

आता संसार कोणाच्या आश्रयाने आहे ते पाहू. या संसारासंबंधाने उद्धवाने स्वतः भगवंताला प्रश्न केला आहे. उद्धव देवास विचारतो की– हा संसार कोणाच्या आश्रयाने आहे ?

नैवात्मनो न देहस्य संततिर्द्रष्टृदृश्ययोः ।
अनात्मस्वदृशोरीश कस्य स्यादुपलभ्यते ॥ भा. २८।१०

आत्मा नित्यमुक्त चिद्घन । यासि न घडे भवबंधन ।
देह जड मूढ अज्ञान । त्यासि संसार जाण घडेना ॥ भा. २८।१२२

आत्मा नित्यमुक्त, प्रकाशमान होण्यास्तव, त्याला संसारबंध नाही व शरीर कल्पित, प्रकाशशून्य होण्यास्तव त्याच्याही आश्रयाने संसार राहू शकत नाही. कारण शरीरही कल्पित व संसारही कल्पित. एक कल्पित वस्तु दुसऱ्या कल्पित वस्तूचे अधिष्ठान होऊ शकत नाही. कारण जडाने जडाचे प्रकाशन कसे होईल ? रज्जूवर पुष्पमालेचा, जलधारेचा जो भास होतो, त्यास अधिष्ठान सत्य रज्जू आहे.

दोर दोरपणें साचार । भ्रमें भासे नानाकार ।
काष्ठ सर्प कीं मोत्याचा हार । ना हे जळधार जळाची ।।

भा. १९।२०२

यावरून शरीर काही संसाराला आश्रय होऊ शकत नाही.

एथ भवबंधन हृषीकेशी । सांग पां बाधक कोणासी ।
जरी तूं संसार नाहीं म्हणसी । तो प्रत्यक्ष जगासी जडलासे ।।

भा. २८।१२३

देवा, तू जर म्हणशील की– संसारच नाही, तर हे घडणारच नाही. कारण तो सर्व जीवांना प्रत्यक्ष जडला आहे. या संसारासंबंधाने पुष्कळांची ओरड आहे.

पुरे पुरे हा संसार । कर्म दळिवंत दुस्तर ।
राहों नेदी स्थिर । एके ठायीं निश्चळ ।। २ ।। तु. ५१८
करितां विचार । तो हा दृढसंसार ।
ब्रह्मांदिकां पार । नुलंघवे सामर्थ्ये ।। तु. १५४२

सत्संगतीने ज्यांना संसारदुःखाची जाणीव उत्पन्न झाली आहे ते म्हणतात–

संसारतापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ।। तु. १५०५
काय सांगों गर्भीची यातना । मज भोगितां नारायणा ।।
मांस मळमूत्र जाण । तुज क्षणक्षणा ध्यात असें ।। तु. ६१४

हे महाण्याचे उद्‌गार आहेत. नाही तर कालच्या कोडग्याला लाज नाही. या म्हणीप्रमाणे तुम्ही आम्ही संसाराच्या दुःखरूपतेस जाणत नाहीत. संतांना म्हणून जाणीव होते,

म्हणूनि तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥२॥ तु. १५०५

नहीं एक दो सब संसार । जो बुजे सो आगला स्वार ॥ तु. ४४०

जन तरी देखें गुंतले प्रपंचें । स्मरण तें त्यांचें त्यांसी नाहीं ॥ तु. ८३०

सर्व जग या संसारात गुरफटलेले आहे. त्यांना दुंगण खाजवण्यास वेळ नाही. कित्येक म्हणतात, बुवा ! तुम्ही बरे मोकळे. आम्ही किती या प्रपंचात अडकलो. तुम्ही आम्हाला पंढरीला चला म्हणतात व आम्हालाही जावेसे वाटते; पण काय करावे हो ! या संसारात बांधले गेलो. सबब नाही यावरून संसारच नाही असे म्हणता येणार नाही. उद्धव हा आपला प्रश्न विस्तृत मांडतो.

आत्माऽव्ययोऽगुणः शुद्धः स्वयंज्योतिरनावृतः ।

अग्निवद्दारुवदचिद्देहः कस्येह संसृतिः ॥ भा. २८।११

आत्मा चिद्रूप अविनाशी । गुण निर्गुण नातळे त्यासी ।

कर्माकर्म पापपुण्यांसी । ठाव त्यापाशीं असेना ॥ भा. २८।१२५

आत्मा चिद्रूप म्हणजे ज्ञानरूप आहे. काही शास्त्रकार ज्ञान हा आत्म्याचा गुण मानतात; पण ज्ञान आत्म्याचा गुण नसून ज्ञान हे आत्म्याचे स्वरूप आहे. नैय्यायिकांच्या मताप्रमाणे ज्ञान आत्म्याचा गुण मानला तर ते श्रुतिसमत नाही व युक्तीला जुळत नाही. कारणे श्रुती परमात्म्याचे असे वर्णन करते की–

" सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ॥ " तसेच युक्तीला जुळत नाही; कारण गुण हा नेहमी आगमापायी असतो. म्हणजे येणारा जाणारा असतो. गुण हा गुणीच्या ठिकाणी. कधी असतो व कधी नसतो. गुणाला धारण करणारा त्याचे नाव गुणी. पांढऱ्या वस्त्राला गुलाबी रंग दिला की पांढरे वस्त्र गुणी व गुलाबी रंग हा गुण पांढऱ्या वस्त्राच्या ठिकाणी पूर्वी गुलाबी रंग नव्हता नंतर हा आला म्हणून गुणाला आगमापायी म्हटले जाते. तसेच नैय्यायिकांच्या

मताप्रमाणे ज्ञान गुण कधी आत्म्याच्या ठिकाणी असेल कधी नसेल असा ज्ञानरहित प्रकाशशून्य आत्मा जड होईल व जड जगताचे प्रकाशन जड आत्मा कसे करील ? कारण जडाने जडाचे प्रकाशन होत नाही; म्हणून आत्मा चिद्रूप अविनाशी आहे. आत्म्याला नाश नाही, उत्पत्ती नाही जे जन्मलेच नाही त्याचे बारसे कसे होणार ? व ज्याचे बारसे झाले नाही त्याचा बारावा कोण करणार ? ज्याचे बारसे झाले त्याचा बारावा होईल. बारशाला थाटमाट वाजंत्री असतात. तरुण मनुष्य मेला तर माणसे रडतात व एखादा ८०–९० वर्षांचा म्हातारा मेला– ज्याचे डोळे गेलेत, कान बधिर झालेत, केसाच्या अंबाडया झाल्यात तोंडाचे बोळके, ढुंगणाचे मगुक, सर्व अंगाला सुरकुत्या पडल्यात अशासाठी कोणी रडत नाही. म्हणतात बरे झाले पिकले पान गळून पडले. त्याचे सोने झाले. असे म्हणतात.

उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दिसे ।
हें घटिका यंत्र तैसें । परि भ्रमेंगा ।। ज्ञा. २।१५९
न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ।। गी.२।२०

'आत्मा न जायते' म्हणून 'न म्रियते !' आत्म्याच्या ठिकाणी सत्त्वादी तिन्ही गुण जसे नाहीत तसा निर्गुणही नाही.

जेथें नाही गुणागुण । नाहीं कार्यासी कारण ।
तो तूं गुणीं गुणातीत । परिपूर्ण रे ।।०।।
कान्हू सच्चिदानंदु शब्द अरुतारे ।
त्याही परता तूं निजानंदु रे ।।२।। एक अ. २३७६

सत्त्व, रज, तम, असे तीन गुण आहेत. हे तिन्हीही आत्म्याचे ठिकाणी नाहीत, आत्मा गुणाच्या पलीकडे आहे.

बाप रखुमादेविवरु त्रिगुणां वेगळा । शक्ति नोहे दादुला गे माये ।।
ज्ञा. ४५

गुण हे आत्मसत्तेवर भासतात पण गुणाचा आत्म्याचा संबंध नाही. सत्त्वादी तीन गुणांत आत्मा आहे. कारण ती व्यापक आहे म्हणून. पण आत्म-रूपी गुण नाहीत.

पैं गुळाची गोडी । नोहे बांधया सांगडी ।
तैसीं गुण इंद्रिये फुडीं । नाहीं तेथ ।। १३।१००

गुळांत गोडीचा अन्वय व गोडीत गुळाचा व्यतिरेक आहे, त्याप्रमाणे गुण व इंद्रियांत आत्मा आहे. पण परमात्मस्वरूपी गुण इंद्रिये नाहीत.

अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारें असे ।
परि क्षीरचि नोहे जैसें । कपिध्वजा ।। ज्ञा. १३।१०१

दुधाच्या आकाराने तूप आहे. पण दूधच तूप नाही. जर दूधच तूप असते, तर वेगळे निघाले नसते.

इया उघड मऱ्हाटिया । तें वेगळेपण धनंजया ।
जाण गुण इंद्रिया । पासोनियां ।। ज्ञा. १३।१०३

तसेच आत्मा कोणाचे काही नाही. आत्मा जर प्रकृती नाही, तर विकृती कसा होईल ? आत्मा सद्, चिद्, आनंदाच्याही पलीकडचा आहे. सद्, चिद्, आनंद देखील मायिकच आहेत. असत्, जड, दुःख यांच्या निरासासाठी श्रुतीने आत्म्याला सच्चिदानंद म्हटले आहे.

तैसें असदाचिया व्यावृत्ती । सत म्हणू आले श्रुती ।
जडाचिया समाप्ती । चिद्रूप ऐसें ।। अनु. ५।१०

दुःखाचेनि सर्वनाशें । उरलें तें सुख ऐसें ।
निगदिलें निश्वासें । प्रभूचेनी ।। अनु. ५।११

बायकोच्या सापेक्ष नवरा ही कल्पना येते ज्याला बायकोच नाही तो नवरा कोणाचा ? बायको मेली म्हणजे एकटी मरत नाही, किंतु नवरेपणाच्या कल्पनेला घेऊन जाते. बायको मेल्यावर हा नवरा कुणाचा ! याचप्रमाणे अनुभवामृतात—

म्हणोनि सच्चित्सुख । हे बोल वस्तुवाचक ।
नव्हती हें शेष । विचाराचें ।। अनु. ५।१९

कर्माकर्म पापपुण्यांसी । ठाव त्या पाशीं असेना ।। भा. २८।१२५
ब्रह्म न लिंपे त्या मेळें । कर्मा अकर्मा वेगळें ।। तु. ३७५५
तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणीचि क्रिया ।
म्हणौनि प्रवादु तया । नैष्कर्म्यु ऐसा ।। ज्ञा. १८।९७८

क्रिया ही एकदेशी परिच्छिन्न वस्तूच्या ठिकाणी उत्पन्न होते. आत्मा व्यापक होण्यास्तव त्याच्या ठिकाणी कोणत्याच प्रकारची क्रिया उत्पन्न होत नाही.

पापपुण्यां नाहीं ठाव । तुका म्हणे सहज भाव ।। तु. ३७५५
आत्मा पापें पावे अधोगती । कां पुण्यें पावे उत्तमप्राप्ती ।
हे मूर्खांची मूर्ख वदंती । जे कर्म भ्रांती अतिभ्रांता ।। हस्ता. ४७६

आकाराच्या सापेक्ष निराकार, गुणाच्या सापेक्ष निर्गुण आहे. आत्म्याला स्वरूपदृष्टया निर्गुण म्हटले नाही. तिन्ही गुण कल्पित होण्यास्तव (त्यांची उत्पत्ती होण्यास्तव) त्यांच्या निरासा अंती आत्म्याला निर्गुण म्हटले आहे. गुणाचा जन्म प्रकृतीपासून झाला आहे.

सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः । गी. १४।५
तरी सत्त्व रज तम । तिघांसि हें नाम ।
आणि प्रकृति जन्म । भूमिका यथां ।। ज्ञा. १४।१३८

जनात गुण कल्पना नसती तर आत्म्याला निर्गुण म्हटले नसते.

परादिवाचा नव्हे उच्चार । यालागी म्हणजे परात्पर ।
प्रकृति गुणीं अनिवार । प्रकृतिपर परमात्मा ।। भा. २८।१२६

या चारी वाचांपैकीं एकाही वाचेने परमात्मा अमुक एक प्रकारचा आहे, असे समर्थन करता येत नाही.

शब्देवीण संवादु दुजेवीण अनुवादु । हे तव कैसेंनि गमे ।
परेहि परते बोलणें खुंटलें । वैखरी कैसेंनि सांगे ।। ३ ।। ज्ञा. अ. ७

संवाद करायचा म्हणजे शब्द पाहिजे. नाही तर मग कोणी आणि कोणाशी कशी चर्चा करावी आणि आत्मा आहे शब्दातीत. आत्मस्वरूपी शब्दाचा प्रवेश होत नाही.

नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी ।
नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो ॥ तु. ३८७६
जें शब्दातीत स्वभावें । ज्ञा. ५।६८

परमात्म स्वरूपीं शब्द गेला की त्याला मूळव्याध फुटते.

निमाला शब्द खुंटला त्रिभुवनी आनंद झाला रे ।
एका जनार्दनीं शरण गेला तो एकपणा विसरला रे ॥ ए. अ. ३७२५
या शब्दाचा निमाला । महाप्रळयो सरला ।
अभ्रासवें गेला । दुर्दिन जैसा ॥ अनु. ६।१०३

अनुवाद करण्यास द्वैत लागते. आत्म्याच्या ठिकाणी द्वैत मुळातच नाही.

निरंजनीं एकटवाणें । संग नेणें दुसरा ॥ तु. ३९००
भूतीं भगवद्भाव । मात्रासहित जीव ।
अद्वैत तो ठाव । निरंजन एकला ॥ १ ॥ ३८४१

आत्मा भेदशून्य एक होण्यास्तव द्वैत शून्य आहे.

एकमेवाद्वितीयम् ब्रह्म नेह नानास्ति किंचन् ॥
मग अनुवाद कसा करायचा ? परा वाणीचा तेथे लाग लागत नाही.
आणि दुजया थांवो मोडें । जेथ परेशीं वैखरी बुडे ।
तो तू मा कोणें तोंडें । वानावासी ॥ ज्ञा. १४।१४

आत्मा हा स्वतःही बोलत नाही व त्याच्याकडे येणाऱ्यालाही बोलू देत नाहीं.

बोलेना बोलो देईना ।
तेथें पहाणें तें अवघें पारुषलें गे माये ॥ ज्ञा. अ. १८३

तो न कां बोलेना ! त्याला तोंड नाही. पण दुसऱ्याला तरी बोलू द्यावे की नाही ! पण कोणालाच बोलू देत नाही. आत्मा अशरीर होण्यास्तव त्याला स्थूल सूक्ष्म कारण शरीर नाही. मग वाचा कुठून असेल ? आत्म्या-संबंधाने जे जे बोलावे ते ते नाही. आणि जसा आहे तसे बोलता येत नाही.

जें जें बोलिजे तें तें नव्हे । होय तें तंव न बोलवे ।
साउलिवरी न मववे । मविते जैसें ॥ अनु. ५।२६

तुका म्हणे तूंचि ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा झाली नाहीं ।।
तु. ३५८७

जगामध्ये अशी वाचा निर्माण झाली नाही की– आत्म्याचे यथार्थ वर्णन करील.

कां मस्तकांत निर्धारिली । जो छाया उडों पाहे आपुली ।
तयाची फाकावली । बुद्धि जैसी ।। अमृ. ७।११७

तुमची आमची गोष्ट सोडा, पण वेदालादेखील परमात्म्यासंबंधाने बोलता आले नाही.

वेदु काय काय न बोले । परी येथे नांवचि नाहीं घेतलें ।
ऐसें कांहीं जोडलें । नाहीं जेणें ।। अनु. ७।१०७

जीव, शिव, ब्रह्म, मायादी सर्व भूतभौतिक प्रपंचाचा विचार वेदाने सांगितला आहे. जगात असे काही नाही की जे वेदाने सांगितले नाही; पण आत्म्यासंबंधाने वेद काही बोलला नाही. श्रुतीने भूतभौतिक सर्व प्रपंचाचे वर्णन केले, पण आत्म्याचे नाव घेतले नाही. कारण आत्मा तिचा पती होण्यास्तव ती लाजली. मुलगी सर्वांचे नाव घेते; पण नवऱ्याचे नाव घे म्हटले की लाजतेन, " इश्श मेलं " म्हणते व मुरका मारते.

स्त्रीपुरुषें अबोला चालती । तो अबोला कीं अतिप्रीती ।। भा. ११।३३१

लग्न होण्याच्या अगोदर उखाणे वगैरे पाठ करते. श्रुतीने आत्म्याचे नाव घेतले नाही. कारण त्याला नावच नाही. यावरून श्रुतीला आत्म्यासंबंधाने काहीच समजले नाही; असे मात्र नाही. श्रुतीला समजले पण तिने शब्दावाचून (न बोलून) आत्म्याचे वर्णन केले.

जैसें न सांगणेवरी । बाळा पतीसी रूप करी ।
बोलु निमालेपणें विवरी । अचर्चितें ।। ज्ञा. १५।४६८

याप्रमाणे श्रुतीचा शब्द खुंटतो, तोच आत्मा असे जर आहे; मग वाचा आत्म्यासंबंधाने काय बोलेल ?

तेवि जेणें तेजे । वाचेसी वाच्य सुजे ।
ते वाचा प्रकाशिजे । हे कें आहे ।। अनु. ५।१५

आत्म्याच्या प्रकाशाने सर्व जग प्रकाशित झाले आहे.

जयाच्या स्वप्रकाशदीप्तीं । रवि चंद्रादि प्रकाशती ।
प्रकाशें प्रकाश त्रिजगती । तेजोमूर्ती परमात्मा ।। भा. २८।१२७

जयाचेनि आंगिकें तेजें । आवो रविशशीचिये वणिजे ।
म्हणऊनि जग हें वेसजे- । वीण असे तया ।। ज्ञा. ६।११०

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् । गी. १५।१२

सर्व जगाचे प्रकाशन करणारे चंद्रसूर्य ते आत्म्याचा प्रकाश घेऊन प्रकाशमान झालेले आहेत. जगात जेवढे तेजमान पदार्थ आहेत ते सर्व पदार्थ आत्म्याच्या तेजाने तेजमान झालेले आहेत.

तरी सूर्यासकट आघवी । हे विश्वरचना जे दावी ।
ते दीप्ति माझी जाणावी । आद्यंतीं आहे ।। ज्ञा. १५।३९८

सूर्यासह वर्तमान अखिल विश्वाचे प्रकाशन करणारे जे तेज ते आत्म्याचे आहे. चंद्रसूर्य हे आत्म्याचे तेज घेऊन जगाचे प्रकाशन करतात. ज्याप्रमाणे खेड्यातील वाणी पेठेतून माल खरेदी करतो व सर्व लोकांना पुरवितो, त्याचप्रमाणे चंद्रसूर्याच्या व्यापाराला एवढी जी महती आली ती केवळ आत्मवस्तूच्या तेजामुळे. चंद्रसूर्य त्याच्या प्रकाशाने प्रकाशमान झाले. मग जग काय त्याच्या प्रकाशावाचून आहे. एवंगुण विशिष्ट जो आत्मा तो व्यापक होण्यास्तव-

देशकाळ वस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ।। ४ ।।
तु. ४०३९

असा ज्ञानस्वरूप, प्रकाशरूप आत्मा आहे.

ऐशिया आत्म्याच्या ठायीं । भवबंध नलगे कांहीं ।
सूर्य बुडे मृगजळाच्या डोहीं । तै आत्म्यासि पाही भव बंध ।।
भा. २८।१२८

मृगजळ दिसें साचपण ऐसें । खोटियाचें पिसें ऊर फोडी ।।१।। तु.२००१

मृगजळाचीं गा तळी । तिये दिठी दुरुनिचि न्याहाळी ।
वांचूनि तेणें पाणिये साळी केळी । लाविसी काई ॥ ज्ञा. १५।२२२
खद्योततेजे सूर्य जळे । बागुला भेणें काळ पळे ।
मुंगीचेनि पांखवळें । जैं उडे सगळें आकाश ॥ भा. २८।१२९
खद्योतें फुलविलें रविपुढे ढुंग । साक्षी तंव जग उभयता ॥ तु. ३०६७
अवधारा आवडे तेसणा धुंधुरु । परि महातेजीं न, मिरवे काय करुं
ज्ञा. ९।९८

बागुला भेणें काळ पळे ॥

लहान मुलाने रडू नये, गप्प बसावे म्हणून आई त्या मुलाला बागुलबुवाची भीती दाखविते व ते मूल भिते तसा काळ भितो काय ?

मुंगीनेनि पांखवळें । जैं उडे सगळें आकाश ॥ भा. २८।१२९

आईने मुलाला विचारले, आई हें आकाश इतके उंच का ? आई म्हणाली, काळ पूर्वी आकाश फार खाली होतें. आंगण झाडताना माझ्या पाठीला खरडले. मग मला आला राग; मी खराटा उचलला आणि आकाशाला मारला; मग आकाश भुर्रकन् वर उडाले. याच कल्पनेप्रमाणे मुंगीच्या पंखाने आकाश उडणे शक्य आहे काय ?

यावरून असें सिद्ध झाले आहे की– संसार हा आत्म्याच्या आश्रयाने असू शकत नाही. आता देहाच्या आश्रयाने आहे का ते पाहू. देह जड आहे व मग संसारही जड आहे. मग जडाने जडाचे प्रकाशन कसे होईल ? हीच गोष्ट दृष्टान्ताने सांगतात. नाथ महाराजांनी चिदाला चिदाचेच दृष्टान्त दिले. व जडाला जडाचेच दृष्टान्त दिले.

जैं दगडाचें पोट दुखे । कोरडे काष्ठ चरफडी भुकें ।
तैं देहाकडे यथासुखें । भवबंध हरिखें लागत ॥ भा. २८।१३२
जैं डोंगरासी तरळ भरे । मृत्तिका नाहाणालागीं झुरे ।
कोळसेनि काळें होय आंधारें । तैं भवबंध भारें देह दाटे ॥
भा. २८।१६३

अशा गोष्टी होतील तर जडाच्या आश्रयाने संसार राहू शकेल. आता-पर्यंत विचार करण्यास संसार हा देहाच्या किंवा आत्म्याच्या आश्रयाने राहू शकत नाही व जगात या दोवांशिवाय तिसरा पदार्थ नाही. उद्धवाच्या प्रश्नाचा विचार करण्यात संसाराचा असंभव सिद्ध झाला आणि ही गोष्ट खरी आहे. प्रपंच म्हणून मुळात काही नाही.

प्रपंच एक झाला होता । हे समूळ मिथ्या वार्ता ।
पुढे होईल मागुता । हें कदा कल्पांती घडेना ।। भा. २४।५१

तात्पर्य संसार म्हणून काही नाही आणि तुकाराम महाराज तर म्हणतात " जिकावा संसार । येणें नांवें तरी शूर ।।१।। महाराज म्हणतात संसाराला जिंकील तोच शूराचा बच्चा आहे, तुकाराम महाराजांना उद्धवाच्या प्रश्नाचे रहस्य समजले नसेल म्हणून म्हणावे तर तु. म. या रहस्याला चांगले जाणत होते. ते म्हणतात-

न झाला प्रपंच आहे परब्रह्म । अहं सोहं ब्रह्म आकळले ।। ४०३६

वरवरच्या दृष्टीने महाराजांच्या बोलण्यात विरोध दिसला तरी तो विरोधाभास आहे. तुकाराम महाराज जे संसार जिंकण्यास सांगतात, ते असे आहे- अरे त्या वांझेच्या मुलाला मार, आकाशाचे फूल तोड, सशाचे शिंग तोड, हे खरे, पण वांझेला मूल असावे मग मारावे तसेच आकाशाला फूल, सशाला शिंग असावे मग तोडावे म्हणजे संसाराचा अत्यंत अभाव आहे, परमार्थ दृष्टीने संसार मुळीच नाही. पण तु. म. च्या तोंडून तशी व्यर्थ वाणी कधीच बाहेर पडणार नाही. तुकाराम महाराज ज्या अर्थी संसार जिंकण्यास सांगतात त्या अर्थी संसार असला पाहिजे, आणि पुष्कळसे शास्त्रकार संसाराचे वर्णन करतात. गीतेच्या पंधराव्या अध्यायात संसार-वृक्षाचे केवढे अवाढव्य वर्णन केले आहे. ते ऐकून कोण असा मायेचा पूत आहे की- त्याचे धाबे दणाणणार नाही ?

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ।। गी. १५।१

अर्जुना, हा संसारवृक्ष केवढा मोठा आहे म्हणून सांगू ! संसारवृक्ष वाढण्याची जमीन प्रथम सांगतात. कारण वृक्ष जमिनीवरच वाढतात

जिंकावा संसार

संसारवृक्ष वाढण्याची जमीन निर्विकल्प ब्रह्म आहे. तेथे संसारवृक्षाला अंकुर फुटला. संसारवृक्षाचे वरचे मूळ आहे माया.

नाहीं अज्ञानावांचूनि मूळ । ययाचें असिलेंपण टवाळ ।
ऐसें झाड सिनसाळ । देखिलें जेणें ॥ ज्ञा. १५।१४०

निर्विकल्प चैतन्याचे ठिकाणी सृष्टीच्या आरंभी 'एकोऽहं बहुस्याम्' असा संकल्प स्फुरला.

पैं निर्विकल्पाचिये वरडीं । फुटे आदि संकल्पाची विरूढी ।
आणि ते सवेंचि मोडोनि ये होंढी । ब्रह्मगोळकांच्या ॥ ज्ञा. ८।२२

मी संसारवृक्षाचे पहिले मूळ माया हे का म्हटले ? तर ... संसार-वृक्षाला अनेक मुळ्या आहेत. वरचे मूळ माया व खालचे मूळ मनुष्य शरीर. वरच्या (माया) मुळाच्या दृष्टीने मनुष्य शरीर संसारवृक्षाची जरी फांदी आहे; तरी मनुष्य शरीरापासून हा संसारवृक्ष खाली लोहलोष्ट पाषाणा-पर्यंत वाढत गेला आहे. म्हणून मनुष्यशरीर हे खालचे मूळ म्हटले आहे.

म्हणोनि जीं मनुष्य डाळें । तिये जाणावीं आधींचीं मूळें ।
जे एथूनि मग पघळे । संसारतरु ॥ ज्ञा. १५।१७५

मनुष्यशरीर हे संसारवृक्षाचे दुसरे मूळ आहे. मनुष्यशरीर मध्य शाखा जरी आहे, तरी पण संसारवृक्ष मनुष्य शरीरापासून खालीही वाढत गेला व वरही वाढत गेला आहे. मनुष्य पापकर्माचे आचरण करून लोहलोष्ट अशा नीच गतीला जातो.

तुका म्हणे घुबडा ऐसे जन्म सरिसें शुकराचे ॥ ४ ॥ तु. २४६८

म्हणून मनुष्यशरीर हे संसारवृक्षाचे दुसरे मूळ आहे.

म्हणोनि तनु मानुषा । इया ऊर्ध्व मूळींनि जरी शाखा ।
तरी कर्म वृद्धीसि देखा । इयाचि मूळें ॥ ज्ञा. १५।१७९

असा हा संसारवृक्ष. याला खाली फांद्या व वरही फांद्या आहेत. खाली मूळ व वरही मूळ आणि मध्येही आडवा- तिडवा फांकलेला आहे. याला उदाहरण वटवृक्षाचे.

प्रवळला चौमेरीं । पिंपळ कां वडाचिया परी ।
जे पारंबियां माझारीं । डहाळिया असती ।। ज्ञा. १५।५८

वटवृक्षाचा केवढा विस्तार असतो ! त्याला पुष्कळशी मुळे, पुष्कळ फांद्या, पारंब्या वगैरे असतात. संसारवृक्षात व वटवृक्षात एवढाच फरक आहे की– वटवृक्षाचे मूळ खाली आहे व संसारवृक्षाचे मूळ वर आहे. बाकीचा विस्तार सारखाच आहे.

अगा पैं पंडुकुमरा । येतां स्वरूपाचिया घरा ।
करीतसे आडवारा । विश्वाभासु जो ।। ज्ञा. १५।४६
तो हा जगडंबरु । नोहे येथ संसारु ।
हा जाणे महातरु । थांबला असे ।। १५।४७

जीव स्वकीय स्वरूपाकडे येत असताना अडथळा जर कोणी करीत असेल, तर हा संसारवृक्ष. यावरून संसारवृक्ष काही तरी असलाच पाहिजे. पुष्कळशा महात्म्यांनी या संसारवृक्षाचे वर्णन केले आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात–

संसारदुःख मूळ चहूंकडे इंगळ । विश्रांति नाहीं कोठें रात्रंदिवस तळमळ ।
काम क्रोध लोभ शुनी पाठीं लागलीं ओढाळ ।
कवणा शरण जाऊं आतां दृष्टि देईल निर्मळ ।। ज्ञा अ. ७४९
संसारसागर गा भवदुःखाचें मूळ । जनवाद अंथरून माजी केले इंगळ ।
इंद्रिये वज्रघातें तपे उष्ण वरी ज्वाळ । सोसिलें काय करूं दुर्धर हे चांडाळ ।। तु. ३५४

तुम्ही आम्ही पदोपदी संसाराचे दुःख भोगतो. परंतु ते सवयीने आमच्या पचनी पडल्यामुळे त्या दुःखाची जाणीव नाही.

दुःख शोकांच्या घाई । मारिलियाची सेचि नाही ।
हें सांगावया कारण काई । जे ग्रासिले माया ।। ज्ञा. ७।१०७

सर्वच संसाराचे दुःख भोगतात. एक क्षणाची विश्रांती नाही

क्षण एक तोही नाहीं विसावा । लक्ष चौऱ्याशीं घेतल्या धांवा ।
भोवंडिती पाठीं लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझ्या मीपणा ।।
तु. ७०७

भगवंताच्या व महात्म्यांच्या या उक्तीवरून संसार आहे, हे सिद्ध झाले. असे आहे म्हणून तु. म. संसार जिंकण्यास सांगतात. मग संसार आहे, तर तो कसा झाला ? तर ज्ञानरूप आत्मा व जडरूप देह या दोहोंच्या संबंधात संसार उत्पन्न झाला. सूर्याची प्रखर किरणे व माळजमीन या दोहोंच्या संबंधात मृगजळ दिसते.

कां तेजा आणि उखरा । भेटी जालिया वीरा ।
मृगजळांचिया पूरा । रूप होय ।। ज्ञा. १३।१०५२

यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।
क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ।। गी. १३।२६

मेघाचे पाणी व पृथ्वी यांच्या संबंधात तिसरे गवत उत्पन्न होते. केवळ मेघातही गवत नाही व पृथ्वीतही गवत नाही.

नाना धाराधरधारीं । झळंबलिया वसुंधरी ।
उठिजे जेवीं अंकुरीं । नानाविधीं ।। ज्ञा. १३।१०५३

अथवा पाण्यात तरंग नाही व वाऱ्याचा तरंग नाही. दोहोंच्या संबंधात तरंग उत्पन्न होतो,

नातरी सागरींचा पाणी । काय तरंगाचिया आहातीं खाणी ।
ते अवांतर करणी । वारयाची नव्हे ।। ज्ञा. ९।७५
तयां येरयेरांच्या मेळीं । होईजे भूतीं सकाळीं ।
अनिल संगें सलिलीं । कल्लोळ जैसे ।। ज्ञा. १३।१०५१

क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या संबंधात संसार उत्पन्न होतो. भगवान सांगतात क्षेत्र म्हणजे शरीर. क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा.

जे क्षेत्र क्षेत्रज्ञयोगें । होईजे येणें जगें ।
आत्मा गुण संगे । संसारिया ।। ज्ञा. १४।३३

क्षेत्र म्हणजे प्रकृती व क्षेत्रज्ञ म्हणजे पुरुष यांच्या संबंधात संसाराची उत्पत्ति व्हावयास लागते. पण शंका अशी येते की– आत्मा आणि देह यांचा संबंध होईल तरी कसा ? कारण परमार्थदृष्टया पाहिले तर आत्म्याचा व देहाचा संबंध होत नाही. आत्मा आहे सद्, चित्, आनंद आणि देह आहे असत्, जड, दु:खरूप. या दोहोंचा संबंध घडावा कसा ?

तया देहा म्हणती भेटी । हे सपायी निर्जिव गोठी ।
वारिया वाळुवे गांठी । कें ही आहे ॥ ज्ञा. १३।१०९७
कोणाचा कोणासी न धरे संबंध । आहे शुद्ध बुद्ध ठायींचे ठायीं ॥
तु. ३८३६

आत्म्याचा आणि देहाचा संबंध होणे म्हणजे कशासारखे आहे ? आत्मा अग्नीप्रमाणे आणि देह काष्ठाप्रमाणे; दोहोंचा संबंध होईल कसा ? आणि झाला तर अग्नीत काष्ठ शिल्लक राहील कसे ? देहाचा आणि आत्म्याचा संबंध होणे शक्य नाही हे आणि मग काय सांगतात की दोहोंच्या संबंधात संसार उत्पन्न होतो ?

परमार्थदृष्टया जरी आत्म्याचा आणि देहाचा संबंध होत नसेल तरी आत्मा ज्या वेळेला आपल्या व्यापक स्वरूपाला विसरतो, त्या वेळेस देहाशी संबंध करतो व देहाशी संबंध केल्यामुळे आपल्या व्यापक स्वरूपाला विसरतो.

आपला आपणपेयां । विसरू जो धनंजया ।
तेचि रूप यया । अज्ञानासी ॥ ज्ञा. १४।७१
तें अज्ञान एक रूढे । तेणें कोहं विकल्पाचें मांडें ।
जया विसराच्या देशीं । प्रसिद्धि गा जीवु ऐसी ।
जेणें भाप केली देहेंसी । आघवा विषयीं ॥ ज्ञा. १८।३२५

वस्तुत: देह ही आत्म्याहून भिन्न नाही. पण आत्मा व्यापक स्वरूपाला विसरल्यामुळे वस्तुमात्र भिन्न दिसतात. अर्थात देह हा भिन्न दिसतो, म्हणून देहाशी संबंध करतो. म्हणजेच संसाराची उत्पत्ति होते. म्हणजे उखळ, मुसळ, जाते, गाडगी, मडकी, सूप उत्पन्न होत नाहीत, तर आत्म्याने देहाशी संबंध केल्यावर जी काही "देहअहंता" उत्पन्न होते, त्या देहअहंतेला संसार म्हणतात. आता ज्ञानरूप आत्मा आपल्या व्यापक स्वरूपाला विसरतो कसा व का विसरतो हे पाहू.

कां जे योगमाया पडळें । हे जाले आहाती आंधळे ।
म्हणोनि प्रकाशाचेनि देहवळें । न देखती मातें ॥ ज्ञा. ७।१५८
माययापहृतज्ञाना ॥ गी. ७।१५
त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।
मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ गी. ७।१३

आपल्या व्यापक स्वरूपाच्या ज्ञानावर मायेने आवरण घातल्यामुळे आपण आपल्या स्वरूपाला जाणत नाही म्हणजेच विसरतो. तु. म. नी देहाभिमानाला संसार म्हटले आहे. तात्विक दृष्टीने शरीर तरी आत्म्याहून वेगळे आहे कोठे ?

पांच भौतिक देहाचा गोळा भ्रांत म्हणती मज वेगळा ।
चुकोनि व्यापका सकळा । तो कोठें निराळा हों पाहे ॥ भा. १३।३५०

शरीर हे व्यापक आत्म्याहून वेगळे आहे असे मूर्ख समजतात. ज्या आपल्या व्यापक स्वरूपाला जाणले नाही, त्यांना भ्रांती आहे. वास्तविक व्यापक आत्म्याहून शरीर भिन्न नाही. आत्मा आपल्या व्याप्तीला विसरला म्हणजे देहाला भिन्न समजतो.

जैसें स्वप्नीं परिव्राजे । आपणपयां आपण कुटुंब होईजे ।
मग तयाचेनि धांविजे । मोहें सैरा ॥ ज्ञा. १५।३५३

कोणी एकाने ब्रह्मचर्यआश्रमातून एकदम संन्यास घेतला. तो एका मंदिरात थांबला होता. लग्नसराईचे दिवस असल्यामुळे लग्नाचे, वरातीचे सोहळे त्यास पाहावयास मिळाले. त्याला रात्री झोपेत स्वतःचे लग्न झाल्याचे स्वप्न पडले. लग्नानंतर काही दिवसांनी त्याचे कुटुंब आजारी पडले व तो स्वप्नात वैद्याला आणण्याकरिता धावत पळत सुटला. वास्तविक तो संन्यासी एकाकी असताना स्वप्नभ्रमामुळे आपण एक व वायको एक असे भिन्न समजू लागला. आणि वायको आजारी पडली म्हणून खिन्न चेहरा करून बसतो. एखाद्याने त्याला स्वप्नातच विचारले तर सागतो, घरात कुटुंबाची प्रकृती बरी नाही. तिच्या मोहाने वैद्याकडे जातो, औषध पाणी देतो.

तैसा आपलिया विस्मृती । आत्मा आपणचि प्रकृती– ।
सारिखा गमोनि पुढती । तियेसीचि भजे ॥ ज्ञा. १४।३५४

परमार्थदृष्टीने शरीर जरी आत्म्याहून भिन्न नाही तरी पण ज्या वेळेस आत्मा आपल्या व्यापक स्वरूपाला विसरतो, त्या वेळेला शरीराला आपल्याहून भिन्न समजतो. आणि देहच मी असा अभिमान घेतो व त्यामुळे देहाचे सर्व धर्म आपल्या ठिकाणी पाहू लागतो. जसे शरीर असेल तसे आपल्याला मानू लागतो.

अहमिति प्रथम अध्यासें । जीवासी जीवत्व आभासे ।
तो जे जे तत्त्वीं प्रवेशे । तें गो ऐसें म्हणतची ॥ भा. १२।३१०

मी कृश स्थूळ गौरश्याम । हे देहाचे देहधर्म ।
मी काणा मुका बहिरा परम । हे इंद्रियधर्म इंद्रियांचे ॥ भा. २८।१५०

हे अवघे माझे धर्म । ऐसा आत्म्यासि जंव दृढ भ्रम ।
तंव मिथ्याचि अतिदुर्गम । संसार विषम भ्रमे भोगी ॥ भा. २८।१५६

प्रत्येक इंद्रियासी संबंध करतो व त्या त्या इंद्रियांचे गुणधर्म आपल्या माथी मारून घेतो.

आतापर्यंत सांगितल्यावरून संसार म्हणजे देह अहंकार, घर-दार पैसा, शेती हा जो संसार, याला वाढण्याला देखील कारण देहाभिमानच.

माड्या गोपुरें धवळारा । धनधान्य नाना अंबरा ।
तें प्रवाल धनपुत्रदारा । हा समुदावो खरा परिग्रहो ॥ भा. ९।५०

या समस्त परिग्रहाचें मूळ । देहबुद्धि या केवळ ।
तेही अभिमानें सबळ । एवं सर्वांसी मूळ अभिमानू ॥ भा. ९।५१

दुसरी गोष्ट शोक, हर्ष, लोभ, भय, जन्म, मरण हे जे अनादिकाला-पासून जीवाच्या पाठीमागे लागले आहेत, ते केवळ देहाहंकारामुळेच.

देहासी येतां मरण । मेलो म्हणे तो आपण ।
देहासी जन्म होता जाण । जन्मले पण स्वयें मानीं ॥ भा. २८।१५३

जेथे जेथे देहाचा अभिमान तेथे तेथे या वरील गुणांची प्रतीती येते. जेथे अभिमान नाही, तेथे या गुणांची प्रतीती नाही. जागृत व स्वप्न या दोन अवस्थांमध्ये देहाचा अभिमान असतो जागृतीत स्थूल देहाचा आणि स्वप्नात

लिंगदेहाचा; म्हणून तेथे या हर्षशोकाची प्रतीती येते. सुषुप्तीत देहाभिमान लीन असतो म्हणून हर्षशोकादी गुणाची प्रतीती येत नाही. मनुष्य आपला मृत्यू आपल्या स्वप्नात पाहतो.

जागृति आणि देखिजे स्वप्न । तेथ वसे देहाभिमान ।
ते ठायीं हे दिसती गुण । सुषुप्तीसी जाण गुण नाहीं ।। भा. २८।१८७
जेथ वृत्ति निरभिमान । तेथ जन्ममरणादि हे गुण ।
सर्वथा नुठती जाण । गुणासि कारण अभिमान ।। भा. २८।१८८

या शोक-भयादी सर्व गुणांना कारण केवळ देहाभिमान आहे. आत्म्याचे ठिकाणी हे काही नाही. संसार देहाभिमानाच्या ठिकाणी आहे. प्रचंड वारा सुटल्यावर त्याचा संबंध जळाशीही होतो व स्थळाशीही होतो.

जळीं स्थळीं वायु झगटी । जळीं तरंग स्थळीं नुठी ।
तैं तरंगता जळाचे पोटीं । तेवीं शोकादि गुण कोटी अहंतेमाजी ।।
भा. २८।१८९

तरंग पाण्यावरच उत्पन्न होतात. याप्रमाणे संसार देहाभिमानाच्या ठिकाणीच आहे. आत्म्याच्या ठिकाणी नाही.

**शंका** – आत्म्याच्या ठिकाणी संसारबंध नाही. देहाभिमानाच्या ठिकाणी संसारबंध आहे. ज्याच्या ठिकाणी बंध तोच मुक्त होणार ! जीवाला काय मुक्त व्हायचें ?

**समाधान** – जरी संसारबंध देहाभिमानाच्या ठिकाणी आहे, तरी जीवच मुक्त होणार.

बद्धता झाली अहंकारासी । म्हणसी मुक्ति व्हावी त्यासी ।
ते अहंता लागली जीवासि । तेंचि हृषिकेशी सांगत ।। भा. २८।१९०

ज्या अहंकाराच्या ठिकाणी संसारबंध आहे, तो अहंकार जीवाला चिकटलेला आहे. म्हणजे त्या देहाभिमानाची बद्धता जीवात्मा आपल्या ठिकाणी पाहू लागला. हीच गोष्ट नाथ महाराज दृष्टान्ताने सांगतात–

अंत्यजाचा विटाळ ज्यासी । गंगास्नानें शुद्धत्व त्यासी ।
तें गंगास्नान अंत्यजासी । शुद्धत्वासी अनुपयोगी ।। भा. २८।१९१

तेवीं अहंता जडली जीवासी । ते त्यागितां मुक्तत्व त्यासी ।
परी मुक्तत्व अहंकारासी । कल्पांतेसी घडेना ।। भा. २८।१९२

हा विचारूनि अहंकारु सांडिजे । मग असतीच वस्तु होईजे ।
तरी आपली स्वस्ति सहजें । आपण केली ।। ज्ञा. ६।७१

आतापर्यंत जे सांगितले, त्यावरून लक्षात येईल की संसार म्हणजे देहाभिमान. जेवढा म्हणून संसार आहे, त्याला कारण देहाभिमान. अशा संसाराला जिंकावयाचे म्हणजे देहाभिमानाला जिंकावयाचे आणि देहाभिमानाला जिंकण्यात शौर्य आहे, पराक्रम आहे.

ऐक शौर्याचा विचार । मर्दूनि अरिवीर ।
जिंतिला शत्रूंचा संभार । तो येथे शूर मानेना ।। भा. १९।४५५

खोदु नावाचा हिजडा होता. पण त्याने पुरुषार्थबलाने देहाभिमानाला जिंकले म्हणून तो हिजडा शूर ठरला. अहंकाराला जिंकणे हे शूराचे लक्षण ठरले. त्याला जो जिंकतो तो शूर. विचारी जे पुरुष आहेत, ते संसाराला जिंकतात म्हणजे संसाराचा त्याग करतात. संसाराचा त्याग करतात म्हणजे बायकामुलांचा त्याग करून रानावनात फिरत नाहीत.

आतां गृहादिक आघवें । तें कांहीं न लगे त्यजावें ।
जे घेतें जाहलें स्वभावें । निसंगु म्हणऊनि ।। ज्ञा. ५।२२

तेवीं बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडूनि पाहीं ।
सांडिजे अशेषही । संसारजात ।। ज्ञा. १६।१३८

सत्संगतीने सच्छास्त्राचे श्रवण करून ज्याची बुद्धी विचारसंपन्न झाली आहे, ते विचाराने देहाभिमानाचा म्हणजे संसाराचा त्याग करतात. संपूर्ण संसाराला कारण देहाभिमान आहे. तु. म. म्हणतात, आम्ही देहाभिमानाचा त्याग केला.

कोणाहि नलगे साधनांचा पांग ।
करणें केला त्याग देहबुद्धि ।। तु. २१४९

आम्ही देहबुद्धीचा त्याग केला. म्हणून आता कोणतेही साधन करण्याचे काम राहिले नाही.

थोर ते गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ॥ तु. ३६३६
त्याग तरी ऐसा करा । अहंकारा दवडावें ॥ तु. ३३२७

उगीच त्याग म्हणून बायकामुलांवर हत्यार उपसू नये. बायकापोरे का चावतात ? मुलाबाळांचा त्याग कशाला करता ?

सर्व त्यागाचें त्यागिनेपण । उद्धवा तुज मी सांगेन खुण ।
सर्व सांडावा अभिमान । हें मुख्य लक्षण त्यागाचें ॥ भा. १२।२४०

विचाराने एका देहाभिमानाचा त्याग झाला की– सर्व देहादी प्रपंचाचा त्याग होतो आणि देहाभिमानाचा त्याग न करता सर्व जरी टाकले तरी काही एक टाकले नाही. त्यागाचे मर्म माहीत नाही, असा कोणी एक मूर्ख त्यागी घरादाराचा त्याग करून व हातात चिमटा घेऊन हिंडत होता. अशाच्या ठिकाणी भयंकर अभिमान असतो. ज्ञानेश्वर महाराजांनी अशा माणसाला पाहिले व विचारले की– तू असा वनात का फिरतोस ? तो त्यागी म्हणाला– मी घरादाराचा त्याग केला आहे. म्हणून ज्ञा. म. सांगतात–

घरदार वोखटें त्यजूं म्हणसी तरी शरीरयेवढें जाड ।
मायबाप वोखटीं त्यजूं म्हणसी तरी अहंकार अविद्येचे कोड ।
बंधु सखे त्यजुं म्हणसी तरी काम क्रोध मद मत्सर अवघड ।
बहिणी पाठीच्या त्यजूं म्हणसी आशा तृष्णा मायाचे वंड रया ॥ ० ॥
त्यजिलें तें काय कासया म्हणिजे सांग पां मजपाशीं ऐसें ।
जया भेण तू जासी वनांतरा तें तंव तुजचि सरिसें रया ॥धृ.॥ ज्ञा.४९०

ज्या खऱ्या घराचा त्याग करावयाचा ते घर तर उरावर घेतले.

हें चोविसांही तत्त्वांचें । कुटुंब घर वस्तीचें ।
तुटे बंध मोक्षाचें गुंथाडे येथ ॥ ज्ञा. १८।३१९

आपल्या आई–वडिलांचा त्याग केला. अहंकार व अविद्या हे आईबाप तुझ्या उरावर बसले आहेत. मूर्खा, काही टाकले नाहीस. ज्या परिग्रहाच्या भीतीने तू वनात आलास तो परिग्रह तुझ्याबरोबरच आहे. मग डोंगर काय करील !

काय दरा करील वन ! समाधान नाहीं जंव ॥ तु. २११८

जे टाकावयास पाहिजे ते टाकले नाहीस. ते तर तुझ्याजवळच आहे. मूर्ख, त्यागी, जे टाकावयाचे ते नेमके जवळ ठेवतात.

थोर ते गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ॥ ३६३६

संसाराला कसे जिकावयाचे ते आता सांगतो. देहाभिमानाला जिकण्या-करिता जी जी म्हणून साधने करावीत, त्या योगाने देहाभिमान तर जात नाही.

जें जें करावें साधन । साधनीं रिघे साधनाभिमान ।
धांवणें नागवी संपूर्ण । साधनीं विघ्न होय तैसें ॥ भा. १३।४४०

तीर्थाटणें एकें तपें हुंबरती । नाथिले धरिती अभिमान ॥ तु. २२१७
तप करूनि तीर्थाटन । वाढविला अभिमान ॥ तु. २९२२

तात्पर्य, ही साधने देहाभिमानाच्या विरोधी नाहीत.

आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । योगी करती रागें गुरगुर ॥ तु.१५५०

परमात्मप्राप्तीस अष्टांग योगाची जोड पाहिजे. पण कोणी थोडे योगाचे आचरण केले, म्हणजे अभिमानाने म्हणतात, " भजन, पूजन, कीर्तन, श्रवण काय करावयाचे ? देहाभिमान जाण्याकरता ज्ञानाभ्यास करावा." यांच्यामुळे,

आणि येणेंही न सरे । लांकण लागे दुसरें ।
जें विद्वत्तेचें भरे । भूत आंगीं ॥ ज्ञा. १४।१५२

ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठीं लागे ॥ तु. १५५०
विद्या अल्प परी गर्व । शिरोमणि । मजहुनी ज्ञानी कोण आहे ॥
तु. ३०४९

जैसें विंचवा विष थोडें । परी प्रबळ वेदनेसि चढे ।
तेवीं विद्या थोडी परी गाढे । गर्वाचें फुडे अति भरितें ॥ भा. ५।१५६

ज्ञानी पुरुष हजारो माणसांत ब्रह्माचे अस्खलित व्याख्यान करतात. पण त्याच्या पाठी अहंभाव लागतो.

नवल अहंकाराची गोठी । विशेषें नलगे अज्ञाना पाठीं ।
सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटी नाचवी ॥ ज्ञा. १३।८२

'घरचे झाले थोडे आणि व्याह्याने धाडले घोडे' अथवा 'दुष्काळात तेरावा महिना' अशा म्हणी आहेत. सारांश, अभिमानामुळे जीवाचा सर्वस्वी घात झाला. जीवाचे स्वयंसिद्ध सुख आहे, पण जीव त्याला पारखा झाला.

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।
विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ।। गी. १८।५३

जो नं मोकली मारुनी । जीवो नेदी उपजवोनी ।
विचंबवी खोडां घालूनी । हाडांचिया ।। ज्ञा. १८।१०५१

याचे रहस्य असे आहे की– जन्मक्षयातीत जो जीवात्मा त्याच्या मागे जन्ममरणाची परंपरा अभिमानामुळेच लागली.

किती वेळां जन्मा यावें । किती व्हावें फजीत ।। तु. २००६

पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीं जठरे शयनम् ।
इह संसारे भवदुस्तारे कृपयाऽपारे पाहि मुरारे ।। ८ ।।

देहातीत जो जीवात्मा त्याला हाडाच्या खोड्यात या देहाभिमानानेच घातले.

जीव ज्ञानस्वरूप चोखडा । तो करूनि जडमूढ वेढा ।
दृढ घाली हाडांचे खोडां । तो हा धडफुडा अहंकार ।। भा. २४।१२१

म्हणून या देहाभिमानाचा नाश केला पाहिजे म्हणजे त्याला जिंकले पाहिजे.

पण त्याला जिंकावयाचे ते कसे ? देहाभिमान फार अजिंक्य आहे कोणत्याच साधनाने जिंकला जात नाही. हा अजिंक्य होण्याचे कारण, हा किल्ल्याचे आश्रयाने राहतो. म्हणून किल्ल्याचे आत दडून बाहेर साधकावर मारा करतो. म्हणून साधकाचे त्याच्यापुढे काही चालत नाही. तो अभिमान जो मारा करतो, तो साधकाला लागतो. साधक जो मारा करतो, तो अहंकाराला मुळीच लागत नाही, कारण तो किल्ल्याचे आत आहे.

हा किल्ला कोणाचा, त्याला तेथे कोणी ठेवले याचा विचार होणे जरूर आहे. येथे शरीराचा आकार हाच आहे किल्ला. हा किल्ला ( शरीर ) प्रकृतीचा आहे.

येथे मुख्यत्वें जो देहाकार । तेंचि प्रकृतीचे दुर्ग थोर ।
तेथे ठेविला ठाणेंधर । देह-अहंकार महायोद्धा ।। भा. २२।२८३

ती प्रकृती अहंकाराची मालकीण आहे. तिने हा देहरूपी किल्ला कोणी सर करू नये म्हणून विश्वासू अशा अहंकाराला किल्ल्यावर राखण ठेवले आहे काही सरदार लाचलुचपत खाणारे असतात. असा हा अहंकार नाही.

तोचि जीवलग विश्वासाचा । प्रकृतीसी विश्वास त्याचा ।
तो नेटका झुंझार दुर्गाचा । भर भारु तेथींचा तो वा ।। भा. २२।२८४

हा अहंकार मुळातच किल्ला कोणाला सर करू देत नाही.

ऐक उद्धवा पुरुषश्रेष्ठा । निज प्रकृतीचिया निष्ठा ।
देहदुर्गाचा अभिमान लाठा । जाहला वरिष्ठा या हेतू ।।भा. २२।२८६

म्हणून कोणाला हा आटपत नाही. कारण हा किल्ल्याचे आश्रयाने आहे. म्हणून तो अजिक्य होऊन बसला. मग याला कोणी जिकले काय ?

जेणें आपुलेनि पुरुषार्थें जिकिला संसार । केला [illegible] देशधडी ?
नाम. ९२०

आजपर्यंत याला अनेक महात्म्यांनी जिकले, समोरासमोर युद्ध करून जिकले. विश्वासघात केला नाही. दगलबाजी केली नाही. डोक्यात दगड घातला नाही.

निष्कपटा होआवें । उगिणा घाई झुंजावें ।। ज्ञा. [illegible]

नाहीतर अलीकडचे युद्ध. विमानातून शत्रूवर बॉम्ब टाकावे ; हे धर्मयुद्ध नव्हे. महात्म्यांनी अहंकाराला जिकले.

एकी केली हातोफळी । ठाया बळी पावले ।। तु. १८१४
शुक्राचार्यासारखे पूर्वीचे महात्मे.
एऱ्हवीं विषय जाणोनि जन्मले । जे शुकादिक दादुले ।। ज्ञा.११।१७३
जन्मतां संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कळंक तुका म्हणे ।।
तु. २८१८

असे पुष्कळ महात्मे भरतभूमीत होऊन गेले. त्यांनी हातोहात (हातावर हात देऊन) देहाभिमानाला (संसाराला) जिंकले. ते संसारावर इतके चिडले की –

येणें मज भोगविल्या खाणी। नसता छंद लाविला मनीं।
माजलों मी माझे भ्रमणीं। आली बोडणी विटंबना ॥ तु. ७३०
म्हणोनी रुसलों संसारा। सर्प हा विखार पांढरा।
तुजशीं अंतर रे दातारा। याचि दावेदारा निमित्त ॥ तु. ७३०

आम्ही नित्य शुद्ध बुद्ध मुक्त, निजानंदाने तृप्त असताना, नाना प्रकारच्या योनींमध्ये कुचमावयारा लावले म्हणून अहंकारावर चिडून तु. म. म्हणतात– म्हणोनी रुसलो संसारा ॥

पैं भव स्वर्गा उवगले। मुमुक्षु योगज्ञाना वळघले।
पुढती न यों इया निघाले। पैजा जेथ ॥ १५।२७७

त्यांनी अगोदर सत्संगतीने सच्छास्त्राचा अभ्यास करून ऐहिक संसाराचे मिथ्यात्व जाणले.

विटलें हें चित्त प्रपंचापासूनि। वमन तें मनीं बैसलेंसें ॥ २१२२
सर्वविशीं माझा त्रासलासे जीव। आतां कोण भाव निवडूं एक ॥२२९५
संसाराची मज न साहेचि वार्ता। आणिक म्हणतां माझे कोणी ॥
तु. २२९५

इतकी संसाराची ओकारी आली, किळस आली.

भोजनसमयीं ओकाचा आठव। ठकोनियां जीव कष्टी करी ॥ तु.३१३०

सर्व संसाराला कंटाळून साधक हा ज्ञानाच्या अथवा अष्टांग योगाच्या मार्गाला लागतो. पण संसार त्याला सोडीत नाही. दुकानातून गिऱ्हाईक जाऊ लागले म्हणजे तो दुकानदार जसा कासावीस होतो, तसा संसार त्या साधकाला म्हणतो, ऐहिक संसारात सापडला नाहीस तर स्वर्गात धरीन; तेथेही सापडला नाहीस तर सत्यलोकात धरीन. सत्यलोक ही संसाराची शेवटची हद्द आहे.

म्हणौनि ब्रह्मेशानापरीतें । वाढणें नाहीं जीवातें ।
तेथूनि मग वरौतें । ब्रह्मचि की ॥ ज्ञा. १५।२०३
अशी साधकाची व संसाराची धरपकड चाललेली असते.
संसाराचिया पायां पुढा । पळती वीतराग होडा ।
ओलांडोनि ब्रह्मपदाचा कर्मकडा । घालिती मागां ॥ ज्ञा. १५।२७८

साधकाने सत्यलोकाची हद्द ओलांडली मग संसार मागे फिरतो. विचाराने साधक ऐहिक पारत्रिक विषयांचा त्याग करतो.

परमेष्ठिपदा । तुच्छ मानिती सर्वदा ॥ तु. २२३७
ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें चित्त झणीं जडों देसी ॥ तु. १०७०

तत्संबंधी वासना टाकणें कीं संसारच काय सर्वच विकार त्या साधकाच्या नांवानें ओरडतात.

रडती रात्रंदिवस काम क्रोध माया । म्हणती हायहाय यमधर्म ॥
तु. ४०५१

यमधर्म तर हायतोबाच करतोच. संसाराच्या हद्दीतून ब्रह्मस्वरूपाच्या हद्दीत जात असतो. आपला झाडा देतो आणि दाखला घेतो व पुढे जातो.

अहंतादि भावा आपुलिया । झाडा देऊनि आघवेयां ।
पत्र घेती ज्ञानिये जया । मूळ घरासी ॥ ज्ञा. १५।२७९

याचे रहस्य असे आहे की अंतःकरणात ज्या ज्या विषयाची वासना उत्पन्न होईल ती ती विचाराने दाबून टाकतो. आपली आजच ही धडफड चाललेली असते. ब्रह्माच्या राज्यात जातो. म्हणजे विमानात बसून दुसरीकडे जात नाहीं. ब्रह्मस्वरूप शुद्ध असल्यामुळे अहंकारादिकांची घाण तेथे खपणार नाहीं, म्हणून विचाराने अहंकारादि भाव टाकून देतो म्हणजे देहाभिमानाचा निरास करतो व मोकळा होतो तु. म. म्हणतात –

तेणें आपुलेनि पुरुषार्थे जिंकिला संसार ।
केला मद मत्सर देशधडी ॥ नामदेव ९२०

संसाराला कसे जिंकतात हे सांगितले. याचे रहस्य थोडक्यात सांगतो. प्रथमतः साधकाने काय केले ?

तयाचा देहदुर्ग हा थोरा । मोडूनि घेतला तो वीरा ॥ ज्ञा.१८।१०५२
देहाभिमानाला जिंकायचे म्हणजे गळा कापून टाकावयाचा नाहीं.

मग देहाहंकार कसा जिंकला ?

अहंकार ज्या किल्ल्याच्या आश्रयाने आहे, तो किल्ला पाडला म्हणजे सर केला. आश्रयाचा नाश झाला की आश्रयीचा नाश होतो. विचारानें तिन्ही देहांचा निरास केला म्हणजे झाले. निरास करणे म्हणजे शरीराचे दुःखरूपत्व व मिथ्यारूपत्व जाणणे.

देह आधीं काय खरा । देह संबंध पसारा ।
वृजगावणें चोर । रक्षणासें भासतें ॥ तु. ३८६६

शरीर खोटे आहे, असा आम्ही याचा विचार करीत नाही. देह व देहसंबंधी मिथ्या आहेत. कोणी म्हणेल आम्हाला दिसतो, भासतो, तर खोटे कसे म्हणावयाचे ? तर जेवढे दिसते, तेवढे खरेच असते, असा कोठें नियम आहे ? मृगजळ स्वच्छ दिसते मग ते खरे आहे काय ? शरीर जर खरे असते तर ते नाशाला पावले नसते. पण ते जळून जाते.

एक पाहातसां एकांचीं दहनें । सावध त्या गुणे कां रे न व्हा ॥
तु. २७१५

आणि शरीरजात आघवें । हें नाशवंत स्वभावें ॥ ज्ञा. २।१३६
राखत राखत देह पडे ॥
आजा मेला पणजा मेला बाप मसणा नेला ।
देखत देखत नातु पणतु तोही वेडा झाला ॥ ज्ञा. अ. ९४
पित्या देखतां पुत्र मरे । पुत्रा देखतां पिता झुरे ।
काळें काळ अवघेंचि सरे । कोणीही नुरे क्रियेसी ॥ भा. २८।२८५

शरीर सत्य असते तर त्याचा नाश झाला नसता. प्रत्येक क्षणात त्याचा नाश होतो.

जातस्य ही ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च । गी. २।२७
अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिवेदना ॥ गी. २।२८

आदि नाही, अंती नाही. मध्येच भासते; म्हणून खोटे आहे. कारण आदिअंती जी स्थिती असते तिचेच ग्रहण करावे लागते. आता आपण हे सत्य का मिथ्या आहे म्हणून भूतकाळ, भविष्य काळ व वर्तमान काळ आहे यांना विचार भूतकाळ व भविष्यकाळ शरीर नाही म्हणतात व वर्तमान काल आहे म्हणतो. बहुमताने ठराव पास होत नाही.

या शरीराचे मिथ्यत्व पुष्कळ प्रकाराने सांगता येईल. मुलगा पित्याचे मृत शरीराला दहन करतो. मग शरीर सत्य असते तर गुन्हेगार व पितृद्रोही ठरला असता.

... बुजगावणे । तैसी देहाची स्थिती ।।
का तृणाचा बाहुला । जो आगरामेरें ठेविला ।
तो साचचि राखता कोल्हा । मानिजे ना ।। ज्ञा० १८।४३८

सर्व शेत लुटून नेले अथवा पाखरांनी खाल्ले, तरी त्या बुजगावण्याचे हात जसेच्या तसेच असतात.

वारा सुटला म्हणजे ते बुजगावणे हालते. त्याप्रमाणे शरीरात प्राणवायू आहे म्हणून शरीर हालचाल करते. प्राणवायू निघून गेला की, प्रेत होऊन पडते. असे याचे मिथ्यत्व एकदा का जाणले म्हणजे मग कोण याच्यावर प्रेम करील ? याचे मिथ्यत्व व दुःखरूपत्व कळत नाही, म्हणून प्रेम करतात.

जागृतीमाजी जें जें दिसे । तें तें जागृतीसवें नासे ।
स्वप्नीं जें जें आभासे । तें स्वप्नासारसें मावळे ।। भा. २८।२८१

देह असा मिथ्या आहे हे समजणे म्हणजेच देहरूप किल्ला सर करणे.

देहाचिया माथा । ठेविली होती अहंता ।
ते देह मिथ्यत्व पाहता । समूळ अहंता पळाली ।। भ० । २६५
हा विचारूनि अहंकारु सांडिजे । मग असतीच वस्तु होईजे । ज्ञा.६।७१

अहंकार टाकला की तो देवच होय. अशा रीतीने अहंकाराला जो जिकतो तो शूर आहे. म्हणून महाराज म्हणतात–

जिकावा संसार । येणें नांवें तरी शूर ।। १ ।।

यासाठी देवाची प्रार्थना करावी. देव येतो.

प्राणा वेगळा न करी नारायण । मग नसो ज्ञान मूर्ख बरा ।। ३७२६

येई वो येई वो येई धांवोनिया ।

विलंब कां वाया लावियेला कृपाळे ।। तु. १५७३

न करी त्याचें गांढेपण

नारायण सिद्ध उभा ।। तु. २६६८

पितांवर शेला कैसा गगनी झळकला ।

गरुडावरी बैसोनि माझा कैवारी आला ।। नामदेव ३७८

म्हणून महाराज म्हणतात—

पण ऐशा नांवें । देव धरिजेतो भावें ।। ३

असे उत्तम रीतीने जगावे.

तुका म्हणें ज्यावें । सत्कीर्तीनें बरवें ।। ४ ।।

**( जय विठ्ठल जय विठ्ठल )**

---

# संत जाती हरिकीर्तना

संत जाती हरिकीर्तना । त्यांच्या वाहीन मोचे वाहणा ।। १ ।।
हेचि भवसिंधूचें तारूं । तेणें उतरूं पैल पारू ।। २ ।।
जन्मोजन्मीचे भेषज । तें हे संतचरणरज ।। ३ ।।
संतचरणींच्या पादुका । जाहला जनार्दन एका ।। ४ ।।

**उपोद्घात** – या अभंगात एकनाथ महाराज आपल्या अंतःकरणात संतांच्या सेवेबद्दल असलेली आदरबुद्धी व्यक्त करतात.

संत जाती हरिकीर्तना । त्यांच्या वाहीन मोचे वाहाणा ।। १ ।।

संत हरिकीर्तनाला निघाले म्हणजे कोणती कामगिरी करीन, ते व्यक्त करतात. टाळ, पखवाज, विणा वगैरे वाहणे अशी संतांची पुष्कळ कामे आहेत. पण नाथ महाराज म्हणतात– संत जर हरिकीर्तनाला निघाले, तर मी त्यांचे जोडे–वाहाणा वागवीन.

संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं ।
हाती टाळ दिंडी नाचेन पुढें ।। तु. २२७६

त्या योगाने काय होईल, संतांचे मोचे अगर वाहाणा वाहण्यात आहे तरी काय, हीच गोष्ट नाथ महाराज अभंगाच्या दुसऱ्या चरणात सांगतात.

हेंचि भवसिंधूचें तारूं । तेणें उतरूं पैल पारू ।। २ ।।

संत जर हरिकीर्तनाला निघाले, त्यांच्या मोचे वाहाणा वागवण्याचे अगर वाहण्याचे काय फळ तर भवसिंधू तरून जाण्याचे ते तारू आहेत. तरून जाण्यास अत्यंत कठीण असा हा संसार आहे.

संसारसिंधु दुस्तर । नुल्लंघितां पार ।
बहुत वाहाविलें दूर । न लगेचि तीर पैलथडी ।। तु. ७४९

**संत जाती हरिकीर्तना**

संसारसमुद्र तरून जाण्याला अत्यंत कठीण. त्यात बहुत जण दूर वाहून गेले आहेत.

बुडाले तयांचा मूळ ना मारग । लागला तो लाग सांडूनिया ॥
तु. १८६१

संसारसमुद्राच्या पलीकडच्या काठाला एकही गेला नाही.

करितां विचार । तो हा दृढ संसार
ब्रह्मादिकां पार । नुलंघवे सामर्थ्ये ।। तु. १५४२

स्वतःच्या सामर्थ्याने जीवाची गोष्ट सोडा पण खुद्द ब्रह्मादिकांनाही जाता आले नाही.

म्हणून तुकाराम महाराज म्हणतात त्या मार्गाने चालताना मलादेखील भय वाटावें.

चालतां वाट पुढें भय वाटतें चित्तीं । बहुत जन गेले ।
नाही आलें मागुती । न देखो काय झाले कान तरी ऐकती ।
बैसलों संधि मार्गीं तुज धरूनी चित्तीं ॥ तु. ३५०
येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो ।
तो तो अपावो । होय तें ऐक ॥ ज्ञाने. ७।८२
दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ गी. ७।१४

या श्लोकावरची ज्ञानेश्वर महाराजांची टीका पाहण्यासारखी आहे. तात्पर्य, तरून जाण्याला अत्यंत दुस्तर जो भवसागर त्यातून पार जाण्याला संतांच्या वाहाणा वाहणे हे मोठे जहाज आहे. नाथ महाराज अभंगाच्या तिसऱ्या चरणात म्हणतात—

जन्मोजन्मीचे भेषज । ते हे संतचरणरज ॥ ३ ॥
संताचे महात्म्य एक एक काय सांगावे !
अंघ्रिरेणु ज्याचा उद्धरिता पतिता ।
प्राकृत वाणी केंवि वर्णु हरिभक्ता ॥ ज्ञा. अ. १९६

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात– त्यांच्या चरणाचे रज:कण लागले की– मग कसलाही पातकी असला तरी त्याचा उद्धार होतो. सर्व संत हेच सांगतात.

चरणींचें रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्यांचे माथां ॥२२३१

भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥ तु.२२३१

नामयाचे पाठी चाले केशीराज । लागावया रज चरणीचे ।

ज्यांच्या चरणाचे रज:कणाचे माहात्म्य असे आहे की, स्वत:परमात्म्याने त्यांची पवित्र होण्याकरिता अपेक्षा करावी.

माझ्या ठायीं जें पवित्रपण । तें भक्तांचेनि मज जाण ।

यालागीं भक्तामागें मी आपण । धांवें चरण रेणू वंदावया ॥

भा. १४।१८९

भक्त चरण रेणु वंदितां । मज केवढी आली पवित्रता ।

माझें पायवणी वाहे माथां । जाण तत्त्वता सदाशिवू ॥ भा. १४।१९०

म्हणूनच तुकाराम महाराजही म्हणतात की–

तुका म्हणे निवे तनु । रजकणु लागतां ॥ ४ ॥ तु. २२३१

त्यांच्या पायाच्या रज:कणाने शरीर शांत होते.

पण शरीर तापले तरी कशाने ?

तापत्रय अग्नीचा लागला वोणवा ।

कवण रिघे आड कवण करी सावा धावा ॥ ज्ञा. अ. १४

आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक या त्रिविध तापाने संतप्त झालेले शरीर संतचरण रज:कणाने शांत होते म्हणून–

जन्मोजन्मीचें भेषज । तें हे संतचरण रज ॥ ३ ॥

ज्या धुळीला संतांच्या चरणाचा स्पर्श होईल ते रज नव्हेत, तर अनेक जन्मांपासून जीवाच्या मागे लागलेला भवरोग आहे. त्यातून त्यांची सुटका करणारे हे एक औषध आहे. एवढा अधिकार ज्यांच्या चरणाच्या योगाने मोचे, वाहाणा आणि रज यांना आला, तेवढा अधिकार माझ्या अंगीं त्यांचें मोचे वाहाणा वागविण्याने आला म्हणून नाथ महाराज सांगतात, मी स्वत: त्यांच्या पायांतल्या पादुका झालो.

संतचरणींच्या पादुका । जाहला जनार्दन एका ।। ४ ।।

तुका म्हणे त्याचे पायी पायपोस । होऊनियां वास करीन तेथें ।।
तु. ३९०८

माझी तनु आणि प्राण । ह्या दोन्ही पाउवा लेऊं श्रीचरण ।
करुं मोक्ष निंबलोण । पायां तयां ।। ज्ञा. १५।८

श्रीगुरूच्या दोनी पायांत माझे शरीर व प्राण; स्थूलशरीर व लिंग-शरीर या दोन खडावा करून घालू आणि ऐहिक पारत्रिक भोग व मोक्ष हे श्रीगुरुचरणावरून उतारा म्हणून ओवाळून टाकू.

संतचरणींच्या पादुका । झाला जनार्दन एका ।। ४ ।।

( भावार्थ समाप्त )

**व्याख्यान**– प्रथम कडव्याचा विचार सांगणार आहे तो असा – एकनाथ महाराज म्हणतात, संत हरिकीर्तनाला निघाले तर त्यांचे मोचे, वाहाणा वाहीन. पण हे कोणते संत व ते कीर्तनाला निघाले कोठे ? याचा विचार करणे अत्यंत अवश्य आहे. हे समजण्याची एवढी आवश्यकता काय ? संत कुणाला म्हणावे हे खरोखर कळले पाहिजे. बहुतेक लोक संतांना न ओळखता भलत्याच्या मागे संत म्हणून जातात ' हुरहुर मेंढी लागली लांडग्याच्या पाठी,' अशी एक म्हण आहे. या म्हणीप्रमाणे अंधपरंपरेने वाटेल त्याच्या मागे जातात.

गतानुगतिको लोके न लोकः पारमार्थिकः ।
वाळुका लिङ्गमात्रेण कथं मे ताम्रभाजनम् ।। ० ।।
अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ।। मुण्ड. उ. २।८

म्हणून संत कुणाला म्हणयाचे हे पहिल्याने कळावयास पाहिजे. कोणी म्हणेल सध्या तर संतांचे पीक पिकले आहे. बहुतेक संत सारखे दिसतात. हे खरे का साधू आहेत ? नाही.

पोटासाठीं संत । झाले कलींत बहुत ।। ३ ।। तु. २८४७

कलीयुगात पुष्कळ संत बोकाळलेले दिसतात, हे देवाकरता नाही.

एखादाच संत असतो, पण बहुतेक पोट जाळण्याकरताच संत झालेले दिसतात. पोट भरण्याकरता संतच का झाले ? तर हा बिनभांडवली धंदा आहे. पुन्हा लौकिक सुखाच्या गोष्टींची चंगळ असते.

म्हणविती ऐसे आइकतों संत । न देखिजे होत डोळां कोणी ।। तु.३३६२

देवाकरता संत झाल्याचे कोणी दिसून येत नाही. तर,

भोंदावया मीस घेऊनि संतांचें । करी कुटुंबाचें दास्य सदा ।। तु. २८२३

लोकांना भोंदण्याकरताचे नुसते सोंग घेतात.

टिळे टोपी माळा देवाचें गबाळें । वागवी ओंगळ पोटासाटीं ।। तु. २८२६

पोट जाळण्याकरता टिळे, टोपी माळा धारण करतात.

रात्रंदिवस न पुरे कुटुंबी समाधान ।

सतांची बाह्य चिन्हे असतात– माळा, मुद्रा, भगवी पताका, भस्म, भगवी वस्त्र ही बाह्य चिन्हे अंगावर धारण करून, संत म्हणवणारे पुष्कळ आहेत. हे सर्वच आपण आपल्याला संत म्हणवतात. पण खरा खरा झालेला कोणी दिसत नाही.

संत चिन्हें लेउनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ।। तु. २८३४.

संतांची बाह्य चिन्हे धारण करून लोकांत संतपणाचे भूषण मिरवितात. असल्या बाह्य वेषाने ते संसारातून मुक्त तर होत नाहीत. उलट

पडिले दुःखाचे सागरीं । वहावलें भवपुरीं ।। तु. २८३४

ते संसारपुरात वाहावले आणि दुःखाच्या समुद्रातच बुडावले. ज्या विकारांचा नाकनाट केल्याने जीवात्मा मुक्त होतो, त्यांची तर त्यांच्या अंतःकरणात वाढ झालेली असते.

काम क्रोध लोभ चित्ती । वरि दाविती विरक्ती ।। तु. २८३४

काम, क्रोध व लोभ हे तिघेच जीवाला अधोगतीला पाठविणारे, दुःख देणारे आहेत.

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
काम, क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्रयं त्यजेत् ।। गी. १६।२१

हे तिन्ही जिवीं जंव जागती । तंववरी निकियाची प्राप्ती ।
हे माझे कान नाइकती । देवोहीं म्हणे ।। ज्ञा. १६।४३४

अशा विकारांनी ज्यांचे अंत:करण कुजलेले आहे, अनेक विकारांना वश होऊन विषय मिळविण्याविषयी ज्यांना वेड लागले आहे, ते त्या विषया-विषयीच्या कामना पूर्ण होण्याकरता संतांचा बाह्य वेष घेतात, आणि भोळ्याभोळ्या लोकांना फसवितात.

अंतरीं विषयाचें लागलें पैं पिसें । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां ।।
तु. २८७३

अशा अनेक बाह्य वेष धारण करणाऱ्यांची यादीच देतो.

प्रथम आपण संन्यासी घेऊ. संन्यासी हे आपली पांढरी वस्त्रे भगवी करतात. त्यांनी जानवे व शेंडी काढून टाकलेली असते. या त्यागाने ते आपण आपल्याला संन्यासी म्हणवितात, लोकांना दाखवितात. परंतु ज्या विषय-वासनांचा त्याग करावयास पाहिजे, त्या वासनांचा त्यांनी अंत:करणातून त्याग केलेला नसतो.

होऊनि संन्यासी भगवीं लुगडीं । वासना न सोडी विषयांची ।।तु.२८२७

कोणी एखादा भाविक, या संन्याशांना भोजनाचे आमंत्रण देण्यास गेला. तर ते असे विचारतात की– नित्याचाच प्रसंग आहे का नैमित्तिक आहे? म्हणजे साधे घडचाळ टिपरू आहे का श्रीखंड, जिलबी, बासुंदी? त्यांनी नैमित्तिक सांगितल्यावर नारायण नारायण म्हणत ऐच्छिक योग घडून आल्याचे सुचवितात. आणि पर्यायाने आदर सत्कार व्हावा असे सुचवितात.

निंदिती कदान्न इच्छिती वेदान्न । पाहाताती मान आदराचा ।।
तु. २८२७

अशा प्रकारचे भगवे वस्त्र धारण करतात. अंतर भगवे नसते. आता बिचाऱ्या त्या बाह्य भगव्या वस्त्रांनी काय करावे?

तुका वस्तर बिचारा क्या करो रे । अंतर भगवान होय ।
भीतर मैला कब मिटो रे । मरे उपर धोय ।।१।। तु. ४२९

पहिला नाद चटपट चटपट । शिखा सूत्र त्यजुनी सपाट ।
बिन्जा होमिला बुट । परि अपुट तैसाची ॥४॥ ज्ञा. ७४२
वाया केली तडातोडी । वृथा त्यजिली सूत्रशेंडी ।
परि विषयवासना न सोडी । उपाधि गाडी श्रीपादा ॥५॥ ज्ञा. ७४२
संन्यास घेउनी कांचा । जिव्हा शिस्न वेधलें लांचा ।
विटंबु केला वेषपुडे आलेचा । चटपट चटपट मनींचे मनीं बसे गा दादेनो ॥
ज्ञा. अ. ७४२

आलियाचा संतोष गेलियाची हानी ।
नाहीं त्याचा अंतिकेचे त्याची कहाणी ।
ऐसे संकल्प विकल्प देहीं वरितरि ।
मुंडिलिया होय कायी ।
तरि बहुरुप्याच्या सोई काई काई नटू नसे रया ॥१॥
आधीं निगरे दंडावी पाठीं बाहिरु मुंडावे ।
नाहीं तरी योग भोंडिवा कां करिसी रया ॥२॥ धृ. ज्ञा. अ. ४९२

ज्ञानेश्वर महाराजांच्या अभंगतात हा विचार सांगितला आहे. अशा बाह्य भगव्या वस्त्राने संन्यास घेणारास ज्ञानेश्वर महाराजांनी बहुरुप्याची उपमा दिली आहे. अशामुळे त्याला काय मिळणार ! नुसत्या बाह्य भगव्या वस्त्रांनी संन्यासी होत नाही.

भगवें तरी श्वान सहज देप त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ॥
तु. २८६०

अशा भगवे वस्त्र धारण केलेल्या बाह्य वेषधारी संन्याशाला पाहिल्यावर, त्रिविध तापाने होरपळलेले लोक गुरु म्हणून त्यांच्या पाठीमागे लागतात. त्यांचा नुसता बाह्य वेष असल्यामुळे त्यांना बोधाचा गंध नसतो. अधिकारपरत्वे उपदेश करण्याचा संप्रदाय त्यांना ज्ञात नसतो. हा कर्माचा, का उपासनेचा, का ज्ञानाचा अधिकारी आहे हे ज्ञात नसते. काही तरी उपदेश करतात. मग त्यांच्याकडे येणाऱ्याचे कसे कल्याण व्हावे ?

तापत्रयी तापलीं गुरु ते गिवसिती । भगवे देखोनि म्हणती तारा स्वामी ।।
तंव ते नेणोनि उपदेशाची रीती । आन आन उपदेशिती ।।१।।
संत ते कोण संत ते कोण ।। धृ० ।। ज्ञा. ५०४

यांच्या नादी लागणाऱ्यास सुखलाभ तर व्हायचा नाही पण उलट दुःखच होते. ज्ञा. म. दृष्टान्ताने सांगतात –

कोणी एक मूर्ख मनुष्य होता. त्याची बायकोही मूर्खच होती. तो म्हणजे रेडा आणि त्याची बायको म्हणजे म्हैस. तो बारा कोसांचा प्रवास पायी चालून आला. त्याचे अंग दुखायला लागले. त्याची बायको म्हणाली, थांबा. पाणी तापवते स्नानाकरिता. तो म्हणाला, नुसत्या गरम पाण्याने अंगाचे ठणकणे कसे राहील ! खोबऱ्याचे तेल असेल तर बघ. ती म्हणाली कुठून आणू ? तो म्हणाला, अग गोडे तेल आण ! ती म्हणाली, अहो चार दिवसा-पासून बिनाफोडणीचे चालले आहे. तेल नाही पण थांबा. तिने बिबवे आणले आणि म्हणाली, खोबऱ्याचे तरी तेलच, शेंगदाण्याचे तरी तेलच आणि बिबव्याचे तरी तेलच. तिने आपल्या पतीच्या अंगाला बिबव्याचे तेल चोळले. त्याचे अंग म्हणजे भुरमुऱ्याचे पोत्याप्रमाणे सुजले.

कोणी एक प्राणी प्रवासे पीडिला । स्नेहाळु देखिला बिबवा तो ।
तयाचे स्नेह लावितां अंगी । सुजला सर्वांगी तैसें जालें ।।४।।
ज्ञा. अ. ५०४

दुसरा एक क्षुधेने व्याकुळ झाला म्हणून रुईचे दोडे तोडून खाण्याला बसला. त्या फळात नुसता कापूस असतो. (त्यातील म्हाताऱ्या भुरकन उडून गेल्या.)

कोणी एक प्राणी क्षुधेने पिडिले । म्हणोनि दोडे तोडूं गेले ।
खावों बैसें तों नुसधि रुपीं उडें । ठकले बापुडे तैसें झालें ।।३।। ज्ञा.५०४
कोणी एक प्राणी पडिला झडीं । म्हणोनि गेला पैल तो झाडी ।
खाखात अस्वली उठली लवड सवडी । नाक कान तोडी तैसे जालें ।

हा तिसरा एक गृहस्थ– पावसाच्या झळीत गारठला म्हणून झाडीचा आश्रय करू गेला. तेथे पिसाळलेली अस्वली होती. तिने त्याचे नाक, कान, तोडले.

संत म्हणून भलत्याच्या मागे लागले तर असे होते. मग खऱ्या संन्याशाचे लक्षण तरी काय ?

देह मी अथवा देहसंबंधी माझे याची आठवण ज्याच्या अंतःकरणातून नाहीशी झाली तो अखंड संन्यासी आहे.

आणि मी माझे ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण ।
पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥ ज्ञाने. ५२०

आता दुसरे बाह्य वेषधारी गोसावी असतात, त्यांचा विचार करू. ज्यांनी डोक्यावर लांब लांब जटा वाढविल्या आहेत, हातामध्ये कटोरा घेऊन क्रोधाविष्ट होऊन चालतात.

लांब लांब जटा काय वाढवूनि । पावडें घेऊनि क्रोधें चाले ॥१॥
खायाचा बोळसा शिव्या दे जनाला । ऐशा तापशाला बोध कैंचा ॥२॥
तु. २८३३

केवळ खाण्यापिण्याकरताच बाह्य गोसाव्याचा वेष धारण केला. तो तोंडाने म्हणत असतो की :– साधुको कोई शीरापुरी खिलाव घी शक्कर खिलाव । कोई है ये नगरिमें धर्माता ! या त्याच्या म्हणण्याचा कोणी धिक्कार केला तर शिव्य देतो आणि म्हणतो– चंदन थे तो घसगये । रह गये निमके खोड । दाते दाते तो मरगये ! रहगये चपाती चोर ॥०॥
अशा वेषधारी गोसाव्यांना आत्मबोध कसला ?

सेवी भांग अफू तंबाखू उदंड । परि तो अखंड भ्रांती माजी ॥३तु.२८३३

ज्याचे नित्यसेवन भांग–गांजा–अफूचे यथेच्छ होत आहे तो सर्वकाळ भ्रांतीतच असतो. मग आत्मबोध कोठून असणार ! अशा प्रकारे भ्रांतीत बुडालेला त्याला परमात्म्याचा अंतराय होतो.

तुका म्हणे ऐसा सर्वस्वें बुडाला । त्यासी अंतरला पांडुरंग ॥तु.२८३३

तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही गोसावी झालो. ते कसे झालो. ते सांगतात–

काम क्रोध बंदी खाणी । तुका म्हणे दिले दोन्ही ।

इंद्रियांचे धणी । आम्ही जालों गोसावी ।। ४ ।। तु. २११३

कामक्रोधादिकांना बंदीखान्यात टाकून इंद्रियांचे स्वामी झालो म्हणजे इंद्रियांचे गोसावी झालो. याच प्रकारातील जगाला फसविणाऱ्या देवऋषीचा एक वर्ग आहे. हे एखादे क्षुद्र दैवत–खंडेराय, बहिरोबा, वेताळ, चांगदेव यांचे वारे आपल्या अंगात आल्याचे दाखवितात आणि लोकांना भुलवितात. परिणामी यांच्या हाती देव तर लागत नाही. पण देवाच्याऐवजी चोट लागते.

अंगीं घेऊनियां वारें दया देती । तया भक्तां हातीं चोट आहे ।

तयांचे स्वाधीन दैवतें असती । तरी कां मरती त्यांचीं पोरें ।। तु.२८४२

तुका म्हणे पाणी अंगारा जयाचा ।

भक्त कान्होबाचा तोहि नव्हे ।। तु. २८४२

लोकांना अंगारा देऊन फसवणारा हा देवाचा भक्त नव्हे.

काही लोक मंत्र, तंत्र देणारे असतात त्यांनाच लोक गुरु समजतात. देवाचा साक्षात्कार करून देतो म्हणून देणारे, कान फुंकणारे, स्वतःला संत म्हणवतात.

मंत्र तंत्र उपदेशिते । घरोवरीं गुरु आहेत आइते ।

जो शिष्यासि मेळवी सद्वस्तूतें । सद्‌गुरु त्यातें श्रीकृष्ण मानी ।।
भा. २।४७४

नेणे फुंको कान । नाही एकान्तीचें ज्ञान ।। तु. ३४००

उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास ।। २५०१

हे लोक आपल्या शिष्याला सांगतात, त्या शेटजीला गाठून आण.

घालूनियां मध्यवर्ती । दाटुनि उपदेश देती ।। १ ।। तु. २८२१

शिष्य वर्णन करतो, ‘असे महाराज पुन्हा मिळायचे नाहीत.’ तो म्हणतो, पाहू पुढे, घेऊ अनुग्रह पुढे. मध्यवर्ती म्हणतो– महाराजांची तुमच्यावर कृपा झाली आहे. तेव्हा आपण चला.

रांडा पोरांते गोविती । वर्षासनें ते लाविती ।। ३ ।। २८२१
तुका म्हणे बळे । उपदेशाचें तोंड काळे ।।
ऐशियाच्या उपदेशें । भव बंधन कैसें नासे ।। २९४२

यांच्या उपदेशाने कसे कल्याण व्हायचे ? एक मंत्र म्हणता आला की झाला गुरु. शब्दनिष्णात, परनिष्णात व्हायला नको; अशांच्या उपदेशाने संसारबंधन कसे नष्ट होईल ?

त्यांचे लागले संगती । झाली त्यांसी तेचि गति ।। तु. २८३४
ऐसे पोटभरे संत । तया कैचा भगवंत ।। २ ।। २८२१
तुका म्हणे तयां । तमोगुणियांची क्रिया ।। ४ ।। २८२१

त्यांच्या तावडीत भोळे–भाळे स्त्रिया-पुरुष सापडतात. दरवर्षाला गुरु आल्यावर अमुक वर्षासन द्यावे, असे त्यांच्या मागे लावतात.

आतापर्यंत सांगितलेल्या वेषधारी संतांमध्ये भक्तीचा भाग तर दिसत नाही. उलटपक्षी विषयाचीच गोडी दिसते.

भक्ति ज्याची थोडी । पूर्ण विषयाची गोडी ।। १ ।। ३०३०
तो नरचि नव्हे पाहीं । खर जाणावा तो देहीं ।। २ ।। ३०३०

अशा या वेषधारी संतांना मनुष्य न म्हणतां गध्धेसंत म्हणावे.

तुकाराम महाराज देवाजवळ परिहार देतात, की हे देवा, परमार्थाच्या नावाखाली भोळयाभाळया लोकांना फसवून द्रव्यादि भोग संपादन करणारे यांना मी आपल्या मुखाने संत म्हणणार नाही.

करिसी तें देवा करीं माझे सुखें । परी मी त्यासी मुखें न म्हणे संत ।।१।।
जया राज्य द्रव्य करणें उपार्जना । वश दंभ माना इच्छे जाले ।।२।।
जगदेव परी निवडीन निराळे । ज्ञानाचे आंधळे भारवाही ।।३।।
तुका म्हणे भय न धरी मानसीं । ऐसियाचें विशीं करितां दंड ।।४।।

तु. १०६५

तुकाराम महाराज अशा वेषधाऱ्या संतांचा धिक्कार करतात.

धिग त्याचें साधुपण । विटाळूनि वर्ते मन ।। २ ।। २९०४

येथपर्यंत जो आम्ही वेषधारी संताचा निषेध केला तो त्यांनी घेतलेल्या वेषाचा नव्हे, तर त्यांच्या आत असणाऱ्या अवगुणांचा आहे.

वेषा नाहीं बोल अवगुणा दूषिलें। ऐशा बोला भले क्षणीं क्षोभा ॥
तु. ३७४६

नाहीं केली निंदा। आम्ही दूषिलेंसे भेदा ॥३॥ २८१६

येथपर्यंत साधूचे अनेक बाह्यवेष धारण करून जगाला लुबाडणाऱ्यांचा विचार केला.

येथें नाहीं वेष सरते आडनांव। निवडे घाव डाव व्हावा अंगीं ॥२॥

नव्हती ते संत करितां कवित्व। संतांचे ते आप्त नव्हती संत ॥ तु.२३०६

कवित्व करणारे आपण आपल्याला संत म्हणवतात. कविता छापून पुस्तकरूपाने शिष्यांना द्यायची आणि वघा म्हणायचे. टलाट आणि हिंगण-बेट असे कांही तरी कवित्व करतात. पण तुकाराम महाराज म्हणतात– कवित्व करणारा साधू म्हणावयाचे तर बायांना साधू म्हणावे लागेल. कारण बाया जात्यावर बसल्या की त्यांच्या ओव्या सुरू होतात.

तरोच संतांचे आप्त हेही संत होत नाहीत. ते संत म्हणतात– विचारे, आमचे आजोबा असे साक्षात्कारी होते, नदीला महापूर असताना ते देवाचे नाव घेऊन पाण्यावरून चालून गेले. संताची कृती नसते.

येथे नाहीं वेष मरते आडनाव। निवडे घाव डाव व्हावा अंगीं ॥ तु.२३०६

कित्येकांचे आडनाव संत असते. पण काय करायचे आडनावाला ?

नव्हती ते संत करितां कीर्तन। सांगतां पुराणें नव्हती सत ॥ तु.२३०६

चटकदार कीर्तन करणारा असला, हजारो लोकांना रिझवीना का ?

पण त्याला संत म्हणायचे नाही. हे सर्व संसारी आहेत.

नव्हती ते संत वेदाच्या पठणें। कर्म आचरणें नव्हती संत ॥५॥
नव्हती संत माळा मुद्रांच्या भूषणें। भस्म उधळणें नव्हती संत ॥७॥
तुका म्हणे नाहीं निरसला देह। तोंवरी अवघे संसारिक ॥तु. २३०६
अशा संताचे मोचे, वाहाणा वाहण्यात काय फायदा व्हावयाचा ?

मग नाथमहाराजांनाच आपण विचारू की– तुम्ही कुणा संताचे मांचे, वाहाणा वागवणार ! तर आमचे नाथमहाराज सांगतात –

मनोजय वासना तोडोनी केली बीमोडी ।
मनपुर नगर पहातां दुर्गति मोडी ।
काम क्रोध मत्सर अहंकार झोडी ।
अखंड परमानंद सेऊनी उभवी गुढी ॥४॥ नाथ. ३७०७

महाराज म्हणतात, ज्यांनी मनावर जय मिळविला आहे, विषय-वासनांची "बी" मोड केली. निर्वासना अंतःकरण झालेले आहे आणि जीवाचे खरे खरे शत्रू कामक्रोध, मदमत्सर, अहंकार याना चांगले तिवले, झोडपले, त्यांचा मुडदा पाडला.

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।
विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ गी. १८।५३

भेदभाव तोडोनियां घेतला प्रेमाचा गरळा ।
शुद्धनाम श्रीहरीचें निजमुखीं लागला चाळा ॥
हरि स्मरणाचेनी बळें अंकित केलें कळिकाळां ।
एका जनार्दनीं अखंड सुखसोहळा ॥५॥ नाथ. ३७०७

ही आहेत खऱ्या साधूची लक्षणे. ज्ञानेश्वर महाराजांच्या भाषेत सांगायचे म्हणजे–

सहस्र नामाचें हातियार । शंख चक्राचे शृंगार ।
अतिबळ वैराग्याचें थोर । केला मार षडवर्गा ॥ ५ ॥ ज्ञा. अ. २०५

ज्यांच्याजवळ भगवंताच्या नामाचे हत्यार आहे, तसेच ज्यांच्या अंगात कडकडीत वैराग्याचे बळ आहे, अशाच्या अंतःकरणात कामक्रोधादिक राहतील कसे ?

कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥३॥ २१९३
तुका म्हणे भेदाभेद । गेला वाद खंडोनि ॥४॥ तु. २१९३

केवढे सामर्थ्य त्यांचे की, कळिकाळावर ते जय मिळवितात.

कळिकाळाच्या माथा पाय ठेऊनि । वैकुंठ भुवनासी गेलो रे ॥
तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें । काम क्रोधें केलें घर रितें ॥ ३३६९
सतत कृष्ण मूर्ति सांवळी । खेळे ज्याचे हृदयकमळीं ।
शांति क्षमा तया जवळी । जोयें भावें अनुसरल्या ॥४॥ ज्ञा. २०५

साधूचे लक्षण ज्ञा. म. नी बहारदारीचे केले आहे.

ज्यांच्या हृदयरूपी कमळांत सतत भगवंताची सावळी मूर्ती खेळते
तरी ज्यांचिये चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्र संन्यासी ।
जयां निजेलियातें उरासी । वैराग्य गा ॥ ज्ञा. ९।१८८
आत्मज्ञाने चोखडीं । संत जें माझीं रूपुडीं ।
तेथ दृष्टी पडो आवडी । कामिनी जैसी ॥ ज्ञा. १८।१३५६
गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन ।
दर्शनीं समाधान । आथी जैसें ॥ ज्ञा. १८।१६३६

कोणी म्हणेल असे संत कोठे पहाव ? तर त्यांची नावे, पत्ते सांगतो—

निवृत्ति संत हा सोपान । महा वैष्णव कठीण ।
मुक्ताबाई तेथें आपण । नारायण जपतसे ॥ ज्ञो. अ. २०६

यांना संत म्हणतात. सगळ्या बाबतीत तावून सुलाखून निघालेले. निवृत्तिनाथांचे वर्णन ज्ञा. म. नी केले आहे ते सांगतो.

निवृत्ति जया नांव । निवृत्ति जया वरव ।
जया निवृत्तिचि राणीव । निवृत्तोची ॥ अमृ. २।७०
वांचोनि प्रवृत्तिविरोधें । कां निवृत्तीच्येनि बोधें ।
आणिजे तैसा वाद । निवृत्ति नव्हे ॥ २।७१

प्रवृत्तीचा निरास करून निधर्म अशा निवृत्तीला प्राप्त झाले असे निवृत्ति नाहीत. प्रवृत्तीचा नाश करून निवृत्ती मिळविणारे, तंट्यातले निवृत्ती नाहीत. तर प्रवृत्तीला ते शिवलेच नाहीत.

निवर्त्य तंव नाहीं । मा निवर्तवी हा काई । अमृ. २।३३

तर हे निवृत्तिनाथ स्वयंभूच आहेत.

ऐसे करणावाचीण । स्वयंचि जें निवृत्तिपण ।
तयाचे श्रीचरण । वंदिले ऐसे ॥ अमृ. २१७९

त्याच्या ठिकाणी निवृत्ति हे नाव वादाने आले नसून ते स्वयंभूच आहेत.

ज्ञानदेव वैष्णव मोठा । विठ्ठल नामें मुक्त पेठा ।
स्नान दान घडे श्रेष्ठा । वैकुंठ वाटा संत गेले ॥ ज्ञा. २०६

ज्ञानेश्वर महाराज मोठे वैष्णव. त्यांचा अधिकार मोठा. ज्ञानेश्वर महाराजांने पांडुरंगांनी स्वतःच मोठे बहारदारीचें वर्णन केले आहे.

देवो म्हणती रुक्मिणी । हा एकचि योगी देखिला नयनीं ।
हेंचि ज्ञान संजीवनी । जाण त्रैलोक्यासी ॥ १ ॥ ज्ञा. अ. ९८७
आरती ज्ञानराजा । महा कैवल्य तेजा ।
सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ १ ॥
ज्ञानियांचा राजा गुरु महाराज । म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसें ॥ तु.५३५
लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी ।
अवतार पांडुरंग ! नांव ठेविलें ज्ञानी ॥ २ ॥

ज्ञानेश्वर महाराजांचे पूर्वी ज्ञान होते. पण ते गीर्वाण (संस्कृत) भाषेमध्ये गुप्त होते. म्हणून स्वतः परमात्मा म्हणतात "हेंचि ज्ञान संजीवनी."

धन्य धन्य धरातळीं । जो यातें दृष्टीं न्याहाळी ।
तो वाहात येईल टाळी ! वैकुंठ भुवनासी ॥ २ ॥ ना. ९८७
जो करील याची यात्रा । तो तारील सकळ गोत्रां ।
सकळही कुळें पवित्रा । याचेनि दर्शनें होती ॥ ३ ॥ ९८७
ऐसें सांगतां हरिसी । प्रेम ओसंडलें रुक्मिणीसी ।
म्हणे धन्य धन्य जयाची कुशी । ज्ञानदेव जन्मले ॥ ९ ॥ ९८७

असे निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर महाराज, यांच्यासारखे तावून सुलाखून निघालेले जे संत आहेत त्यांचे मोचे, वाहाणा मी वाहीन असे एकनाथ महाराज म्हणतात.

संत जाती हरिकीर्तना । त्यांच्या वाहीन मोचे वाहाणा ॥ १ ॥

संत जातो हरिकीर्तना

आतापर्यंत संत कुणाला म्हणता येणार नाही व संत कुणाला म्हणावे हे सांगितले.

संताचा बाह्य वेष धारण करणाऱ्याला संत म्हणता येणार नाही.

त्यांच्यावर तु. म. चे एवढे हत्यार का ? तर सर्वजण देव मानीत होते. मग या वेषधारी संतांवर एवढे हत्यार का ? तुकाराम महाराज सांगतात,

जग देव परी निवडोन निराळे । ज्ञानाचे आंधळे भार वाही ।।१०६५

महाराजांनी जागजागी त्यांचा निषेध केला आहे.

वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चिती देव नाहीं ।।
तु. २९२१

वेतन, जमीन, राज्य, द्रव्य मिळवितात त्यांना जीव गेला तरी देव मिळायचा नाही.

तुका म्हणे त्यास देवा नाही भेटी । ऐसे कल्पकोटी जन्म घेतां ।।तु.२९१८

अशाने कोटयवधी जन्म घेऊनही देव भेटणार नाही.

पैं तोंड भरो कां विचारा । आणि अंतःकरणी विषयांसी थारा ।
तरी नातुडें धनुर्धरा । त्रिशुद्धी मी ।। ज्ञा. १५।३९३
आणि ज्ञानही आपैतें होईल । प्रज्ञा परमाणुही उगाणा देईल ।
सकळ शास्त्रांचे येईल । सर्वस्व हातां ।। ज्ञा. १५।३९१

अस्खलित ब्रह्मज्ञान सांगतो, शास्त्र सर्व करतलावर आहे. उत्तम कीर्तन करतो पण त्यांना देव भेटणार नाही.

तुका दास तिनकारे । राम भजन निरास ।
क्या बिचारे पंडित करो रे । हात पसारे आस ।। तु. ४२९।११
तुका परिव बहिर न मानुं । वो हि जनावर बाग ।
असंतनकुं संत न मानुं । जे वर्मकु दाग ।।४।। तु. ४२९

ज्याच्या अंतःकरणात द्रव्याचा लोभ आहे त्यांना देव भेटत नाही.

पेवीं रिघालिया पाणी । त्या धान्याची नव्हे पेरणी ।
तेवीं धनलोभ रिघालिया ज्ञानीं । उपदेशें कोणी सुखी नव्हे ।।
भा. ११।१०२५

ऐशियाच्या उपदेशें । भवबंधन कैसे नासे ।।
बुडवी आपणासरिसे । अभिमानें आणिकांस ।।२।। तु. २९४२

अशानी किती उपदेश केला तरी भवबंधनातून कोणीही मुक्त होणार नाही.

दगडाची नांव अधिकच ते जड ।
आपही डुब गये और यजमानकु लेके डुब गये ।। दोहा.
आशाबद्ध वक्ता । भय श्रोतयाच्या चित्ता ।।१।। तु. २८९०

जेथे वक्ता आशाबद्ध आहे तेथे श्रोत्यांना त्याची काही मागेल म्हणून भीती वाटते.

वायां गेलें तें भजन । उभयतां लोभी मन ।।४।। २८९०

अशा गुरु व शिष्याची एक गोष्ट सांगतो.

गुरूला शिष्याची शंभर रुपयांची शाल पाहून मोह उत्पन्न झाला व 'शालजोडी, शालजोडी' म्हणून जप सुरू केला. ते शिष्याच्या लक्षात आले. गुरुजी आपली शालजोडी उपटण्याला पाहतात. गुरुजींची घोडी दोनशे रुपयांची होती. शिष्याने 'घोडी, घोडी' म्हणून जप सुरू केला. गुरुजींच्या लक्षात आले की– शिष्य शालजोडीच्या बदल्यात आपली घोडी उपटू पाहतो. गुरुजीने मंत्रात बदल केला :–

'तुझी तुला, माझी मला.'

अशा भोंदू लोकांना तुकाराम महाराज संत म्हणावयास तयार नाहीत. भगवान उद्धवाला संताचे अंतरलक्षण सांगतात,

निरपेक्षं मुनिं शांतं निर्वैरं समदर्शनम् ।
अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यंघ्रिरेणुभिः ।। भा. १४।१६

या श्लोकात संतांची पाच अंतरलक्षणे सांगितली आहेत. त्यात पहिले अंतरलक्षण निरपेक्षता हे आहे.

असो पंचलक्षण कथा । एक " निरपेक्षता " आल्यां हातां ।
पायां लागे सायुज्यता । पूर्ण ब्रह्मता ठसावें ।। भा. १४१।१८१

निरपेक्षता हे मोक्षाचे नाक आहे

पारमार्थिया मुख्य विक । निरपेक्षता हे नासीक । (भावार्थ रामायण)
बाकीची सर्व लक्षणे असली आणि निरपेक्षता नसली तर,

काय करावी तो बतीस लक्षणी । नाक नाही तेणे वाया गेली ।।

सोयरीकसंबंधाकरता आलेली मंडळी मुलीला पाहताना लक्षणे पाहतात. त्यात मुख्य म्हणजे तो नाकीडोळो नीटस असली पाहिजे. रंगाने जरी सावळ्या रंगाची असली तरी चालेल म्हणतात. पण नाशिक जर त्र्यंबकेश्वरला गेलेले असले (म्हणजे नाकाचे थालीपीठ झालेले असले, सारवल्यासारखे असले) तर जमणार नाही म्हणतात. स्त्रीचे नाक म्हणजे तरवारीच्या धारेप्रमाणे आणि डोळे म्हणजे हरिणासारखे गोल गरगरीत पाहिजेत. या उपपत्तीने एवढेच सांगावयाचे आहे की–

साधू हा बोधसंपन्न व निरपेक्ष पाहिजे. भगवद्गीतेत भक्तीचे लक्षण सांगताना हेच सांगितले आहे.

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ।। गी. १२।१६

अशा लक्षणांनी युक्त जे संत असतात त्यांचे मोचे, वाहाणा मी वागवीन असे नाथ महाराज सांगत आहेत.

संत जाती हरिकीर्तना । त्यांच्या वाहीन मोचे वाहाणा ।।१।।
आता संत हे कीर्तनाला जातात कुठे याचा विचार करू.
जेथे मिळे टका तेथे हालवी टिरी । हो बरो नव्हे सोरी ।।

जेथे मानमान्यता, पैसा मिळतो तेथे जात नाहीत. तेथे जाणारी ही सोरी बरी नव्हे, मग संत कुठे कीर्तनाला जातात ? देवाकडे जातात अगर संताच्या सभेत, वैष्णवांच्या मेळाव्यात जातात.

मज ईश्वराचेनि लोभें । हे गीता पढतां अक्षोभें ।
जो मंडन होय सभे । संतांचिये ।। ज्ञा. १८।१५१७

बिदागीच्या लोभाने नाही तर, ईश्वराच्या लोभाने चित्ताची गडबड होऊ न देता, अहंकाररहित होऊन संत समुदायात जातात. तेथे तो संतांच्या सभेचा मंडण होतो

तो भक्तजनांच्या समुदायात गीता सांगतो. बगीच्यात वसंतऋतूने प्रवेश केल्यावर झाडांना कोवळी कोवळी पाने फुटतात, तसेच वाऱ्याने झाडाच्या फांद्या, पाने हालतात, व सुगंधाने फुले जशी डबडबतात, त्याप्रमाणे हा संतरूपी वसंत भक्तरूपी बगीच्यात येऊन गीता सांगतो. त्या वेळी भक्तांच्या (श्रोत्यांच्या) अंगावर रोमांच उभे राहतात. वाऱ्याच्या स्पर्शाने झाडे डोलतात, त्याप्रमाणे झालेल्या आतल्या आनंदाने शरीर डोलते, फुले मकरंदाने दरवळतात, त्याप्रमाणे आनंदाच्या अश्रूंनी डोळे भरून येतात.

नवपल्लवीं रोमांचितु । मंदानिळें कांपवितु ।
आमोदजळें बोलवितु । फुलाचे डोळे ॥ ज्ञा. १८।१५१८

कोकिळ पक्ष्याच्या पंचम स्वराप्रमाणे धन्यतेचे उद्‌गार बोलावयास लावतो असा हा भक्तरूपी बगीच्यात गीता व्याख्यातारूपी वसंत आहे.

कोकिळ कलरवाचेनि मिषें । सद्‌गद बोलवीत जैसें ।
वसंत का प्रवेशे । मद्‌भक्त आरामीं ॥ ज्ञा. १८।१५१९

अथवा आकाशात चंद्रोदय का झाला म्हणजे चकोराला जन्म सफळ झाला असे वाटते, त्याप्रमाणे त्याच्या व्याख्यानाने भक्तरूपी चकोरांना जन्म सफळ झाल्यासारखा वाटतो.

कां जन्माचें फळ चकोरां । होतु चंद्र ये अंबरा ।
नाना नवघन मयूरां । वो देत पावे ॥ ज्ञा. १८।१५२०
तैसा सज्जनांच्या मेळापीं । गीतापद्यरत्नीं उमपीं ।
वर्षे जो माझ्या रूपीं । हेतु ठेऊनि ॥ १८।१५२१

कीर्तन कोणी करावे आणि कीर्तन कोणाला ऐकवावे हे सांगतो.

सविवेक नैराश्य वक्ता । जोडल्या श्रद्धेने ऐकावी कथा ।
कां सज्ञान मौनलिया श्रोता । स्वयें कथा सांगावी ॥ भा. ११।७२७

कीर्तन कोणाचे कसे करावे ते गीता सांगते. कीर्तन देवाचे करावे.

सततं कीर्तयन्तो मां यतंतश्च दृढव्रताः ।
नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ गी. ९।१४

मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे ।
परि दुजेपण मनोधर्में । शिवतलें नाहीं ।। ज्ञा. ९।१९५
ऐसें मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा । ज्ञा. ९।१९६

कीर्तन कसे करावे ते सांगतात.

सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं ।।१।। ए. १६७५
संतसंगें अंतरंगें नाम बोलावें । कीर्तनरंगीं देवासन्निध सुखें डोलावें ।।
भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या ।
प्रेमभरें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ।। ३ ।।
जेणें करुनी मूर्ति ठसावी अंतरीं श्रीहरीची ।
ऐसी कीर्तनमर्यादा आहे संतांच्या घरची ।।४।।
अद्वय भजनें अखंड स्मरणें वाजवीं करटाळी ।
एका जनार्दनी मुक्य होय तत्काळीं ।।५।। १६७५ एकनाथ म. अ.
रामकृष्ण हरि गोविंद । ऐशिया नामाचे प्रबंध ।
गातां नाना पदें छंद बंद । करावा विनोद कीर्तनीं ।। भा. ११।७२९
कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखळ प्रबंध ।
माजि आत्मचर्चा विशद । उदंड गाती ।। ज्ञा. ९।२१०
जेणे आत्मतत्त्व जोडे जोडी । ऐशिया पदांची घडामोडीं ।
कीर्तनीं गावी आवडीं । संत परवडी वैसवूनी ।। भा. ११।७३०
श्रुती मृदंग टाळ घोळ । मेळवूनि वैष्णवांचा मेळ ।
कीर्तनीं करावा गदारोळ । काळ वेळ न म्हणावी ।। भा. ११।७३१

अशाच ठिकाणी संत कीर्तनाला जातात.

संतभार पंढरींत । कीर्तनाचा गजर होत ।। १ ।।
तेथें असे देव उभा ।। जनाबाई ।। अ. १७७

आतां संतांचे मोचे, वाहाणा वागवावयाच्या कशाकरता ?
ते सांगतात, केवळ ज्ञानाच्या प्राप्तीकरताच ही सेवा करतात—
तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ।। गी. ४।३४

तें ज्ञान पैं गा बरवे । जरी मनीं आथि आणावें ।
तरी संता यां भजावें । सर्वस्वेंशीं ।। ज्ञा. ४।१६५

ब्रह्मज्ञान सहजासहजी प्राप्त होणारे नाही.

ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठी । तरि कां हिंपुटीं वेदशास्त्रें ।। २२४९
शास्त्रांचें भांडण तप तीर्थाटन । उर्वीचें भ्रमण याजसाठीं ।। २२४९
याजसाठीं जप याजसाठीं तप । व्यासेंही अमूप ग्रंथ केले ।। २२४९
याजसाठी संतपाय हे सेवावे । तरिच तरावें तुका म्हणे ।। २२४९
देईल गुरु सेवा । इया बुद्धि पांडवा ।
जन्माचा सांडोवा । टाकित जे ।। ज्ञा. १३।१६७

संतांची सेवा केली पाहिजे. कारण ज्ञानाचा साठा त्यांच्याकडेच असता.

जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंटा ।
तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ।। ज्ञा. ४।१६६
घरात रिघावे दाराचिये सोयी । भिंती डोई फोडू नये ।।

संत हे ज्ञानाचे घर आहेत. आणि घरात प्रवेश करण्याकरता सेवा हा दरवाजा. द्वारातूनच घरात प्रवेश होईल.

महत्सेवां द्वारमाहुर्विमुक्तेः ।
भ्रमणा पाउलें वेचिताती वाव । प्रवेशाचा ठाव एका द्वारें ।। तु.३३६७
नगर भ्रमतां जन्म जावो । परि प्रवेशु एकया द्वारे रे ।। ज्ञा. अ. ५५९
तरी तनु मनु जीवें । चरणासीं लागावें ।
आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ।। ज्ञा. ४।१६७

कायेने, वाचेने, मनाने अभिमानरहित होऊन सेवा केली पाहिजे.

आता हे ज्ञान कोणते ? ज्ञान पुष्कळ प्रकारचे आहे. ज्या ज्ञानाने आपल्याला, आत्मस्वरूपाला देहाहून भिन्न करून जाणता येते, असे हे ज्ञान आहे. ते ज्ञान प्राप्त होण्याकरिता सेवा केली पाहिजे. मनुष्यमात्र कोणी का असेना, त्याने आपल्या आत्म्याला देहाहून भिन्न ओळखले पाहिजे. क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचे अंतर जाणले पाहिजे. आत्मा हा देहाहून भिन्न आहे.

तया देहा म्हणती भेटी । हे सपायी निर्जिव गोठीं ।
वारिया वाळुवे गांठी । कें हो आहे ।। ज्ञा. १३।१०९७
एक निघे पूर्वेकडे । एक ते पश्चिमेकडे ।
तिये भेटीचेनि पाडें । संबंध हा ।। ज्ञा. १३।१०९९
उजियेडा आणि अंधारेया । जो पाडु मृता उभया ।
तोचि गा आत्मया । देहा जाण ।। ज्ञा. १३।११०

याप्रमाणे प्रत्येकाने आत्म्याला देहाहून भिन्न जाणले पाहिजे.

हे कशाकरता जाणले पाहिजे तर देहाला 'मी' असे समजणे महा-पाप आहे. आपण देहालाच आत्मा समजतो.

उपजोनी संसारी आपुला आपण वैरी । मी माझे शरीरी घेऊनि ठेला ।
या देहातें म्हणे मी पुत्र दारा धन माझें ।
परि काळाचें हे खाजें ऐसें नेणतु गेला ।।१।। ज्ञा. अ. ५१८
जें देहखंडा नाम आत्मा । ईश्वर पाषाण प्रतिमा ।
यया परौती प्रभा । ढळों नेणें ।। ज्ञा. १८।५६७
जे देहचि आपणपें मानिती । आणि विषयांते भोग्य म्हणती ।
या परतें न स्मरती । आणिक कांहीं ।। ज्ञा. ३।१२७

देहच आपण आहोत असे समजणे हे महापाप आहे.

मी देहीं म्हणतां ब्रह्महत्या कोटी । येऊनियां पाठी थापटिती ।। ज्ञा.९४६

जीवानें देहाचा अभिमान घेतल्याने त्याला कोटयवधी ब्राह्मण मारल्याचे पाप लागते. एवढयावरच संपले असते तरी बरे झाले असते.

ब्रह्महत्यादी पातक करणाऱ्यास शास्त्रानें प्रायश्चित सांगितले आहे.

कोटी ब्रह्महत्या गोहत्यांसी । प्रायश्चित आहे शास्त्रार्थेंसी ।

ब्रह्महत्येच्या पातकातून साधारण प्रायश्चित्ताने मुक्त होता येते. वाल्मिक हा ब्रह्महत्येच्या पापातून साधारण प्रायश्चित्त घेऊन मुक्त झाला. पण ज्ञानेश्वर महाराज म्हणतात—

जया देहसंबंधा आतु । प्रतिपदी आत्मघातु ।
भुंजतां उसंतु कहींच नाहीं ।। ज्ञा. १८।१२७६

एखाद्याने जर विचारले तुम्ही कोण ? तर आपल्या देहावर हात मारतो. हा देहाभिमान मोठा दुष्ट आहे.

करवितो आत्महत्या । नेदी सत्या आतळा ।। ३५८१

तात्पर्य देहाला मी म्हणण्यात पदोपदी आत्महत्या घडते.

परी आत्महत्या घडे ज्यासी । प्रायश्चित्त त्यासी असेना

—भा. २०।१९०

आत्महत्येला प्रायश्चित्त का नाही ?

जो आत्महत्या करून निमाला । तो मरतांचि नरकासि गेला ।।
प्रायचित्तासि कोण आहे उरला । मा शास्त्रार्थ बोला बोलावे ।।

भा. २०।१९१

प्रायश्चित्त त्याच्या मुडद्याला का द्यावे ? या उपपत्तीने हेच सांगावयाचे की देह मी आहे असे म्हणणे ते महापाप आहे. म्हणून आत्म्याला देहाहून भिन्न जाणले पाहिजे. आत्मा देहादिकाहून भिन्न कसा आहे ?

संसर्गे चेष्टिजे लोहें । परि लोह भ्रामक नोहे ।
क्षेत्र क्षेत्रज्ञा आहे । तेतुला पाडु ।। ज्ञा. १३।११३२

लोहचुंबकाच्या सान्निध्यानें-संसर्गाने लोखंड चलन-वलन पावते; परंतु लोहचुंबक लोखंडाच्या संसर्गाने लोखंड होत नाही.

भ्रामकाचेनि संगें । जैसें लोहो वेढा रिगे ।
तैसीं ईश्वरसत्तायोगें । चेष्टती भूतें ।। ज्ञा. १८।१३११

ईश्वराच्या सत्तेने प्राणिमात्राच्या चेष्टा होतात.

चालें हें शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवितें हरीविण ।। ३३३९
आतां असंगा साक्षिभूता । देहीं चैतन्याची जे सत्ता ।
तियें नाम पांडुसुता । चेतना येथे ।। ज्ञा. १३।१३४
जे नखौनि केशवरी । उभी जागे शरीरीं ।
जे तिहीं अवस्थांतरीं । पालटेना ।। ज्ञा. १३।१३५
देखवी ऐकवी एक नारायण । तयाचें भजन चुकों नको ।। ३३३९

चैतन्याची सत्ता निघून गेली की, देहाचा झाला मडदा.

दीपकाची अर्ची । राहाटी वाहे घरींची ।
परीं वेगळीक कोडीची । दीपा आणि घरा ॥ १३।११३३

रात्रौ घरात दिवा लावलेला असता. त्याच्या प्रकाशाने घरातील सर्व कामे होतात. परंतु दिव्यात व घरात किती तरी अंतर आहे? दिवा आहे प्रकाशक व घर आणि घरातील पदार्थ आहेत प्रकाश्य.

एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा । प्रकाशकु क्षेत्राभासा ।
यावरुतें हें न पुसा । शंका नेघा ॥ ज्ञा. १३।११२७

जेवढा म्हणून क्षेत्राचा आभास आहे. तेवढयाचा हा आहे प्रकाशक.

यावरून असे कळून आले असेल की– क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यात महद् अंतर आहे.

क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचे अंतर कळले पाहिजे. ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायाचे शेवटी या दोहोंमधील अंतर सांगितलेले आहे. ते अंतर कळावे म्हणून असे उपाय करावे लागतात.

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।
भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ गी. १३।३४

शब्दतत्त्वसारज्ञा । पैं देखणी तेचि प्रज्ञा ।
जे क्षेत्रा क्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥ ज्ञा. १३।११२८

'देखणी प्रज्ञा' तीच कीं– क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातील अंतर जाणते. तीच बुद्धी डोळस आहे. श्रोत्यात दोन प्रकार असतात; एक श्वानमुखी श्रोता असतो. दुसरा व्याघ्रमुखी श्रोता असतो. वक्त्याच्या मुखातून निघालेले शब्द चघळणारा हा श्वानमुखी श्रोता आहे. शब्द न चघळता त्यातील अर्थाला झोंबणारा व्याघ्रमुखी श्रोता असतो. अर्जुन हा व्याघ्रमुखी श्रोता म्हणून अर्जुनाला उद्देशून भगवान त्याला 'शब्दतत्त्वसारज्ञा' म्हणतात.

आहाच बोलाची वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचियाची आंगा घडिजे ।
मग सुखेंसी सुखाडिजे । सुखाचि माजि ॥ ज्ञा. ६।२५

असे श्रोते फार थोडे असतात. ज्या बुद्धीला शरीर आणि आत्मा यामधील अंतर कळते तिला कुशाग्र, डोळस बुद्धी म्हणतात.

ह्या दोहींचें अंतर । देखावया चतुर ।
ज्ञानियांचें द्वार । आराधिती ॥ ज्ञा. १३।११२९

शरीर व आत्मा या दोहोंतले अंतर कळावे म्हणून साधक ज्ञानी पुरुषाची सेवा करतात. याच ज्ञानाकरता साधक गुरूच्या द्वारात पडून राहतात.

याचिलागीं सुमती । जोडिती शांती संपत्ती ।
शास्त्रांची दुभती । पोसिती घरीं ॥ ज्ञा. १३।११३०
योगाचिया आकाशा । वळंघिजे येवढाचि धिवसा ।
ज्ञानियाची आशा । पुरुषासी गा ॥ ज्ञा. १३।११३१

योगासारखे कष्टप्रद, खडतर साधन क्षेत्र क्षेत्रज्ञ यातील अंतर कळण्याकरता करतात. ही साधने कठीण आहेत.

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ गी. १२।५

अष्टांगयोगीं दुर्जयो पवन । सर्वथा साधेना जाण ।
साधला तरी नागवण । अनिवार जाण सिद्धींची ॥ भा. १२।४७

नागिणि उत्साहे नवहि द्वारें निरोधून । नाडित्रयामाजि सुषुम्ना संचरण ।
न साधे हा मार्ग ऐसे बोलती मुनिजन । नरहरिचिंतनें अहर्निशि मुक्तिस्थान ॥
ज्ञा. अ. १८९

मोडिसि करचरण तेणें पावसी अंत समो ।
मोहो तृष्णा न तुटे ब्रह्मविद्या केंवि गमो ।
मोठा हा अन्यावो जे हरिचरणीं नाहीं नमो ।
मोक्षाची चाड तरी मुकुंदीं मन रमो ॥ ज्ञा. अ. १८९
जया ज्ञानालागीं । गगन गिळिताती योगी ।
स्वर्गाची आडवगीं । उमरडोनि ॥ ज्ञा. १३।१६२

ज्या ज्ञानाकरिता योगी स्वर्गाचा त्याग करून मूर्ध्निआकाशाचा लय करतात,

न करिती सिद्धीची चाड । न धरिती ऋद्धीची भीड ।

योगाऐसें दुवाड । हेळसिती ॥ ज्ञा. १३।१६३

ज्या ज्ञानाकरिता योगी सिद्धीची इच्छा करीत नाही, ऐश्वर्याची पर्वा करीत नाही, योगासारखी कष्टसाध्य गोष्ट तुच्छ मानतो.

नाना भजन मार्गीं । धांवत उघडिया आगी ।

एक रिगताति सुरगीं । सुषुम्नेचिये ॥ ज्ञा. १३।१६५

ज्या ज्ञानाकरिता भजनमार्गाने धावतात, कित्येक सुषुम्नेच्या भुयारात शिरतात.

देईल गुरुसेवा । इया बुद्धि पांडवा ।

जन्माचा सांडोवा । टाकित जे ॥ ज्ञा. १३।१६७

गुरुसेवेने हे ज्ञान प्राप्त होईल या बुद्धीने गुरुच्या सेवेवरुन आपला जन्म ओवाळून टाकतात. जन्मभर गुरुसेवा करतात.

शरीरादि समस्त । मानिताति तृणवत ।

जीवें संतांचें होत । वाहणघरू ॥ ज्ञा. १३।११३२

म्हणून नाथ महाराज म्हणतात–

संत जाती हरिकीर्तना । त्यांच्या वाहीन मोचे वाहाणा ॥ १ ॥

शरीराहून आत्मा फारच भिन्न आहे, हे समजण्याकरता देहादी सर्व प्रपंच गवतासारखा समजतात. जिवाभावाने संतांचे जोडे, वाहाणा वागवणारे होतात.

एकदा महामुनी नारद सत्यभामेकडे आले. सत्यभामेने त्यांचे पादप्रक्षालन करून पूजा केली. त्यांना आदराने आसनावर बसविले व विचारले की,

कृष्ण सर्वांगीं सुंदर । लावण्य गुणरत्नाकर ॥

सत्यभामा म्हणे हा वर । जन्मोजन्मीं पावावा ॥ २ ॥

याकरिता उपाय, दान, तप, व्रत, काय ते ते सांगा. नारदाने ओळखले की, भगवंताचे यथार्थ स्वरूपास ही मिळाली नाही.

पाहूनि अधिकाराचा भेदु । तैसाचि उपदेश करिती साधु ॥
इचा असे गर्व मदु । तैसा विनोद करू आजी ॥ ए. अ. ३४०१.

नारद सत्यभामेला म्हणाले—

जरी हा कृष्ण दानासी देसी । तरी जन्मोजन्मी पावसी ॥
हें जरी मानेल मानसीं । तरी कृष्ण दानासी तूं देई ॥ ९

त्यावर सत्यभामा भगवान श्रीकृष्णाकडे गेली व म्हणाली,

सत्यभामा म्हणे कृष्णासी । तुम्हांसी देईन दानासी ।
हें जरी मानेल मानसीं । तरी आज्ञा मज द्यावी ॥ १०

भगवान मनात हसले. नारदाने विदान मांडले हे ओळखले व " धन्य भावो प्रिये तुझा " म्हटले.

दाना न करी वो उशीरू । आजिचा पर्वकाळ थोरू ।
शुद्ध सप्तमी रविवारू । मकरीं सूर्यो गुरुयुक्त ॥ १३ ॥

सत्यभामा ब्राह्मणांना भगवान श्रीकृष्ण दानाला घ्या म्हणून विचारू लागली. त्यांनी दानाला नाकारले.

सत्यभामा म्हणे नारदासी । ब्राह्मण दान न घेती कृष्णासी ।
काय करूं वो देवऋषी । तूं दानासी अंगीकारी ॥
येरी म्हणे प्रतिग्रहिताम । प्रति गृण्हामि नारद म्हणतां ।
नमामी म्हणोनि कृष्णनाथा । मग संकल्प घातला ॥ २३
पैल माझिया सिद्ध पादुका । सावधानें जवळी घे कां ।
येरे वंदिलिया मस्तका । ब्राह्मणाच्या म्हणवूनी ॥ २५
कृष्णें केलें नारदाचे चरणक्षालन । तें तीर्थ मुखीं मस्तकीं वंदून ।
हृदयी धरिलें आलिंगून । श्रीवत्सलांच्छनाहूनी आध ॥ ३४
कृष्ण चुरी नारदाचे चरण । म्हणे मी आजी धन्य धन्य ।
तुम्हांसी दिधले दान । परम पावन मी झालों ॥ ३६. ए. अ. ३४०६
म्हणोनि गा नमस्कारूं । तयाते आम्ही माथां मुकुट करूं ।
तयाची टांच धरूं । हृदयी आम्ही ॥ ज्ञा. १२।२२१

एवढा मोठा योगयोगेश्वर भगवान, पण

सेवकाच्या शिरीं । धरूनी चाले पादुका ।। तु. ७२६

सत्यभामा दान करी । उजुर नाही अंगिकारी ।

म्हणून नाथ महाराज म्हणतात, आम्हाला मोचे, वाहाणा वागविणे इष्टच आहे. हे रूपकाने वर्णन केले आहे. याचे रहस्य नाथ महाराज म्हणतात– मी संतांचा सेवक होईन, संतांची सेवा करीन.

आज्ञा पाळणें ते सेवा । भय धरोनिया जीवा ।

तुका म्हणे ठेवा । ठेविला तो जतन ।। ४ ।। ३५७८

संतांच्या आज्ञेपुढें तो आपले जीवित कःपदार्थ समजतो.

वचन न मोडी बोलिलें तें ।। तु. २२८७

म्हणून आपणही संतसेवा करावी. संत आपल्याला काय आज्ञा करतात ?

आम्ही तेणें सुखी । म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ।। १ ।।

तुमचें येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ।। २ ।।

कंठी मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ।। ३ ।।

म्हणवा हरिचे दास । तुका म्हणे मज हे आस ।। ४ ।। ६४५

तेच आपण करावे.

( जय विठ्ठल जय विठ्ठल )

# उठाउठी अभिमान

उठाउठी अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ।। १ ।।
तें या पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ।। २ ।।
नेत्रीं अश्रूचिया धारा । कोठें रोमांच शरीरा ।। ३ ।।
तुका म्हणे काला । कोठें अभेद देखिला ।। ४ ।।

**उपोद्घात** :– देहाभिमानाचा नाश अथवा निवृत्ती मनुष्यमात्रांना अपेक्षणीय आहे. कारण देहाभिमान सर्व अनर्थमूलक आहे. जीवाच्या मागे कोटयवधी अनर्थ लागलेले दिसतात, ते केवळ देहाभिमानामुळे. तापामुळें अंग ठणकते, डोके दुखते, भूक लागत नाही, जिव्हेची चवी जाते. या सर्व विकारांना कारण एक ताप आहे. त्या सर्व विकारांची निवृत्ती एका तापाच्या निवृत्तीत होते. त्याप्रमाणे कोटयवधी अनर्थाला कारण देहाभिमान आहे. केवळ देहाभिमानामुळे कोटयवधी अनर्थ कसे लागले ते सप्रमाण व सोपपत्तिक रीतीने भावार्थानंतर सांगणार आहे. तूर्त एवढेच सांगतो की सर्व अनर्थ निवृत्ती होण्यासाठी देहाभिमानाची निवृत्ती आहे सर्वांना अपेक्षणीय. देहाभिमानाला घालवले पाहिजे. प्रश्न असा येतो की– कोणत्या साधनाचे आचरण केले असता देहाभिमान जाईल असे ठिकाण कोणते आहे की जेथे तो त्वरित जातो. एक म्हण आहे दुखणे येते हत्तीच्या पायाने, आणि जाते ते मुंगीच्या पायाने. ते हळूहळू जावयास नको. त्वरित जाण्याचे ठिकाण, साधन कोणते ते कीर्तनाला घेतलेल्या या अभंगाच्या प्रथम चरणात तुकाराम महाराज सांगतात.

उठाउठी अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ।। १ ।।

तावडतोब अभिमान जाईल अशी जागा कोणती आहे, ते या जगात कुठे आहे, ते अभंगाच्या दुसऱ्या चरणात सांगतात.

तें या पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ॥ २ ॥

अभिमान त्वरित जाईल अशी जागा पंढरीत आहे. कसला का दुष्ट असेना, तो पंढरीला आला, त्याने तो सोहळा का पाहिला, मग तो किती का नास्तिक असेना, त्याच्या अंतःकरणाला प्रेमाचा पाझर फुटतो.

तुका म्हणे खळ । होती क्षणेंचि निर्मळ ।
जाऊनियां मळ । वाळवंटीं नाचती ॥ तु. ७६७

खळाच्या अंतःकरणाला पाझर फुटतो. पण खळ म्हणायचे कुणाला ? त्याचे लक्षण तरी काय आहे ? कुणा एका बाईला मूल होईना. तिने पुष्कळ नवस-सायास केले. पिंपळाचे पार झिजवले. गणपतीला प्रदक्षिणा घातल्या. परंतु मूल होईना. वांझ म्हणून तिचा डांगोरा पिटला गेला. पुढे दैववशात् त्या बाईला गर्भ संभवला. प्रसूत झाली. अती वेदना झाल्या. तिने त्या प्रसूतीकालाच्या झालेल्या सर्व वेदना बाजूला ठेवून " बघ काय आहे ? मुलगी का मुलगा ? सुइणीने सांगितले, मुलगा झाला. हे ऐकून तिला मोठा आनंद झाला. पण ते मूल असे दिग्विजयी निघाले की,

देखोनि हरखली अंड । पुत्र झाला म्हणे रांड ।
तंव तो झाला भांड । चहाड चोरटा शिंदळ ॥ तु. २९७३

सकळगुणसंपन्न निघाला छीनालकी करणारा एक नंबरचा

जाय तिकडे पीडी लोकां । जोडी भांडवल थुंका ।
थोर झाला चुका । वर कां नाहीं घातली ॥ २ ॥ तु. २९७३

जिकडे जाईल तिकडे दुःख होई. लोकांची नुकसान करायची. कोणीही त्याच्या अंगावर थुंकणारच. महाराज म्हणतात त्या बाईने अशा मुलाला ठेवले कशाला ! पण तिला काय ठाऊकी की पुढे मूल असे निघणार ! पण डोहाळ्यांवरून पुढे मूल कसे निघणार हे कळते.

गर्भाचे आवडी मातेचा डोहळा ।
तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥ तु. ३९५२

डोहाळे वाईट–साईट झाले असतील. तेव्हा डोहाळ्यांवरून कळायला पाहिजे होते.

भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें ।
बोले निष्ठुर उत्तरें । पापदृष्टि मळिण चित्त ।। तु. २९७३
दुराचारी तो चांडाळ । पाप सांगातें विटाळ ।
तुका म्हणे खळ । म्हणोनियां निषिद्ध तो ।। तु. २९७३

ही खळाची व्याख्या झाली. असा खळ का असेना, पण त्याच्या अंतःकरणाला पाझर फुटलाच पाहिजे. ते या पंढरीत घडते. एक दुष्ट होता. जन्मभर लोकांना त्याने दुःख दिले, घरे जाळली, बायका पळविल्या, कुणाला सुख दिले नाही. मरण जवळ आले. मग ते केलेले कर्म जवळ येऊन उभे राहिले. जन्मभर कोणाला सुख दिले नाही, तेव्हा लोक म्हणतात– बरे झाले मेला. जन्मभर दुःख दिले म्हणून कोणी रडत नाही. कोणाला दुःखही वाटायचे नाही. मग मेल्यानंतर चांगले तरी कशाला म्हणून घ्यायला पाहिजे ? आता आपला प्राण जाणार, तेव्हा तो वर पाय करून मेला. लोकांना हे कळले. पण आपणहून कोण येते ? त्याला जाळले हे पाहिजे. नाही तर दुर्गंधी सुटेल. प्रेत पाहिले तर डोके खाली, वर पाय ते प्रेत ताठले गेले. ते नीट बांधता येईना. पाय वरच राहिले. ते सरळ करावे कसे ? पाय खाली करावे तर बसल्याप्रमाणे होई. एकाने पाय धरले पण सरळ काही होईना. लोक म्हणाले, मेला तोही सरळ मेला नाही.

असा जरी खळ असला तरी तो पंढरीत आल्यावर, त्याने तो सोहळा पाहिला की, त्याच्या अंतःकरणाला पाझर फुटला पाहिजे. ही झाली अनिष्ट निवृत्ती.

अष्ट सात्त्विक भावाने, सर्व अंगावर रोमांच उभे राहतात. अशी अवस्था पंढरी सोडून दुसरीकडे कोठे होते सांगा. प्रयागात होते असे कोणी म्हणेल ! तेथे मुंडणाचे मोठे महत्त्व आहे. तेथे जितके केस पडतील तितके पुण्य अधिक. म्हणून अंगाचेही केस काढतात. काशी हिंडे, प्रयाग मुंडे, गया दंडे. यात्रेकरू त्रास्त आणि न्हावी थोडे अशी स्थिती असते. म्हशी भादरल्याप्रमाणे

ही अवस्था प्रयागात होते. पण पंढरीप्रमाणे आनंद झाला म्हणून नाही. ती अवस्था प्रयागात दुःखाने. अश्रू व रोमांच दुःखाचे, पंढरीत जे रोमांच आणि अश्रू असतात ते आनंदाचे असतात.

नेत्रीं जळ वाहो सदां । आनंदाचे रोमांच ॥ तु. ११९०

दुःखाचे अश्रू कढत असतात. प्रेमाचे, आनंदाचे थंड असतात. अभंगाच्या तिसऱ्या कडव्यात महाराज म्हणतात, सांगा, पंढरी सोडून अशी अवस्था दुसरीकडे कोठे होते ?

नेत्रीं अश्रूचिया धारा । कोठें रोमांच शरीरा ॥ ३ ॥

अभंगाच्या शेवटच्या कडव्यात महाराज म्हणतात, जीव परमात्म्याचा एकतेचा काला पंढरी सोडून कोठे आहे ते सांगा.

तुका म्हणे काला । कोठें अभेद देखिला ॥ ४ ॥

जीव परमात्म्याचे ऐक्य हा अभेद. काला पंढरी सोडून कोठे व्हायचा नाही. स्वर्गलोक, सत्यलोकात तर नाहीच.

तुका म्हणे काला वैकुंठीं दुर्लभ । विशेष हा लाभ संतसंगें ॥ तु. २५८०

स्वर्गलोकात नाही. जर स्वर्गात मिळता तर–

आजी ओस अमरावती । काला पाहावया येती ।
देव विसरती । देहभाव आपुला ॥ १७३

असे तेथील देव का म्हणाले असते ? अमरावती सोडून देव काला पाहावयास कशाला आले असते !

आस करिती ब्रह्मादिक । देखोनि वाळवंटीचें सुख ।
धन्य धन्य मृत्युलोक । म्हणती भाग्याचा कैसा ॥ तु. २६५८

जीव परमात्मा यांचा एकतेचा काला सत्संगतीनेच होतो. ती सत्संगती पंढरीत घडते. म्हणून पंढरीस जावे.

## व्याख्यान

अभंगाच्या प्रथम कडव्याचा विचार सांगावयाचा तो असा– महाराज म्हणतात, त्वरित देहाभिमान जाण्याची जागा पंढरी ही आहे. पंढरीमध्ये गेले असता त्वरित देहाभिमान जातो.

प्रश्न असा की, देहाभिमान घालवायचा का ? देहाभिमानाने जीवाची अशी काय नुकसान केली की, त्याचा मुडदा पाडायचा ?

देहाभिमानामुळे काय नुकसान झाले, कोणकोणते अनर्थ भोगावे लागले, याची कल्पना यावी, एवढ्याकरता देह अभिमान घेण्यापूर्वी जीव कसा होता हे सांगितले पाहिजे. मग आता कसा आहे, देहाभिमानामुळे काय नुकसान झाले ते कळून येईल.

जीव अभिमान घेण्यापूर्वी आनंदघन, आनंदस्वरूप, दुःखसंबंधरहित होता. जीव मूळचा साक्षात परब्रह्म होता. हीच गोष्ट जगद्गुरु शंकराचार्य सांगतात.

श्लोकार्धेन प्रवक्षामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ।
ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ।।०।।

तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ।। तु. ३०२

तुका म्हणे कैंची कींव । कोठें जीव निराळा ।। तु. ४०५०

जीवाचे मूळचे स्वरूप परमात्मा आहे म्हणून तुकाराम महाराज कळकळीने सांगतात की–

देवचि बरे देवचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ।। तु. ३८७३

मूळचा परमात्मा नसता तर असा उपदेश केला नसता. एकवार नाही, द्विरुक्ती करतात. "आदरात् द्विरुक्तिः ।" तुम्ही देव आहात, तुम्ही देव आहात. जीव अभिमान घेण्यापूर्वीच साक्षात परमात्मा होता.

जो परमात्माचि परि दुसरा । जे अहंकार निद्रा निदसुरा ।
म्हणोनि स्वप्नाचिया वोरबारा ; संतोषें शिणे ।। ज्ञा. ८।३५

... आहे असे सांगितले

जो नाइकिजतां नादु । जो असौरभ्या मकरंदु ।
जो आंगाथिला आनंदु । सुरतेंविण ।। ज्ञा. १५७४

जीव मूळचा आनंदस्वरूप आहे. आनंदी होण्याकरिता त्या आत्म्याला कोणत्या विषयात रत व्हावे लागत नाही. ब्रह्म आतमस्वरूप नसते तर विषयापासून आनंद होतो तो कुणाचा ? परमात्म्याचाच आनंद आहे.

पुरणाची पोळी, जिलबी, लाडू या पक्वान्नामध्ये गोडी जी दिसते ती गुळाचीच असते. गुळाची गोडी घेऊनच ते सर्व पदार्थ गोड झाले आहेत.

नाना पक्वान्नें परवडी । गुळाच्या गोडीया ते चवी गाढी ।
तेवीं विषयांची जे जे आवडी । ते ते गोडी निजानंदे ।। भा. ३।४४५

परमात्मा आनंदाचा साठा आहे. विषयात आनंद खिळून राहिला तो परमात्म्याचाच आहे. शहरातून, घरोघरी पाणी तोटयांतून येते. ते कुठून येते ? पण ते तलावातून. तो का बंद झाला की संपले. विषयांच्या तोटयांतून आनंद बाहेर पडतो, तो परमात्म्याचा आहे. म्हणून तो आनदाचा सागर आहे. परमात्मा जर आनंदरूप नसता तर सुषुप्तीत आनंद अनुभवाला आला नसता. गाढ झोपेत कुठचा विषय असतो ? गाढ झोपेत नाटक नाही, काही एक विषय नाही. आणि आनंद तर होतो. कशावरून ? जागा झाल्यावर झोपेत अनुभवलेल्या आनंदाची तो आठवण सांगतो. जागृतीत आनंद प्रत्यक्ष नाही. सुषुप्तीमध्ये अनुभवलेल्या आनंदाचो स्मृती आहे. स्मृती अनुभवलेल्या पदार्थाचीच होते. अननुभूत पदार्थाची स्मृती होणेच शक्य नाही.

ब्रह्म सुखरूप का ? तर तो निरतिशय प्रेमाचा विषय आहे.

इयमात्मा परानन्दः परप्रेमास्पदं यतः ।
मा न भूवं हि भूयांसमिति प्रेमात्यनीक्ष्यते ।।

ज्या अर्थी आत्मा परमप्रेमाचे स्थान आहे, त्या अर्थी तो परमानंदरूप आहे. प्रेमास्पद नसता तर आनंदरूप ठरला नसता सर्वांच्या निरुपचार प्रेमाचा विषय एक परमात्माच आहे.

आणि निरुपचारा प्रेमा । विषय होय जे प्रियोत्तमा ।
तें दुजें नव्हे कीं आत्मा । ऐसेंचि जाणावें ।। ज्ञा. १८।१३४६
तेथ प्रियाची परमसीमा । तो भेटे माऊली आत्मा ।। ज्ञा. १६।४४२

पुत्र मित्रापासून आत्म्यापर्यंत जे प्रेम दिसते, ते सर्वांचे सर्वांवर औपचारिक प्रेम, सहेतुक प्रेम असते. पिता– पुत्रमित्रांवर प्रेम करतो ते त्या पुत्राच्या मित्राकरता नसून आपल्या पुत्राकरिता त्या पुत्रमित्रांवर प्रेम करतो.

न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवत्यात्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति ।

न वा अरे जायायै कामाय जाया प्रिया भवत्यात्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति ।

न वा अरे पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया भवंत्यात्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवन्ति ।

सर्व सुखाचे आगर । बापरखुमादेविवर ।। ४ ।। ज्ञा. अ. १
आनंद अद्वय नित्य निराभय । जे कां निजध्येय योगियांचे ।। तु. ८२६
ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहममृतस्याव्ययस्य च ।
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ।। गी. १४।२७
यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति । भूमैव सुखं ।। छां. उ. ७।२३
ते ब्रह्म दुःखसंबंधरहित, संसारसंबंधरहित आहे.
न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वाऽभविता वा न भूयः ।।
गी. २।२०

अशा प्रकारचे ब्रह्म आहे.

उपाधि वेगळे तुम्ही निर्विकार ।
कांहींच संसार तुम्हां नाहीं ।। तु ३७६३

कार्यकारणरूपाने असणारी उपाधी त्याहून आपण भिन्न आहात. काहीच संसार तुम्हास नाहीं. परमात्मा असंसारी म्हणजेच जन्ममरणधर्म-रहित आहे. तात्पर्य, ब्रह्म हे आनंदघन, संसार दुःखरहित आहे. जीवाचा

विचार चालला असता हा ब्रह्माचा विचार मध्येच सांगितला; कारण जीवाचे मूळचे स्वरूप ब्रह्म आहे. जीव हा मूळचा जन्मक्षयातीत, आनंदघन आहे. त्याला प्रमाण आहे काय ? जीवात्मा हा जन्मक्षयातीत आहे.

जीव न देखें मरण । धरी नवी सांडी जीर्ण ।
संचित प्रमाण । भोग शुभअशुभासी । तेथें काय मी ते माझे ॥ धृ. ॥
तु. ३८८१

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृण्हाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥
गी. २।२२

जो सर्वदा नित्यतृप्तु । अंतःकरणभरितु ।
परी विषयामाजि पतितु । जेणें संगें कीजे ॥ ज्ञा. २।२९२

जीवाला मरण नाही म्हणून जन्म नाही. मरणाच्या निषेधात जन्माचा सहजच निषेध होतो. जीव देहाभिमान घेण्यापूर्वी मूळचा जन्मक्षयातीत, आनंद स्वरूप होता; पण प्रस्तुत जीवाकडे पाहिले तर असे दिसून येते की सुखाकरिता इकडे तिकडे तोंड खुपसतो जा रंडीकडे, जा नाटकाकडे, हा असा का तोंड खुपसू लागला ? त्याची आनंदरूपता कोणी नेली ?

केवळ देहाभिमानामुळे मूळचा आनंद अनुभवाला येईनासा झाला. म्हणून त्याला इकडे तिकडे तोंड खुपसावे लागते; पण मरेपर्यंत सुखाचा लेश कुठे सुद्धा मिळत नाही.

सर्व सुखाचिया आशा जन्म गेला । क्षण एक मुक्तीयत्न नाहीं केला ।
हिंडता दिशा सीण पावला । माया वेष्टीला जीव माझा ॥ ० ॥
माझें स्वहित नेणती कोणी ॥ धृ. ॥ तु. ६९४

कुठे सुखाचा लेश मिळत नाही. मग मूळची सुखरूपता कुठे गेली ? भागवतकार सांगतात –

जीवाने देहाभिमान घेतल्यामुळे मूळच्या आनंदाला मुकावे लागले.
अहंकारकृतं बंधम् ॥ भा. ११।२९
शुद्धीं अहंकार अळुमाळ । उठतां शुद्धासि करी शबळ ।
तेणें देहयोगें धरिल्या बळ । करी तत्काळ विपरीत ॥ ११।२९।३२

ज्या स्वरूपात ना " इदं " ना " अहं " स्फुरण, स्थिर, शांत, निर्धर्म तेथे सूक्ष्म अभिमान निर्माण झाला.

" इदं " तेंहि वाळलें । जें 'मी' पणें वीण डाहारले ॥ ज्ञा. १५।४।६७

अशा निर्धर्म स्वरूपाच्या ठिकाणी " मी " असे स्फुरण स्फुरले. " मी" कोण असा विचार करता करता साडेतीन हाताचा (देह) मी समजू लागला.

अहंकार खवळल्या जाण । करी आनंदाचें आवरण ।
बुडे परमात्मस्फुर्तीचें स्फुरण । देहाचें मीपण वाढवी ॥भा॥ १३।२९।३३

देहाभिमान जीवाच्या निजानंदाला झाकण घालतो. अहंकार तमाचे कार्य आहे. सत्वाची बुद्धी असते. रजाचे मन असते, तमाचें कार्य अहंकार आहे. आपल्या आश्रित वस्तूवर भ्रम आवरण घालतो. जीवाला आनंद अनुभवाला येऊ देत नाहीं. देहाभिमान घेतल्यावर " अहं ब्रह्म " हे स्फुरण नष्ट होते.

जे बहुतां एका अवांतर । अहंकाराचा भूत संचार ।
जाहला म्हणोनि विसरु । आत्मबोधाचा ॥ ज्ञा. ७।१०३

देहाभिमानाने आनंदावर आवरण घातले. मग जीवाला विषयांकडे तोंड खुपसावे लागते. तो आवृत झाला, मग घाणेरड्या विषयांमध्ये दिवस काढावे लागतात.

जेवीं कुर्मीच्या पिलियां । चक्षुरामृतें तृप्ती तयां ।
तेंचि मातेसि चुकलिया । मग भुकेलिया कर्दम सेवी ॥ भा.१३।२९।३४

कासवीचे बाळ वाढे कृपादृष्टी। दुधा नाहीं भेटी अंग संगें ॥ तु.३५५८

कासवी आपल्या कृपादृष्टीने पिल्लांचे पोषण करते.

अगा मुखमेळेंविण । पिलियाचें पोषण ।
करी निरीक्षण । कूर्मी जेवीं ॥ ज्ञा. १३।१४०

कासवीचे पोर आपल्या आईला चुकले व त्याला भूक लागली की चिखलच खावा लागतो. आईला सोडून स्वैर भटकायला लागते.

तेवीं खुंटलिया आनंद अभिव्यक्ती । जीवासी वाढे विषयासक्ती ।
कामिनीकामापंगिरत होती । चिंता चितीं विषयांची भा.१३।२९।३५

विषय ओढीं भुलले जीव । आतां यांची कोण करील कींव ।
नुपजे नारायणीं भाव । पावोनी ठाव नरदेह ॥ तु. ७०१

जीव आनंदरूप असताना सुखाकरता घाणेरड्या विषयांचे सेवन करून त्याला दिवस काढावे लागतात. दुष्ट देहाभिमानामुळे जीवाची ही आनंदरूपता नेली. जीवाला जन्मावाचून जन्मावे लागते व मरणावाचून मरावे लागते ते एक वेळा जन्मावे लागते असे नाही.

किती वेळां जन्मा यावें । किती व्हावें फजीत ॥ तु. २००६

जन्ममरणाची ही अवदसा देहाभिमानामुळे जीवाच्या मागे लागली.

पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनम् ।
इह संसारे भवदुस्तारे कृपयाऽपारे पाहि मुरारे ॥

एका आड एक न लगे पुसावें । जेविल्या देखां मागें भुक ॥ तु. २०६९
उपजल्या पिंडा मरण सांगातें । मरतें उपजतां सवेंचि तें ॥ तु. ३६१०

जन्मक्षयातीत असणाऱ्या जीवाला अविश्रांत जन्ममरणाचे दुःख भोगावे लागते.

क्षण एक तोहि नाहीं विसावा । लक्ष चौऱ्यशीं घेतल्या धांवा ।
भोवंडिती पाठीं लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझ्या मी पणा ॥
तु. ७०७

रहाटगाड्याप्रमाणे जन्माला आला की मरावेच लागते. जन्माला आला गेला की "रामबोलो भाईराम आलेच," कर्म गाड्यांच्या गाड्या करून ठेवले म्हणून जन्मणार नाही म्हटले तरी जन्मणारच. वर्तमान शरीराला सोडले की दुसरे तयारच असते. गाढवाचे, घोड्याचे, कुत्र्याचे, डुकराचे हे का चांगले जन्म आहेत ?

पूर्वजन्मीं पाप केलें तें हें बहु विस्तारलें ।
विषयसुख नाशिवंत सेवितां तिमिर कोंदलें ।
चौऱ्याशीं लक्ष योनी फिरतां दुःख भोगिलें ।
ज्ञानदृष्टि हारपली दोन्ही नेत्र आंधळे ॥ ज्ञा. अ. ७४५

जन्ममरणापरते दुःख । अधिक कोण ते सांग पां ॥

जन्माला येण्याची सर्वांची एकच रीत आहे.

प्रथम केला गर्भीं वास । काय ते सांगावे सायास ।
दुःख भोगिले नवही मास । आलों जन्मास येथवरी ॥ तु. ७०७

जन्मकाली जन्माचे, बाल्यत्वात बाल्यावस्थेचे, म्हातारपणी वृद्धावस्थेचे, मरणकाळी मरणाचे असे दुःखच दुःख असते.

तेथ सकळ दुःखधामें । भुंजीजतीं जियें मृत्युजन्में ।
तिये दुर्गमेंचि सुगमें । होती तुज ॥ ज्ञा. १८।१२७०

सगळ्या दुःखाला राहण्याचे ठिकाण जन्म आणि मरण. असे दुःखप्रद जन्म-मरण भोगावे लागते. मुळात जीवाच्या स्वरूपी नसून भोगावे लागते. याला कारण देहाभिमान आहे. जन्ममरणाची परंपरा लागलेली प्रत्यक्ष दिसते. शास्त्र प्रमागाने सांगायला नको. जीव प्रत्यक्ष जन्माला येतो, मरतो हे आपण डोळ्यांनी पाहतो.

एक पाहतसां एकाचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे न व्हा ॥ तू. २७१५

तुम्ही पुष्कळांना जाळले असेल. पुष्कळांचे श्राद्धांत जेवला असाल :

आजा मेला पणजा मेला बाप मसणा नेला ।
देखत देखत नातु पणतु तोही वेडा जाला ॥ ज्ञा. अ. ९४
कहे तुका सब ही चलनार ।
एक रामबिन नहिं वोसार ॥ तु. ४४३
बाप माई लेखा नहिं । पीछें तूं ही चलनार ॥ तु. ४४५
पित्या देखतां पुत्र मरे । पुत्रा देखतां पिता झुरे ।
काळें काळ अवघेंचि सरे । कोणीही नुरे क्रियेसी ॥ भा. २८।२८५

याचा अर्थ माझ्यासारखे काळे रंगाचे सोडून जातील सर्वच जाणार असे समजू नका. कालांतराने महाप्रळयसमयी कोणी कुणाची उत्तरक्रिया करायची ? कुणाचा दिवस कोणी घालायचा, जीव सारखा जन्माला येतो व मरतो. तेव्हा ही परंपरा जी दिसते ती केवळ देहाभिमानामुळे. हे कसे ते प्रमाणाने सांगतो. जीवाने ब्रह्मरूपतेला विसरून देह मी असा अभिमान

घेतला की मग जन्माला भराभर वावणारे विकार वाढतात. असंसारी जीवाने देहअभिमान घेतला की, जन्मादी संसाराला वाढवणारे विकार कसे वाढतात जडतात ते भगवान अर्जुनाला सांगतात –

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।
सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ।। गी. ७।२७

तेचि आतां थोडीसी । गोठी सांगिजेल परियेसीं ।
जैं अहंकार तनूंसी । वालभ पडिलें ।। ज्ञा. ७।१६५

ही परंपरा लागण्याला काय झाले हे रूपकाने सांगतात –

अहंकार आणि तनू या दोघांचे प्रेम जुळले. यांचा प्रीतीविवाह झाला. याचे रहस्य परमात्मरूपतेला विसरला आणि देहाचा अभिमान घेतला. प्रीतीविवाह लागला म्हणजे एकमेक एकमेकाला विसरत नाही. हे झाले नवराबायको. यांना पोरसोर झाले का, वांझ राहिले. दुर्दैव त्यांचे, त्यांना पोरगी झाली. पोरगा झाला नाही. असे झाले म्हणजे नवराबायको नाक डोळे मोडतात झाली कारटी म्हणतात. सर्वच मुले झालीत तर मुले संसार कोणाबरोबर करणार ? दोन्ही पाहिजेत. त्यावाचून संसार कसा चालायचा ? 'सिंगल' राहून कसे चालेल. त्यांना मुलगी झाली पण ती कोणती ?

तैं इच्छा हे कुमारी जाली । मग ते कामाचिया तारुण्या आली ।
तेथ द्वेषेंसीं मांडिली । वराडिक ।। ज्ञा. ७।१६६

याचे रहस्य असे आहे की, जीवाने देहाचा अभिमान घेतला की विषयाच्या प्राप्तीची त्याला इच्छा होते. अभिमान घेतल्यावर परमात्मा स्वरूपाहून विषय, भिन्न दिसायला लागतात. व्यापक स्वरूपाला विसरला म्हणजे भिन्न नसता, विषय भिन्न दिसतात. मग त्यांच्या प्राप्तीची इच्छा होते. इच्छा मुलगी झाली. काम आहे तिचे तारुण्य. पुढे ती उपवर झाली, तिनं वर पाहिला, तिचे लग्न केले. वर कोणता ? द्वेष नावाचा विकार, त्याच्याशी लग्न झाले. त्याचा अर्थ क्रोधाबरोबर लग्न लागले. इच्छा वाढली. आणि इच्छेप्रमाणे गोष्ट घडली नाही. इच्छेच्या विरुद्ध घडली म्हणजे जो द्वेष उत्पन्न होतो, त्याला क्रोध म्हणतात.

आणि इच्छिलिया सांगडें। इंद्रियां आमिष न जोडे।
तेथ जोडे ऐसा जो डावो पडे। तोचि द्वेषु ॥ ज्ञा. १३।१२६

सोंगटया खेळत असताना दहा, सहा, दान पाहिजे. नाही तर सोंगटी नरकाला जाईल. मग डाव टाकणारा कवडया घेतो. दहा, सहा असे देवाचे नाम घेत करीत डाव टाकतो. इच्छेविरुद्ध बारा पडले की हात आपटतो. काय त्याच्या घराला आग झाली, काय नुकसान झाले. हात आपटतो याचे नाव क्रोध. कामाच्या अपूर्णतेत क्रोधाची उत्पत्ती. हेच रूपकाने व्यक्त केले. इच्छा व क्रोध हे नवरा-बायको. त्यांच्या संसाराला सुरुवात झाली. त्याचे दैव चांगले, त्यांना मूलगा झाला.

तया दोघांस्तव जन्मला। ऐसा द्वंद्व मोह जाला।
मग तो आजेन वाढविला। अहंकारें ॥ ज्ञा. ७।१६७

इच्छा व क्रोध या दोघांपासून मोहाची उत्पत्ती होते; भ्रांती होते; अंतःकरणात क्रोध उत्पन्न झाला की, ती तमोगुणाची वृत्ती असते. त्यामुळे विचार सर्व नष्ट होतो. एखादा बाप हिस्सा बरोबर देईना म्हणून बाप लेकाचे भयंकर भांडण होते. क्रोध च्या आवेशात बापाला मूलगा जोडा मारतो क्रोधामुळे विचार राहिला नाही. तो म्हणतो राग आला; मग भानच राहिले नाही. अनित्याच्या ठिकाणी नित्य बुद्धी, असे होणे यालाच भ्रांती, मोह म्हणतात. या द्वंद्व मोहाला आजोबांनी म्हणजे अहंकाराने वाढविले. असा अभिमानापर्यंत द्वंद्व मोह असतो. अभिमान गेला की द्वंद्व मोह जातो. त्याचा प्रताप सांगतात. हा मोह अती दुष्ट आहे. मोहामुळे सर्वांना दुःख भोगावे लागते. मोह सर्वांना रडवतो. ईश्वरनिर्मित सृष्टी दुःखाला कारण नसून जीवनिर्मित सृष्टी दुःखाला कारण आहे. हे अती दुष्ट कारटे, सात्त्विक धैर्य ज्याला म्हणतात त्याशी वैर करते.

धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः।
योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ गी. १८।३३

त्या द्वंद्वमोहाचा या वृतीसी नेहमी छत्तिसाचा आंकडा असतो. सात्त्विक धैर्याने डोके वर काढले की याने त्याला पाडलेच. एखादा

नियमाने आषाढी–कार्तिकी दोन्ही वारींना जाणारा वारकरी असला व त्याने आपल्या मित्राला म्हणावे, आषाढी वारीला तर चला! त्याच्या मित्राने म्हटले, या वर्षाला यायचे, काही का होईना! केली तयारी निघयाची, एक-दोन दिवसांनी निघायचे. पण वार्ता आली की– पंढरीला ज्येष्ठ महिन्यापासून कॉलरा चालू आहे. वार्ता आल्यावर बेत रहित झाला. धैर्य खचले. कोणामुळे? मोहामुळे. कसाही नियम करा. पण तो असा दांडगेश्वर निघाला की, त्याने नियम पालथा पाडलाच. कित्येक कार्तिकी, माघ-स्नानाचा नियम करतात. पाच चार दिवस सकाळी स्नान करतात. घरी रोजचे स्नान म्हणजे जेवणाच्या वेळेपर्यंत स्नानच नसते. थंडीत सकाळी स्नान केल्यामुळे थोडा ताप का आला की, याचा नियम संपतो. लोक विचारतात–काय हो, नियम केला होता ना! तो म्हणतो – गारठ्याने ताप आला, डोके दुखायला लागले, त्याच्या नियमापासून त्याला कोणी च्युत केले! तर देहाच्या मोहाने.

जो धृतीसि सदां प्रतिकूळु। नियमही नागवे सळु!
आशा रसें दोंदिलु। जालासांता ।। ज्ञा. ७।१६८

आशारसाचे सेवन करून काशीफळासारखा धष्टपुष्ट झालेला हा थोर आहे.

असंतुष्टीचिया मदिरा। मत्त होवोनी धनुर्धरा।
विषयांचे वोवरां। विकृतीसी असे ।। ज्ञा. ७।१६९

नेहमी दारू पिऊन रांडेच्या खोलीत पडतो. मोह आहे तोपर्यंत सगळे ब्रह्मांड मिळाले तरी संतोष वाटावयाचा नाही असा दुष्ट निघाला. विषयांच्या खोलीत विकाररूपी रांड घेऊन पडलेला असतो. देहाभिमान घेतल्यावर जन्मादी संसार वाढविणारे विकार कसे निर्माण होतात हे मी सांगत आहे. भावशुद्धीच्या आड हा पोहोचतो. सत्त्वशुद्धी म्हणजे

गांवा गेलिया वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु।
भलतेसणी हानिलाभु। न मनीं जेवीं ।। ज्ञा. १६।७९

तेवीं सत्स्वरूप ठचलेपणें । बुद्धी जें ऐसें अनन्य होणें ।
ते सत्वशुद्धी म्हणे । केशिहंता ॥ ज्ञा. १६।८०

तें स्वलाभ लाभलेपणे । मन मनपणाही धरूं नेणें ।
शिवतलें जैसें लवणें । आपुलें निज ॥ ज्ञा. १७।२३३

तेथ कें उठती ते भाव । जीहीं इंद्रियमार्गी धांव ।
घेऊनि ठाकावे गांव । विषयांचे ते ॥ ज्ञा. १७।२३४

म्हणौनी तियें मानसी । भाव शुद्धिचि असे वापेंसी ।

सत्वशुद्धीच्या मार्गाने गेले असतां बिनचूक मोक्षाला जाता येते. त्या मार्गावर विकल्पाचे काटे पसरून ठेवले. ते पाहिल्यावर अज्ञानी लोक परत फिरतात. याशिवाय या मोहाने अप्रवृत्तीचे मार्ग मोकळे केले. ज्या मार्गाने गेले असता अचूक नरकाला जातो, ते मार्ग याने खुले केले. याचे रहस्य परमार्थाला लागला, आणि थोडे का नुकसान झाले की तो मार्ग टाकतो. मनात असा विकल्प येतो की, लोक म्हणत होते. तेच खरे, लोक म्हणत होते. अरे, तुझ्या घरात माळ धार्जिणी नाही. एखादा मनुष्य पंढरीला गेला आणि कोण मेला तर मग पिढीजात वारी सोडून देतात. आणि म्हणतात – आम्हाला वारी धार्जिणी नाही. पंढरीत एक मेला आणि तूं ज्या घरात राहतो तेथे पणजोबा, बाप, भाऊ, बहिणी मेल्या मग ते घर का टाकत नाही ?

तेणें भुतें भांबावलीं । म्हणोनि संसाराचिया आडवामाजी पडिलीं ।
मग महादुःखाच्या घेतलीं । दांडेवरी ॥ ज्ञा. ७।१७१

मग महादुःखाच्या दांडक्याने ढोरासारखी बडवली गेली. महादुःख म्हणजेच जन्म-मृत्यू.

जन्ममरणापरते दुःख । अधिक कोण ते सांग पां ॥ ० ॥

आतापर्यंत भगवत्-उक्ति सांगितली. त्यावरून तुम्हाला कळले असेल की जन्म-मरणाची परंपरा जीवाच्या मागे देहाभिमानामुळे लागली.

अहकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् । ...
विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ गी. १८।५३

जो न मोकली मारुनी । जीवो नेदी उपजवोनी ।
विचंबवी खोडां घालुनी । हाडांचिया ॥ ज्ञा.।१८।१०५१

देहाहंकार अतिदुष्ट आहे. मारून सोडत नाही, जन्मून जगू देत नाही. म्हणजेच वारंवार जन्मावे लागते, आणि मरावे लागते. म्हणून देहाला मी म्हणू नका !

चिन्मात्र स्वरूपता जीवासी । लग्न लावी जड देहेंसी ।
'ओं पुण्या' एकात्मतेंसी । कर्ता ज्योतिषी अभिमान ॥ भा. २४।१२०
जीव ज्ञानस्वरूप चोखडा । तो करूनि जडमूढ वेडा ।
दृढ घाली हाडांचे खोडा । तो हा धडफुडा अहंकारू ॥ भा. २४।१२१

वास्तविक देहाचा व आतम्याचा अर्थार्थी काही संबंध नाही.

तया देहा म्हणती भेटी । हे सपायी निर्जिव गोठी ।
वारिया वाळूवे गांठी । कें ही आहे ॥ १३।१०९७

कोणाचा कोणासीं न घडे संबंध । आहे शुद्ध बुद्ध ठायींचे ठायीं ॥
तु. ३८६३

असा हा नित्य, शुद्ध, मुक्त अनादी सिद्ध, जीवात्मा असताना त्याला या देहाभिमानाने खोड्यांत घातले. देहाभिमानाने. भगवान सांगतात-प्रसाद-संपन्न हो म्हणजे जन्ममरणातून मुक्त होशील.

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ॥ गी. १८।५८
मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांचि भरेल जेव्हां ।
माझा प्रसादु जाण तेव्हां संपूर्ण जाहला ॥ ज्ञा. १८।१२६९

अभिन्न सेवेने चित्त भरून रहावें.

प्रसादे सर्व दुःखानां हानिरस्योपजायते । गी. २।६५

संसारदुःखाचा नाश होतो, तो हा प्रसाद आहे. चित्तात परमात्म्याचे वास्तव्य होणे हा प्रसाद आहे. देवळातील पुजारी माळ घालतो, खडीसाखर देतो त्यालाच लोक प्रसाद म्हणतात. हा देवाचा प्रसाद नव्हे. हा पुजाऱ्याचा प्रसाद आहे. परमात्म्यांनी म्हटले आहे–

सूर्यचेनि सावायें । डोळा सावाईला होये ।
तैं आंधाराचा आहे । पाडु तया ॥ ज्ञा. १८।१२७१

तैसा माझेनि प्रसादें । जीवकणु जयाचा उपमर्दे ।
तो संसाराचेनि बाधे । बागुलें केवीं ॥ ज्ञा. १८।१२७२

ईशप्रसादाने ज्याची अल्प जीवदशा नष्ट झाली, त्याला बागुलवत मिथ्या संसाराची बाधा कशी होईल ? मी हे तुला सांगून माझे काय केले. आता ऐकणे तुझे काम आहे.

अथवा हन अहंभावें । माझें बोलणें हें आघवें ।
काना मनाचिये शिवे । नेदिसी टेंकों ॥ ज्ञा. १८।१२७४

अथवा हे माझे बोलणे, कानामनाने नीट ऐकले नाहीस, त्यात माझं नुकसान काय आहे ? सांगणाऱ्याचे नुकसान नाही. ऐकणाऱ्याचे नुकसान आहे. तुझे मोठे नुकसान निघणार आहे. नित्य मुक्त असताना ते सोडून ( देहाचा ) अभिमान घेऊन बसशील तर नित्यमुक्त अव्ययत्वाला मुकशील, विसरशील, देहतादात्म्याचा तडाका वाजेल.

तरी नित्यमुक्त अव्ययो । तूं आहासि तें होऊनि वाव्हो ।
देह संबंधाचा घावो । वाजेल आंगीं ॥ ज्ञा. १८।१२७५

जया देह संबंधा आंतु । प्रतिपदीं आतमघातु ।
भुंजतां उसंतु । कहींच नाहीं । ज्ञा. १८।१२७६

मी देहीं म्हणतां ब्रह्महत्या कोटी । येऊनिया दाठीं थापटती॥० ॥ज्ञा. १४६

शेंकडो जन्म घेऊनही हे नुकसान भरून निघणार नाही. अभिमाना–मुळे सुखरूपता गेली, जन्माक्षयातीत असताना जन्मावें मरावे लागले. सिद्ध सुखाला मुकला. जन्मादी संसाराचे दुःख भोगावे लागले. नसलेले संसाराचे दुःख येऊन आदळले. मग या अभिमानाला नको का ठार करायला ? या दृष्टाला घालवलेच पाहिजे. तात्त्विकदृष्ट्या, जीवाच्या स्वरूपीं बंध नाही. केवळ देहाभिमानामुळे शोक, मोह, दुःख, जन्ममरणादी गुण आहेत, ते जीवाचे ठिकाणी दिसतात, ते स्वरूपी नाहीत. हे धर्म आहेत केवळ देहाभिमानाचे.

इत्यादि हे नानागुण । अथवा कां जन्ममरण ।
आत्म्यासि संबंध नाहीं जाण । हें देहाभिमान स्वयें भोगीं ।।
भा. २८।१५।८६

संसारबंध जीवाला नाही. देहाभिमानाच्या ठिकाणी हे धर्म प्रतीत होतात. देहाभिमानाच्या ठिकाणी कसे कसे प्रतीत होतात ते उदाहरणाने सांगतात. जेथे जेथे देहाभिमान तेथे तेथे ही प्रतीती येते. जेथें देहाभिमान नाही, तेथे प्रचीती नाही.

जागृति आणि देखिजे स्वप्न । तेथ वसे देहाभिमान ।
ते ठायीं हे दिसती गुण । सुषुप्तीसी जाण गुण नाहीं ।। भा. २८।१५।८७

दोन अवस्थांत प्रतीतीला येतात. सुषुप्तीत हे गुण प्रतीत होत नाहीत. सुषुप्तीत शोकादी गुणांची प्रतीती नाही. जागृती व स्वप्न या दोन अवस्थेत प्रतीती येते. जीवाच्या ठिकाणी स्थूळाचा व सूक्ष्माचा अभिमान असतो. दोन अवस्थेत अभिमानाला धरून वृत्ती असते. स्थूळाचा अभिमान जागृतीत व स्वप्नात सूक्ष्माचा अभिमान असतो.

जेथ वृत्ति निरभिमान । तेथ जन्ममरणादि हे गुण ।
सर्वथा नुठती जाण । गुणासिं कारण अभिमान ।। भा. २८।१५।८८

जेथे अंतःकरणाची वृत्ती अभिमानशून्य दिसेल, तेथे प्रतीती येत नाही म्हणून जन्ममरणादी गुणाला कारण केवळ देहाभिमान आहे.

विश्वाभिमानी इंद्रिय वृत्ती । तेणें तो देखतसे जागृतीं ।
तैजस अभिमानी अविद्या वृत्ती । स्वप्नस्थिती तो देखे ।। भा.१३।३२।८८
प्राज्ञ अभिमानी मूढवृत्ती । तो देखतसे सुषुप्ती ।
एक आत्मा तिहीं प्रती । न घडे निश्चितीं म्हणाल ।।भा. १३।३२।८८

अंतःकरणाची वृत्ती तर तिन्ही अवस्थेत आहे पण दोन अवस्थेमध्ये अभिमानाला धरून असते आणि एक अवस्थेमध्ये अभिमानाला धरून नसते. वारा सुटला आणि जळाला स्पर्श होतो, तसाच पृथ्वीलाही होतो. पण तरंग पाण्यावरच निर्माण होतो. पृथ्वीवर नाही.

जळीं स्थळीं वायु झगटी । जळीं तरंग स्थळीं तृणें
तैं तरंगता जळाचे पोटीं । तेवीं शोकादि गुणकोटी अहंतेमाजी ॥
भा. २८।५।८९

तशी वृत्ती तर तिन्ही अवस्थेत असते. पण सुषुप्तीत मूढ वृत्ती. तेथे ना स्थूळाचा ना सूक्ष्माचा अभिमान म्हणून जन्मादी गुण प्रतीत होत नाहीत. जीवाच्या ठिकाणी संसारबंध नाही. अहंकाराच्या ठिकाणी तो प्रतीत होतो. अर्थात केवळ देहाभिमानानेच जीव बद्ध झाला. मग जो बद्ध झाला तोच मुक्त होणार. जो बांधला गेला नाही तो काय मुक्त होणार अशी शंका केली आहे—

उद्धवा, तू अशी शंका घेशील की— जीव तर सदा मुक्तच आहे, स्वरूप-दृष्टचा नित्यमुक्त, संसारबंधरहित आहे. जेवढा संसार बंध तेवढा देहाभिमानाच्या ठिकाणी आहे म्हणून देहाभिमानच मुक्त होणार.

बद्धता झाली अहंकारासी । म्हणसी मुक्ति व्हावी त्यासी ।
ते अहंता लागली जीवासी । तेंचि हृषीकेशी सांगत ॥ २८।५।९०

जीवाला मुक्त काय व्हायचे? जरी बंध देहाभिमानाच्या ठिकाणी आहे तरी मुक्त व्हायचा तो जीवच होणार. कसे ते सांगतो.

ते अहंता लागली जीवासी । तेंचि हृषीकेशी सांगता.

अर्थात बद्धता आली जीवाच्या ठिकाणी.

करितां घायाळाला संग । अंगे अंग माखावें ॥ २ ॥ तु. १८८०

घायाळ झालेल्या मनुष्याला आलिंगन दिले तर आपले अंगही रक्ताने माखले जाते.

एकाने नैमित्तिक प्रसंगी स्नान केले. सुवासिक तेल, साबण उटणे वगैरे करून शरीर स्वच्छ झाले होते. घरात बसला होता. त्याचा मुलगा व्रात्य होता. त्याने भांडण करून डोके फोडून घेतले होते. ते रक्ताने माखले होते. तो घरी रडत आला. बाप उघड्या अंगाने बसला होता, आपला मुलगा घायाळ झालेला पाहिला. माझ्या बाळा, तुला कोणी मारले असे म्हणून [illegible] होते तरी

त्याला भेटल्यामुळे तो जसा म्हसोबाचा अवतार तसा हाही झाला. म्हसोबा हा तसा ज्या देहाभिमानाच्या ठिकाणी बंध आहे. त्याशी मुक्त जीवाने संबंध केला, म्हणून बंध भोगावा लागला.

मुक्त होतां परि बळें झाला बद्ध । घेउनिया छंद माझें माझें ॥
तु ३८४०

परमार्थदृष्टचा जीव नित्यमुक्त असतो, पण बळेच अभिमानाने संसार-पाशामध्ये बांधला गेला. आता त्याला मुक्त व्हायचे तर काय करायला पाहिजे ? असलेला अभिमान टाकायला पाहिजे. म्हणून भगवान अर्जुनाला सांगतात –

उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मकः ।। गी. ६।५

असे करण्यात आपला उद्धार आपणच केला. अभिमान का घेतला ( देह मी, ब्राह्मण मी, गोरा मी ) की आपला घात आपणच केला.

म्हणऊनि आपणचि आपणपेया । घातु कीजतु असे धनंजया ।। ज्ञा.६।७०
एऱ्हवी कोशकीटकाचिया परी । तो आपणपया आपण वैरी ।
जो आत्मबुद्धि शरीरीं । चारूस्थळी ।। ज्ञा. ६।७२

तो कोशकीटक आपणच आपला शत्रू झाला. शरीरच उत्तम म्हणून आत्मबुद्धी केली.

जे देहचि आपणपें मानिती । आणि विषयातें भोग्य म्हणती ।
या परतें ना स्मरती । आणिक कांहीं ।। ज्ञा. ३।१२७

अशी का आपण आपली समजूत केली मग आपला शत्रू आपणच झालो.

तुका म्हणे देवा काही बोल नाहीं । तुझा तूचि पाहीं शत्रु सखा ।।
तु. ३६७६

माझा मीच झालों शत्रु । कैंचे पुत्र दारा कैंचा मित्रु ।
कासया घातला पसरु । अहो जगद्गुरु तुका म्हणे ।। तु. ६९५
आप आपण्या घातकर । शत्रु झालों मी दावेदार ।
तं तंव कृपेचा सागर । उतरीं पार तुका म्हणे ।। तु. ६९२

हे उद्‌गार देहाभिमान घेतल्यावरचे आहेत. तात्पर्य, भगवत् उक्ती सांगितली. त्यावरून कळले असेल की, जन्ममरणादी हे गुण जीवाला केवळ देहाभिमानामुळे भोगावे लागतात. देहाभिमानामुळे जन्म, मरण, शोक, भय लागले. एवढा जीवाचा अभिमानाने घात केला. मग नको का याचा मुडदा पाडायला ?

अता दुसरा प्रश्न – पंढरीतच का जातो ?

तें या पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ॥ १ ॥

उठाउठी अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ॥ २ ॥

ताबडतोब, त्वरित अभिमान जाण्याच्या ठिकाण कुठे असेल तर पंढरपूरच. कोणी असे म्हणेल की – तु. म. वारकरी होते म्हणून आपल्या देवाचा अभिमान घेऊन म्हणत असतील तर ते तसे नाही. काशीची कावड रामेश्वरला, रामेश्वरची काशीला असे तीर्थ करणारे म्हणतील " ते या काशीस घडे, " " ते या प्रयागासी घडे " " ते या बद्रीसी घडे " पण इतरत्र कुठेही गेला तरी अभिमानाची निवृत्ति होणार नाही. पुष्कळ तीर्थक्षेत्रे आहेत. मी वारकरी म्हणून अभिमानाने सांगत नाही. ताबडतोब अभिमान घालवावयाला पंढरीलाच गेले पाहिजे. इतरत्र फिरा, काशीला जा, प्रयागाला जा, गयेला जा, बद्रीनाथाला जा, केदारनाथाला जा. त्या क्षेत्राची निंदा करीत नाही. मला ते प्रमाण आहेत. पण त्वरित अभिमान घालवण्याला पंढरीलाच गेले पाहिजे. इतर क्षेत्रात अभिमान जाणार नाही.

तीर्थाटणें एकें तपे हुंबरती । नाथिले धरिती अभिमान ॥२॥ तु. २२१७

तप करूनि तीर्थाटन । वाढविला अभिमान ॥ तु. २९२२

भूतलावर पुष्कळशी तीर्थे आहेत. ती सगळी तीर्थे जरी केली, ( पंढरपूर सोडून ) तर अभिमान जाणार नाही. उलट इतर तीर्थाटणाने अभिमान वाढतो. म्हण आहे " घरचे झाले थोडे व्याह्याने धाडले घोडे." ' दुष्काळात तेरावा (अधिक मास) महिना ' या म्हणीप्रमाणे तप, तीर्थाटण,

वांटिलें तें धन । केली अहंता जतन ॥ तु. २९२२

दान करू नये असे मला सांगावयाचे नाही. केवळ दानाने देहाभिमान जाणार नाही, एवढेच सांगावयाचे आहे. दान केल्याने, मी दाता असा अभिमान होतो. योगाभ्यास केला तर मी योगी असा अभिमान उत्पन्न होतो.

आपुलिया नाहीं निवाले जे अंगें ॥ योगी करती रागें गुरगुरु ॥
तु. १५५०

ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव ।
तेथें अहंभाव पाठी लागे ॥ तु. १५५०

जें जें करावें साधन । साधनीं रिघे साधनाभिमान ।
धांवणें नागवी संपूर्ण । साधनी विघ्न होय तैसें ॥ भा. १३।४४०

नवल अहंकाराची गोठी । विशेषें नलगे अज्ञाना पाठीं ।
सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ॥ ज्ञा. १३।८२

कर्मादिक, तीर्थादिक ही जी साधने ती देहाभिमानाची विरोधी नाहीत. उलट पोषक, भर घालणारी आहेत. म्हणून ज्याला त्वरात्वरित देहाभिमान घालवायचा असेल त्याला पंढरीलाच गेले पाहिजे.

चार धाम आहेत. सप्त पुऱ्या आहेत; पण तेथे गल्याने अभिमान जात नाही. उलट तीर्थपर्यटनाचा अभिमान होतो. तशीच इतर साधने अभिमानाचे विरोधी नाहीत. निळोबाराय सांगतात—

नाना साधनांच्या केलिया खटपटा । त्या त्या न पावती वो याच्या रावटा ।

जाणों जातां जाणिव घाली आडफांटा ।
योगाभ्यासें सिद्धी रोधिती वाटा वो ॥ ३ ॥ नि. १५९

यज्ञयागें स्वर्गभोग आड येती ।
करितां तपें काम क्रोध खवळती ।
नित्यनित्यज्ञानें अभिमान वाढती ।
करितां तीर्थाटनें अहंकाराची प्राप्ती वो ॥ ४ ॥ नि० १५९

ऐसें शोधियले मार्ग नानापरी । न येतीं प्रतीति मग सांडियेले दुरी ।
आतां गाऊनि गीतीं नाचो मुरारी ।
निळा म्हणे करूं संसार बोहरी वो ॥ ६ ॥ नि. १५९

अभिमानाचा विरोधी म्हणजे नाशक जर इतर तीर्थांत असते तर मग पंढरीचेच एवढे महत्त्व सांगायला नको. इतर तीर्थांत अभिमानाचे विरोधी का नाही व पंढरीतच अभिमानाचे विरोधी का आहे, हा विचार सांगतो.

विरोधी कोण ? अंधकाराचे विरोधी प्रकाश. स्वप्नाचे विरोधी जागृती. तसे अभिमानाचे विराधी कोण ? विचार. पंढरीत अभिमान का जातो हे दोन रीतीने सांगणार आहे. पैकी प्रथम गीता– देहाभिमानाचा विरोधी जर कोणी असेल तर विचार. विचारावाचून कोणी विरोधी नाही. तर देहाभिमान आहे अविद्याजन्य. जिवाने अभिमान घेतला केव्हा ?

तैं अज्ञान एक रूढे । तेणें कोहं विकल्पाचें मांडें ।
मग विवरूनि कीजे फुडें । देहो मी ऐसें ॥ ज्ञा. १५।६।४२

अज्ञान अर्थाचे दुसरे प्रमाण—

जया विसराच्या देशीं । प्रसिद्धि गा जीवु ऐसी ।
जेणें भाषा केली देहेंसी । आघवा विषयीं ॥ ज्ञा. १८।३२५

अज्ञानापासून देहाभिमानाची उत्पत्ती झाली. जीव आपल्या स्वरूपाला विसरतो. मग मी कोण आहे, अशा विकल्पास, संशयास आरंभ होतो. पुढे विचार करून ' देह मी ' असा निश्चय करतो. अज्ञानापासून देहाभिमान होतो. अर्थात त्याचे कारण अथवा मूळ अज्ञान आहे. अर्थात कारणाची निवृत्ती केल्यावाचून कार्याची निवृत्ती होत नाही. एवढ्याकरिता अज्ञानाची निवृत्ती होणे अवश्य आहे. अज्ञानाचा नाश झाला म्हणजे अभिमानाची निवृत्ती झालीच समजा. ज्याप्रमाणें—

पडोनि गेलिया भिंती । चित्रांची केवळ होय माती ।
कीं पाहालेया राती आंधारें उरे ॥ ज्ञा. १८।२६३

भिंतीचा नाश म्हणजे त्यावर काढलेल्या चित्रांचा नाश होतो. आश्र-

बीचा नाश म्हणजे आश्रयाचा नाश होतो. अज्ञान आहे आश्रयी व देहाभिमान आहे आश्रय. मग आश्रयी अज्ञान त्याचे विरोधी ब्रह्मज्ञानच आहे.

म्हणोनि स्वप्नींचेया घाया । ओखद चेवोचि धनंजया ।
तेवीं अज्ञानमूळा यया ज्ञानची खड्ग ।। ज्ञा. १५।३।४८

अशा या संसारवृक्षाची निवृत्ती होण्याकरिता ज्ञानावाचून दुसरी साधने करशील, तर अधिक गुरफटला जाशील.

आपुलिया अज्ञाना साठीं । नव्हता थांबला किरीटी ।
तरि आतां आत्मज्ञानाच्या लोटीं । खांडेनिं गा ।। ज्ञा. १५।३।४८
वांचूनि ज्ञानेंदीण एकें । उपाय कारसी जितुकें ।
तिहीं गुंफसि अधिकें । रुखीं इये ।। ज्ञा. १५।३।४९
मग किती खांदो खांदीं । यया हिंडावें ऊर्ध्वीं अधीं ।
म्हणौनि मूळचि अज्ञान छेदीं । सम्यक् ज्ञानें ।। ज्ञा. १५।३।५०

तात्पर्य, देहाभिमानाला कारण जे अज्ञान आहे, त्याचे नाशक ब्रह्मज्ञान आहे. ते उत्पन्न होण्याकरिता विचाराची आवश्यकता आहे.

नोत्पद्यते विना ज्ञानं विचारेणान्यसाधनैः ।।
आत्मानात्मविवेकेन ज्ञानं भवति निर्मलम् ।।

विचारावाचून ज्ञान नाहीं आणि ज्ञानावाचून अज्ञानाचा नाश नाही आणि अज्ञाननाशावाचून अभिमानाची निवृत्ती होत नाही. देहाभिमानाच्या परंपरेने विरोधी विचार हा आहे. हा विवेक कुठे आहे ?

चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ।
संत तेथे विवेका । असणें कीं जी ।। १८।७८।३२

सत्संगती आणि वेदान्ताचे श्रवण हे जर काशीत असते, तर काशीतही तसे म्हटले असते. कोणी म्हणेल, अहो, काशीमध्ये तर मोठमोठे विद्वान आहेत. न्याय, सांख्य, पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा, सहा शास्त्रांचे अध्ययन केलेले आचार्य आहेत. काशीत ज्ञानी असतील, पण कान्याकोपऱ्यात चर्चा करणारे आहेत, उघड रीतीने पंढरीप्रमाणे नाही. सत्संगती, वेदान्ताचे

श्रवण हा तेथील विधी नाही. तेथील विधी म्हणजे मिशा भादरा, पींड पाडा. त्या पंढरीत जे कोणी गेले असतील त्यांना ठाउकी आहे.

ऐसे संत जन ऐसे हरिदास। ऐसा नामघोष सांगा कोठें ॥ २६५९

संत भार पंढरीत। कीर्तनाचा गजर होत ॥१॥ जना०१७७

असा संतांचा समुदाय काशीला आहे का? पंढरीला आषाढ शुद्ध दशमीला या, संतभार कसा दिसतो ते पहा.

कुंचे पताकांचे भार। आले वैष्णव डिंगर।
भेणें पळती यम किंकर। नामे अंबर गर्जतसे ॥ ज्ञा. २०६

आले हरिदासांचे थाट। कळिकळा नाही वाट।
विठ्ठलनामे करिती बोभाट। भक्तां वाट सांपडली। ज्ञा. २०६

कुंचे पताका झळकती। टाळ मृदंग वाजती।
आनंदें प्रेमें गर्जती। भद्रजाती विठ्ठलाचे ॥१॥ ज्ञा. २०५

आले हरीचे विनट। वीर विठ्ठलाचे सुभट।
भेणें जाहले दिप्पट पळति थाट दोषांचे ॥२॥ ज्ञा. २०५

सत्संगती आणि वेदान्ताचे श्रवण भरपूर कोठे मिळत असेल तर पंढरी-मध्ये. आमच्या पंढरीचा हा विधीच आहे.

चंद्रभागे स्नान विध तो हरिकथा। समाधान चित्ता सर्व काळ ॥ तु.२५८०

हरिकथा श्रवण करणे हा मुख्य विधी आहे. इतर तीर्थांत उपवास करावा लागतो.

केला न सहावे तीर्थ उपवास। कथेविण दोष साधन तें ॥ २६५७

आमुच्या पांडुरंगाला तीर्थ उपवास केलेला सहन होत नाही. याचा अर्थ खुशाल एकदा दोनदा चापून खावे आणि उताणे पडावे असा नव्हे. भजन, कीर्तन, ज्ञानेश्वरीचे श्रवण करावे. दुसरे करू नये. भजन कीर्तनावाचून इतर करणे दोष सांगितला आहे. ज्या सत्संगतीने, वेदान्ताच्या श्रवणाने विचार उत्पन्न होतो, तो येथे भरपूर आहे. काय सोहळा सांगू?

खेळ मांडियेला वाळवंटी । तु. २४४

विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळो वेळां ।

ह्रा सुखसोहळा स्वर्गी नाहीं ॥०॥ तु. २४६१

मग अभिमान येथे कुठून येईल ? पंढरीतच देहाभिमान जातो असे महाराज म्हणतात. त्याचे समाधान एका रीतीनें सांगितले. विचार उत्पन्न होण्याला कारण सत्संगती, वेदान्ताचे श्रवण, ते तेथे भरपूर आहे.

पंढरीतच देहाभिमान का जातो हे दुसऱ्या रीतीने सांगतो. पंढरीचा देव जो परमात्मा तो स्वतःच अभिमानशून्य आहे. त्याला आपल्या विग्रहाचा अभिमान नाही. आणि तेथे येणाऱ्यालाही अभिमान घेऊ देत नाही.

अभिमान नाही तुका म्हणे त्यासी ।

नेदी आणिकासी धरुं देव ॥ तु. १०२

भगवद्देह चैतन्यघन । तेथें वसेना देहाभिमान ।

यालागीं करितां त्याचें भजन । अज्ञान जन उद्धरती ॥ भा.च. श्लो.४५

जीवही देहधारी व देवही देहधारी मग एकाचे दुसऱ्याने भजन करून काय होणार ? अशी शंका केली तर त्याचे समाधान असे आहे. भगवान तुमच्या–आमच्यासारखा देहधारी नाही. शुद्धसत्वात्मक जी माया तिचा परिणाम आहे.

स्वगत सच्चिदानंद मिळोनि शुद्धसत्वगुण विणली रे ।

षड्‌गुण गोंडे रत्नजडित तुज श्यामसुंदरा शोभली रे ॥ ज्ञा. ७४१

सगुण परमात्म्याच्या ज्ञानाला माया आवरण घालीत नाही. जीवाची मलिन अविद्या होण्यास्तव माया आवरण घालते. म्हणजे जीवाला आपल्या स्वरूपाचा विसर पाडते. काचेच्या हंडीत मेणबत्ती पेटवली तर ती प्रकाशाला बाहेर फेकते. मडक्यांच्या हंडीत ती पेटवली तर मडके प्रकाशाला आवरण घालते. मडक्याची उपाधी मलिन आहे. काचेप्रमाणे ईश्वराची उपाधी आहे. मडक्याप्रमाणे जीवाची उपाधी आहे. म्हणून अर्जुनाने म्हटले आहे–

जी आपणपयातें तूंचि जाणसी। आणिकातें सांगावयाही तूं समर्थ होसीं।
तरि आतां एक वेळ घाम पुसीं । आर्तीचिये निडळींचा ॥ ० ॥
ज्ञा. १० । १५ । ८०

देवाला आपल्या विग्रहाचा अभिमान नाही. म्हणून तो आपल्या दासालाही देहाभिमान वेऊ देत नाहीं. ज्याच्या ठिकाणी जो दोष नाही त्याला दुसऱ्याच्या ठिकाणी तो दोष पाहून चीड येते.

तुका म्हणे अभिमान । नारायणा न सोसे.॥ तु. २८००
हनुमंता भेटी गर्व हरिला दोहींचा।
गरुडा विटंबना रुपा सत्यभामेचा ॥ तु. २७७

सत्यभामेला रूपाचा आणि गरुडाला बळाचा अभिमान झाला होता. भगवंताला ते सहन झाले नाही. तो त्याने घालवला. भक्ताचाही अभिमान परमात्मा घालवतो.

विचारिलें आधीं आपुल्या मानसीं । वाचों येथें कैसीं कोण्या द्वारें ॥
तु. ३९५९

तंव साह्य झाला हृदयनिवासी । बुद्धि दिली ऐसी नाश नाहीं ॥२॥
३९५९

पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धि भेद ॥०॥ ४०३५

पांडुरंगाने अनुग्रह केला. अलीकडच्याप्रमाणे कान फुकले नाही, तर माझ्या अंतःकरणातील संशय व भेदबुद्धी नाहीशी केली. जीव-शिवाचे ऐक्य झाले.

जीवशिवा शेज रचिली आनंदें । आउटाविए पदीं आरोहण ॥ ४०३५
अभिमान नुरे । कोड अवघेचि पुरे ॥ तु. २५६८
तुका म्हणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ हा नास अहंकाराचा ॥
तु. २६००

पंढरीला जाणारे जेवढे म्हणून वारकरी आहेत त्यांना,

पंढरीस नाहीं कोणा अभिमान । पाया पडे जन एकामेकां ॥ २६१६

वर्णाभिमान विसरली याति । एक एकां लोटांगणी जाति रे ।

निर्मळ चित्तें झालीं नवनीते । पाषाणा पाझर सुटती रे ॥ तु. २४४

हा सगळा अभिप्राय मनामध्ये घेऊन आमचे महाराज म्हणतात,

उठाउठी अभिमान । जाय ऐसे स्थळ कोण ॥ १ ॥

तें या पंढरीस घडे । खळा पाझर रोकडे ॥ २ ॥

( जय विठ्ठल जय विठ्ठल )

---

# आम्हांसाठी अवतार

आम्हांसाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सुकर ।। १ ।।
मोहें धांवे घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ।। २ ।।
कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ।। ३ ।।
सुख ठेवी आम्हांपाशीं । दुःख आपणचि घोंटी ।। ४ ।।
आम्हां घाली पाठीकडे । आपण कळिकाळाशीं भिडे ।। ५ ।।
तुका म्हणे कृपानिधी । आम्हां उतरी नावेमधी ।। ६ ।।

**भूमिका** – या अभंगात तुकाराम महाराज भगवंताच्या अवताराचे प्रयोजन सांगतात. भगवान जे मत्स्यकूर्मवराहादि अवतार घेऊन येतात त्याचे प्रयोजन काय ? कशाकरता भगवान सगुण रूप धारण करतात ? त्याचे कारण सांगतात. भगवान् पारमार्थिक दृष्टया कर्तृत्वशून्य असले तरी ज्या वेळी भक्तजनांना पीडा होते, त्या वेळी त्याच्या संरक्षणार्थ सर्वशक्तिमान असा जो भगवान तो अवतीर्ण होऊन भक्तजनांचे रक्षण करतो. भगवान गीतेत सांगतात—

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय । संभवामि युगे युगे । गी. ४।८

तुकाराम महाराज भगवद्उक्तीला डोळ्यांपुढे ठेवून मोठ्या अभिमानाने म्हणतात की– हा परमात्मा आमच्याकरतां सगुण साकर होतो. त्यावेळी आम्हाला आनंद होतो.

नाहीं या आनंदासी जोडा । सांगतां गोष्टी लागती गोडा ।
आलासी आकारा आमुच्या चाडा । तुका म्हणे भीडा भक्तीचिय या ।।
तु. ७१२

तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही देवाला भक्तीची भीड घातली म्हणून तो आला. उगाच नाही आला.

आणिला ही रूपा बळें । करूनि खळें हरिदासीं ॥ तु. २२०२
हरिदासांनी हट्ट धरला आणि त्या परमात्म्याला रूपाला आणले.

तुका म्हणे आम्हांसाठीं येणे रूपा । माझ्या मायबापा पांडुरंगा ॥
तु. १६३६

म्हणूनच कीर्तनाला घेतलेल्या अभंगाच्या प्रथम चरणात महाराज म्हणतात की :-

आम्हासाठीं अवतार । मत्स्य कूर्मादि सुकर ॥ १ ॥

भगवंताला आपल्या नामाचा अभिमान असल्याने त्याचे नाम घेतले असता, त्या भक्ताच्या मोहाने परमात्मा धावून येतो. हीच गोष्ट अभंगाच्या दुसऱ्या चरणात सांगतात–

मोहें धांवे घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥ २ ॥

त्या परमात्म्याचे नाव घेऊन त्याचा धांवा केला असता भक्ताच्या मोहाने कसा धावत येतो त्याविषयी गजेंद्राचा इतिहास सांगतात–

कनवाळू कृपाळू भक्तालागीं मोही ।
गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई ॥ १ ॥ तु. १५७१

गज सरोवरांत गजेंद्र पाणी पिण्यास गेला असता नक्राने गजेंद्राचा पाय धरला. तेव्हा गजेंद्र संकटात पडला.

गज सरोवरीं ग्रहग्रस्त । स्त्रियां पुत्रीं सांडिला जीत ।
तो अंतकाळीं मातें स्मरत । आर्तभूत आर्तस्वरें ॥ भा. १२।८५

अशा संकटात सापडलेल्या गजेंद्राकरता त्याचे आप्त नक्राच्या तावडीतून सोडवण्याकरता एक हजार वर्षे लढले.

गजेंद्र तो हस्ती सहस्र वरुषें । जळामाजी नक्रें पीडिलासे ॥ तु. ४०४
सुहृदीं सांडिलें कोणी नाहीं साहे । अंतीं वाट पाहे विठो तुझी ॥
तु. ४०४

सांडूनि समस्तांची आस । पाहोनि वैकुंठाची वास ।
राजीव उचलूनि राजस । पावपरेश म्हणे वेगीं ॥ भा. १२।८६

कोण होईल तो ब्रह्मांडचालक । आपणचि हांक देईल हांके ॥
गजेंद्र पशु आप्ते मोकलिला । तो तुज स्मरला पांडुरंगा ॥ १ ॥ तु. ४०५

त्या गजेंद्राचे तांतडीं । वैकुंठींहुनि लवड सवडी ।
म्या गरुडापुढें घालोनि उडी । बंधन तोडीं गजांचे ॥ भा. १२।८७

त्यासाठी गरुड सांडूनि धांवसी । माया झळंवसी दीनानाथा ॥ तु. ४०५

पैं रंक एक आडलेपणें । काकुळती अंती धांवा गा धांवा म्हणे ।
तरि तयाचिये ग्लानी धांवणें । काय न घडे मज ॥ ज्ञा. ८।१२८

गजेंद्राने आर्तभूत स्वराने भगवंताचे नाव घेऊन धावा केला तेव्हा त्याच्या मोहाने धावत येऊन त्याला संकटातून मुक्त केले.

तुका म्हणे नेले वाहूनी विमानी । मी हीं आइकोनी विश्वासलो ॥
तु. ४०४

असाच भक्ताने धावा केल्यावर त्या भक्ताच्या मोहाने धावत आल्याचा आणखी द्रौपदीचा इतिहास आहे.

कौरवीं पांचाळी सभेमाजी आणिली ।
वस्त्रहरणीं वस्त्र कैसी जाली माउली ॥ ६ ॥ तु. १५७१

दुःशासनाने द्रौपदीची वेणी धरून भरसभेत तिला ओढत आणली आणि वस्त्र फेडण्यास सुरुवात केली.

जब बैरानें कबरी पकरी । तबही मान मरोरी ॥ मिरा. १८

द्रौपदीला आरंभी वाटत होते, की कुंतीमाता, पांडव. भीष्माचार्य हे यावेळी लज्जा रक्षण करतील; परंतु यांपैकी कोणीही आपली लज्जा रक्षण करू शकत नाही असे कळून आल्यावर तिने भगवंताचा धावा केला.

गोविंद द्वारकावासिन कृष्ण गोपीजनप्रिय ।
कौरवैः परिभूतां मां किं न जानासि केशव ॥
हे नाथ हे रमानाथ व्रजनाथार्तिनाशन ।
कौरवार्णवमग्नां मामुद्धरस्व जनार्दन ॥ [illegible] ॥

कृष्ण कृष्ण महायोगिन् विश्वात्मविश्वभावन् ।
प्रपन्नां पाहि गोविंद कुरुमध्येऽवसीदतिम् ॥

याप्रमाणे द्रौपदीचा करुणाभावाने केलेला धावा भगवंताने ऐकल्या बरोबर लगेच तिच्याकडे धावला.

द्रौपदीचिये अति सांकडीं । सभेसि करितां ते उघडी ।
म्या निजांगें घालूनी उडी । वस्त्रांच्या कोडी पुरविल्या ॥ भा. २८।६८१

द्रौपदीचे हातीं देतां घडी । नेसतां दिसेल ते उघडी ।
यालागी मी लवड सवडी । नेसतीं लुगडीं स्वयें झालों ॥भा. २८।६८२

याप्रमाणें द्रौपदीच्या धाव्याला धावत येऊन द्रौपदीचे रक्षण केले.

त्वरा झाली गरुड टाकियेला मागे । द्रौपदीच्या लागे नारायणे ॥

म्हणून महाराज म्हणतात–

मोहें धावे घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ।

परमात्म्याला आपण पाहू गेलो तर तो कोठेही दिसत नाही; परंतु भक्ताच्या संकटप्रसंगी मात्र तो अकस्मात प्रगट होतो. हीच गोष्ट अभंगाच्या तिसऱ्या चरणात महाराज म्हणतात,

कोठें न दिसे पहाता । उडी घाली अवचिता ॥ ३ ॥

अदृश्य असणारा जो परमात्मा तो प्रल्हादाकरितां स्तंभामध्ये प्रगट झाला. प्रल्हाद हा दैत्यकुळात जन्मला होता.

स्वयें नारद महामुनी । प्रल्हादाची निजजननि ।
इंद्रापासूनि सोडवूनी । ब्रह्मज्ञान उपदेशी ॥ भा. २९।५७५

ऐकता नारदाच्या गोठी । गर्भीचि मजसी घातली मिठी ।
जो जन्मला कयाधुच्या पोटीं । भक्त जगजेठी प्रल्हाद ॥ भा. १२७५

गर्भात असतानाच त्याला नाराद महर्षींचा उपदेश झाला म्हणून बालपणापासूनच त्याच्या वाचेला भगवंतनामाचा छंद लागला. प्रल्हादाच्या पित्याने शुक्राचार्यांचा मार्गदर्शनाने प्रल्हादास विद्याभ्यासासाठी शंडामर्काकडे शिक्षेस ठेवला. शंडामर्काकडे शिकत असताना प्रल्हादाने भगवंताचे

नामचिंतन करावे. गुरूनी सांगितले की, हरीची भक्ती करू नकोस ! तुझ्या पित्याचा व हरीचा वैरभाव आहे. परंतु प्रल्हादाने ते मानले नाही. ही गोष्ट शंडामर्कांनी हिरण्यकश्यपूच्या कानावर घातली. हिरण्यकश्यपूने प्रल्हादाला बोलविले व काय शिकलास ते सांग म्हणाला ?

पिता क्रोधें पुसे बाळा । काय शिकला तें सांगें ॥१॥
येरू म्हणे नारायण । कांहीं यावाचून मी नेणे ॥२॥ ३४१९

प्रल्हादाच्या मुखातून असे ऐकल्यावर आपली पत्नी कयाधूकडे तो गेला.

सांगें स्त्रियेंसी एकान्ती । पुत्रें मांडिली भगवद्भक्ती ॥ एक. ३४२१
ऐसा पुत्र असोनि काय । जो नारायणासी ध्याय ॥ एक. ३४२०
माझा जो वैरी तया आठवितो । कुळघांत होतो ऐशानेंचि ॥
नामदेव २२५९

ऐकतां वचन बोले क्रोधावोनि । पापीयासी झणी नको येथें ॥
म्हणूनि समुद्री नेऊनियां टाका । अग्नींत लोटा का दुराचारी ॥२२५९
पर्वतावरी नेऊनियां टाका । प्राण याचा घ्या कां अवघे दूत ॥

याप्रमाणे असुरामध्ये श्रेष्ठ असा हिरण्यकश्यपू बोलला.

जो असुरांमाजी चूडामणी । जो द्वेषियांमाजी अग्रगणी ।
तो हरिनाम ऐकतां कानीं । अतिक्षोभें मनीं प्रज्वळों लागे ॥ भा. ४।२३०
जो पूर्ण क्रोधाचा उदधी । जो अविवेकाचा महानिधी ।
जो हरिस्मरत्यां पुत्रातें बाधी । गर्वमदीं उन्मत्त ॥ भा. ४।२३०

उद्धव म्हणतो देवा—

तूं सर्वांचा स्वामी होसी । परी कृपाळु निजभक्तांसी ।
अग्निविषादि नाना बाधेंसी । तुवां प्रल्हादासी रक्षिलें ॥ भा. २९।१४४

ज्ञानेश्वर महाराज सांगतात, भगवंताने प्रल्हादाचे रक्षण केले.

...... रक्षिला अग्निशस्त्रापासूनि जळा ॥ ज्ञा. १८९।१३

भोक्ता नारायण म्हणोनियां त्याला । अमृत तो झाला प्रल्हादासी ॥
नाम २२५९

जो प्रल्हादाचिया बोला । विषाहीं सकट आपण जाहला ॥ ज्ञाने.९।३३४

देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥
न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तेंही अमृत पाहीं ॥ तु. ३७१०
निर्वाणीं गोविंद असे मागें पुढें । कांहींच सांकडें पडो नेदी ॥ २२५०

दूतांनी परत येऊन हिरण्यकश्यपूला सांगितले की प्रल्हादाला समुद्रात टाकले तरी तो बुडत नाही, अग्नीत टाकला तरी तो जळत नाही. विष दिले तरी मरत नाही. मग हिरण्यकश्यपु रागावला व म्हणाला,

क्रोधयुक्त पिता पुसे प्रल्हादासी । सांग हृषीकेशी कोठे आहे ॥ एक. ३४२७

प्रल्हाद म्हणाला ' तो नाही कोठे ? सर्वत्र आहे. '

येरू म्हणे जळीस्थळी काष्ठीं भरला । व्यापुनी राहिला दिशाद्रुम ॥
एक. ३४२७

एकाजनार्दनी ऐकतांचि मात । मारितसे लाथ स्तंभावरी ॥ ३ ॥
एक. ३४२७

हाकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ।
ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचूनि ॥ तु. २५२१

प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार केला ।
विदारूनि दैत्य प्रेम पान्हा पाजिला ॥ तु. १५७१

जो हिरण्यकश्यपू नखधारी । स्वयें निवटी नरकेसरी ।
जो निजभक्तांचा कैवारी । अभयकारी साधूचा ॥ भा. ४।२३१

म्हणून आमचे महाराज म्हणतात,

कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥ ३ ॥

आणखी एक इतिहास सांगतो. पांडव वनवासात असताना धुंधुरमासाचे निमित्ताने घरात गोडधोड केलेली पक्वान्ने पाहून धर्माला प्राणाहून प्रिय अशा भगवान श्रीकृष्णाची आठवण आली. भगवंताला पंक्तीला आणण्या-साठी नकुल, सहदेव, अर्जुन प्रत्येकाला सांगितलं. पण त्यांनी भोजनाला

वेळेवर आणण्याचे कामी असमर्थता दाखविली. नंतर भीमाला शय्यागृहात उठवून सांगितले. त्याने उत्तर दिले– मला आताच कशाला उठवता ? जेवणाची वेळ झाली म्हणजे उठवा. पुढे सर्व पंक्तीला बसले. तूप वाढण्याचे तेवढे राहिले, तेव्हा भीमाला भगवंताला बोलवण्यास सांगितले. त्याला उठवले. 'तू भगवंताला बोलवणार होतास ना' तेव्हा त्यांनी गदा उचलली. धर्मराज म्हणाले, भीमा युद्धाची ही वेळ नाही, जेवण्याची वेळ आहे. भीम म्हणाला, या प्रसंगी गदेची जरूरी आहे. बाहेर येऊन अंगणात गदेला, गदेचीच उपास्य–देवतेची शपथ घातली. आणि ती गदा वर झुगारली. सरळ मानेवरच यायचे अशी शपथ घातली होती आणि त्या वेळी भगवंताचा धावा केला.

रंगा येई वो ये रंगा येई वो ये
विठाई किठाई माझें कृष्णाई कान्हाई ।। धृ० ।।
येईवो वैकुंठवासिनी ।। विठाई जगमय जननी तुझा वेधु माझें मनीं वो
।। ज्ञा. ३५९

न करीं न करीं आतां आळस अव्हेर व्हावया प्रगट कैंचें दूरी अंतरू ।।
तु. १५७३

भगवंताला प्रगट होण्याकरता दुरून कां यावे लागते ? भगवंताने येऊन वरच्या वर गदा हातात झेलली व म्हणाले, 'अरे असे कां करावयाचे, असते !' भीम म्हणाला, 'देवा, एवढ्या वेळात द्वारकेहून आणण्याचा दुसरा कोणता उपाय होता ! म्हणून महाराज म्हणतात–

कोठे न दिसे पाहतां । उडी घालीं अवचिता ।। ३ ।।

भक्त हे भगवंताला आई समजतात. आई ज्याप्रमाणे मुलाला सुखात ठेवते, दुःखाचे प्रसंग आले म्हणजे स्वतः आपण भोगते, त्याप्रमाणे भगवान् आमची आई असल्यामुळे सुख तेवढे आमच्या करता ठेवते. दुःखाचे प्रसंग आले म्हणजे भगवान् आपल्याकडे घेतो हीच गोष्ट अभंगाच्या चौथ्या चरणात सांगतात,

सुख ठेवीं आम्हासाठीं । दुःख आपणचि घोंटीं ।। ४ ।।

मीराबाई या राजकन्या होत्या, लहानपणी आईबरोबर भगवान श्रीकृष्णाचे दर्शनाला गेली असता. भगवंताच्या गळ्यात तिने माळ घातली. तेव्हापासून मी त्याची झाले अशी मीराबाईची दृढ समजूत होऊन बसली.

मैं अपने तो नारायण कीं । हो गयी आपही दासी रे ।।१।। मीरा. ७

मीराबाईचा विवाह व्हावा. म्हणून तिच्या पित्याने ( राजाने ) तिचे स्वयंवर मांडले आणि मीराबाईला स्वयंवरात माळ घेऊन वर पसंत करावयास सांगितले. मीराने ते नाकारले. स्वयंवरात अपकीर्तीचा प्रसंग टाळावा म्हणून.

विष का प्याला राजाजीने भेजा । पीवत मिरा हासी रे ।। २ ।।
मिरा. ७

महाराज म्हणतात, तेव्हा मीराबाईकरिता भगवंताला विष प्राशन करावे लागले. "दुःख आपणचि घोंटी" असाच दुसरा इतिहास महाराज सांगतात–

भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठलें ।
आंबऋषी कारणें जन्म दहा घेतले ।। ३ ।। तु. १५७१
अंबऋषीसाठी जन्म सोशियेले ।। तु. १२७

नाभागाचा पुत्र अंबरीश यांचा द्वादशी व्रताचा नियम होता.

अंबऋषीकारणें द्वादशीचा छंद । तेणें परमानंद प्रगटला ।। २ ।।
एक. २३९१

त्यांच्याकडे द्वादशीच्या व्रतप्रसंगी दुर्वासऋषी आले. अंबऋषींनी त्यांना स्नान करून भोजनास यावे म्हणून सांगितले. व्रतविसर्जनाची वेळ झाली. दुर्वासऋषींना स्नानाहून यावयास वेळ लागला, तेव्हा अंबऋषीने तीर्थप्रसादाने व्रतविसर्जन केले. आपल्यापूर्वीच अंबऋषीने द्वादशी सोडल्याचे कळल्यावर, ते रागावले आणि तुला दहा जन्म घ्यावे लागतील असा शाप दिला. आपल्या भक्ताचा हा छळ होत आहे असे पाहून भगवंताने सुदर्शनचक्र सोडले. सुदर्शनचक्राने त्या कृत्येचा नाश करून ते दुर्वासाच्या मागे लागले. दुर्वासऋषी भगवान विष्णूंना शरण गेला असता

भगवान विष्णूने अंबऋषीस शरण जाण्यास सांगितले. अंबऋषीने दुर्वासांचे स्वागत करून सुदर्शनचक्र शमनार्थ भगवंताची स्तुती केली. तेव्हा अंबऋषी-साठी हे दहा जन्म भगवंतांनी भोगले, म्हणून महाराज म्हणतात, "सुख ठेवी आम्हासाठी" संकटाच्या प्रसंगी भक्तांना पाठीमागे घालून संकटांना आपण तोंड देतात. इतकेच नाही तर प्रसंगी काळाशीही भिडतात. हीच गोष्ट महाराज अभंगाच्या पाचव्या चरणात सांगतात.

आम्हां घाली पाठीकडे । आपण कळिकाळाशीं भिडे ॥ ५ ॥

कुरुक्षेत्रात कौरव-पांडव युद्ध झाले. त्या प्रसंगी–

पाइकु पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला ॥ ज्ञा. १।१४३

आपल्या दासाला अर्जुनाला पाठीशी घालून स्वतः युद्धाच्या तोंडावर राहिला त्या वेळी भगवंतांनी अर्जुनाच्या रथाचे सारथ्य केले.

देखा नवल तया प्रभुचे । अद्‌भुत प्रेम भक्तांचें ।
जे सारथ्यपण पार्थाचे । करितु असे ॥ ज्ञा. १।१४२

पहा त्या प्रभुचे आश्चर्य ! भक्तांवर केवढे अद्‌भुत प्रेम की त्याच्या रथाचे घोडे हाकण्याचे काम भगवान स्वतः करतात, त्या रथाचे काय वर्णन करावे ! खरोखरीच अवर्णनीय.

ध्वजस्तंभावरी वानरु । तो मूर्तिमंत शंकरू ।
सारथी शार्ङ्गधरू । अर्जुनेसीं ॥ ज्ञा. १।१४१

प्रत्यक्ष भगवान शंकर, मारुतीरायाच्या रूपाने ध्वजस्तंभावर भगवान सारथी होऊन अर्जुनाचे रक्षण करीत होते. अठरा दिवसांच्या युद्धापैकी नऊ दिवस गेल्यावर दुर्योधन भीष्माचार्यांकडे आला व त्यांना खोचून वर्माला लागेल असे बोलला की :– तुमच्यासारखा मुख्य सेनापती असताना, युद्धाला नऊ दिवस झाले. आमचे पुष्कळ मेले; पण पांडवांकडचा एकही मेला नाही. याचा अर्थ असा का करू नये, की तुम्ही आमचे अन्न खाता पण शरीर फक्त आमच्याकडे व तुमचे मन पांडवांकडे आहे. हे शब्द भीष्माचार्यांना बोचले व त्यांनी प्रतिज्ञा केली की, उद्या "निष्पांडवी पृथ्वी करीन." ते सत्यप्रतिज्ञ होते. आणि म्हणूनच त्यांचे नाव, देवव्रत असले तरी त्यांना भीष्म म्हणतात.

एकवीस वेळा ज्यांनी निःक्षत्रिय पृथ्वी केली असे परशुराम एका प्रसंगी भीष्मांना म्हणाले, तू माझ्या सामर्थ्याला जाणत नाहीस काय ? भीष्माचार्यांनी गुरुजी परशुरामाला उत्तर दिले त्या वेळी भीष्म जन्माला आला नव्हता म्हणून तुम्हाला क्षत्रियांचा निःपात करता आला.

त्याबरोबर दोघात युद्धाला सुरुवात होऊन एकवीस दिवस युद्ध चालले. दोघे एकमेकाला न आवरणारे पण शेवटी देवांनी मध्यस्थी करून युद्ध थांबवले. असे शूर भीष्माचार्य होते.

हा भीष्मु गंगानंदनु । जो प्रतापतेजस्वी भानु ।। ज्ञा. १।१०५

या एकेकाचेनि मनोव्यापारें । हें विश्व होय संहरे ।। ज्ञा. १।१०६

अशा या सत्यप्रतिज्ञ व महान शूरांवर दुर्योधनांनी विश्वास ठेवावयास पाहिजे होता, पण त्यांनी विकल्प केला व त्यांना म्हटले; या तुमच्या प्रतिज्ञे-प्रमाणे उद्या निष्पांडवी पृथ्वी नाही झाली तर ! तेव्हा भीष्माचार्य म्हणाले, भीष्मांनी प्रतिज्ञा केल्यावर होणार नाही हे काय? परंतु तू विकल्पच केलास तर ऐक. नाहीच झाली तर मी स्वतःचा देह ठेवून देईन. अशी ही भीष्म-प्रतिज्ञा गुप्तहेराकडून पांडवांना कळल्यावर पांडवांचे धाबे दणाणले. इकडे भगवंताला युद्धाचे आमंत्रण देण्याला दुर्योधन व अर्जुन गेले असता भगवंतांनी प्रतिज्ञा केली होती की मी हातात शस्त्र धरणार नाही. भीष्माचे व अर्जुनाचे युद्धास जेव्हा सुरुवात झाली त्यावेळी भीष्माच्या एकाच बाणाने अर्जुनाला मूर्च्छित केले अर्जुन भीष्माशी लढण्याला असमर्थ पाहून देव त्याच्या रक्षणार्थ धावले.

पाइकु पाठीसी घातला । आपण पुढां राहिला ।। ज्ञा. १।१४३

तुज देखतां भीष्माच्या पणीं । म्यां हारी घेऊनि रणांगणीं ।
वांचविला कोदंडपाणी । भक्त चूडामणी अर्जुन ।। भा. १४।१४८

भीष्मपण केला खरा । धनुर्धरा रक्षिले ।। तु.२६५६

आपण कळिकाळाशीं भिडे ।। ५ ।।

काळ म्हणजे सामान्य का आहे ? संपूर्ण जगताचा ग्रास करणारा जो

काळ—

अवधाचि आकार ग्रासियेला काळें ।। तु. ३९२५

न्याहाळा पां केव्हडा । पसरलासे चवडा ।
करूनियां माजिवडा । आकार गजु ।। ज्ञा. १३।६४

काळें खादला हा अवघा आकार। उत्पत्ति संहार घडामोडी ।।तु.३४९९

चौदा कल्प आयुष्य जोडी । त्या मार्कंडेयासि काळ झोडी ।
युगांतीं लोम झडे परवडी । त्या लोमहर्षाची नरडी मुडडिजे काळें ।।
भा. २८।६४४

सृजित्या ब्रह्मयाते काळ पिळी । पाळित्या विष्णुते काळ गिळी ।
प्रळय रुद्राचीही होळी । काळ महाबळी म्हणे करी ।। भा. २८।६४७

असा जरी काळ महाबळी असला तरी परमात्मा त्याच्याशी भिडून आपल्या भक्तांचे रक्षण करतो.

तेवीं मी तया । जैसे असती तैसियां ।।
कळिकाळ नोकोनियां ।। घेतला पटा ।। ज्ञा. १२।८४

कळिकाळाचा पराभव करून भक्ताला मी आपल्या पदरात घेतो.

यमधर्म सांगे दूतां । तुम्हां नाहीं तेथें सत्ता ।। तु. २४४१

तेथे म्हणजे भक्तावर कां नाही, तर त्याचे कारण आहे.

नका जाऊं तया गांवां । नामधारकाच्या शीवां ।
सुदर्शन यावा । घरटी फिरे भोंवतीं ।। २ ।। तु. २४४१
चक्र गदा घेउनि हरि । उभा असे त्यांचे द्वारीं ।। तु. २४४१

एकचि निशी हरीचे नाम ।। तु. ३९२५

या सर्व अभिप्रायाला डोळ्यापुढें ठेवूनच महाराज म्हणतात, "आपण कळिकाळाशी भिडे ।। ५ ।।"

अभंगाच्या शेवटच्या कडव्यात तु. म. सांगतात की, देव दयेचा सागर आहे, आमचा उद्धार करतो.

तुका म्हणे कृपानिधी । आम्हां उतरीं नावेमधीं ।। ६ ।।

देवा तूं कृपा करुणासिंधु । होसी मायबाप आमचा बंधु ।

देवा तूं आमचा कृपाळ । भक्तप्रतिपाळ दीनवत्सल ।

माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ।। तु. ७१०

तुका म्हणे हा तवं कृपेचा सागर । नामासाठीं पार पाववील ।। तु.२७१६

महाराज म्हणतात. देवा ! तुम्ही दयाघन आहात. आम्हाला नावेत घालून या संसारसागरातून पार न्या. भगवंतांनी अशी जाहिरातच लावली आहे.

तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।

भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ।। गी. १२।७

भवसिंधूचेनि माजे । कवणासि धाकु नुपजे ।

येथ जरी कीं माझे । बिहिती हन ।। ज्ञा. १२।८८

म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ।

करूनि त्यांचिया गांवा । धांवतु आलों ।। ज्ञा. १२।८९

नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारीं ।

सजूनियां संसारीं । तारू जाहलों ।। ज्ञा. १२।९०

म्हणूनच म. म्हणतात, 'तुका म्हणे कृपानिधी । आम्हां उतरीं नावे मधीं ।।६।।

## व्याख्यान

अभंगाच्या प्रथम कडव्याचा विचार करावयाचा तो असा :–

महाराज म्हणतात की, तो परमात्मा आमच्याकरता मत्स्य, कच्छ, वराहादी अवतार धारण करतो. पण प्रश्न असा निर्माण होतो की– परमात्मा अवतार जो धारण करतो, तो कोठून येतो ? या प्रथम प्रश्नाचा विचार करू :– परमात्मा हा निर्गुण, निराकार असे जे त्याचे मूळ मुद्दल स्वरूप आहे तेथून अवतार घेऊन येतो.

तें हें अपरांअपार । स्वरूप माझें परात्पर ।

एथूनि ते अवतार । कृष्णादिक ।। ज्ञा. ११।६१४

परात्पर असे जे माझे अमर्याद मूळ स्वरूप तेथून हे कृष्णादिक अवतार होतात.

तें मुद्दल स्वरूप तुझें । जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें ।

जें आकाराचें पैल तीर । जें नादाची पैल मेर ।
तुर्येचें माजघर । परब्रह्म जें ॥ ज्ञा. १३।१०७३

ज्या परमात्म्याचे स्वरूप आकाराच्या पलीकडे आहे.

जें आकाराचा प्रांतु । जें मोक्षाचा एकांतु ।
जेथ आदि अंतु । विरोधी गेले ॥ ज्ञा. ६।३२१

जे स्वरूप आकाराचे शेवट आहे.

अव्यक्त निराकार नाहीं त्या आकार ।
जेथोनि चराचर हरिसी भजे ॥ ज्ञा. ह. पा. ३

जेथून हे सर्व प्राणिमात्र निर्माण होतात ते स्वरूप आकारापलीकडे आहे.

नामरूप संबंधु । जाति क्रिया भेदु ।
हा आकारासीच प्रवादु वस्तूसि नाहीं । ज्ञा. १३।९०४

नामरूप इत्यादी हे सर्व आकाराच्या ठिकाणी असतात. जन्मालाच आला नाही त्याला आकार काय ? परमात्मा हा निराकार आहे.

रंग नाही रूप नही नही बरन छाया ।
निर्विकार निर्गुणही तूंचि रघुराया ॥१॥
मैं गुलाम मैं गुलाम मैं गुलाम तेरा ॥ धृ. ॥ २६३

रूप नाहीं रेखा नामही जयासी ।
आपुल्या मनासीं शिव ध्याय ॥ तु. ३७५६

त्वं शुद्धबोधोऽसि हि सर्वदेहिनामात्माऽस्यधीशोऽसि निराकृतिःस्वयम् ।
प्रतीयसे ज्ञानदृशा महामते पादाब्जभृङ्गाहितसङ्गसङ्गिनाम ॥४॥

--रामगीता.

नव्हता काळा गोरा खुजा ना ठेंगणा ॥
स्वरूप सुंदर ना आंधळा देखणा ॥
कैंचि जीव शिव तयासीं भावना ।
पंचभौतीक ना नेणे पंचप्राण वो ॥ ४ ॥
रूप धरिलें सगुण चांगलें ॥ धृ ॥ नि. १५१

दादु पिंजारी हे महान भक्त आहेत असे कबीर महाराजांनी ऐकले व त्यांच्या भेटीकरता निघाले. शोधीत शोधीत दादूपिंजारीच्या घरी आले आणि

दारात उभे राहून पाहू लागले. त्या वेळी दादूचे लक्ष तिकडे गेले व ते म्हणाले–

इधर उधर क्या देखत है दादु चुरावत पाव।

ए, इकडे तिकडे काय बघतोय ? तुला दिसत नाही का ? की दादू परमात्म्याच्या पायाची सेवा करीत आहे ? हे शब्द कबीर महाराजांना बोचले व चिडून ते म्हणाले–

दादु भडवा क्या चुरावे जिसकूं हात ना पाव।

'जे नादाची पैल मेर' म्हणजे ज्या स्वरूपाचे शब्दाने वर्णन करता येत नाही.

जे शब्दातील स्वभावें ।। ज्ञा. ५।६८

नाही शब्दाधीन वर्म आहे दुरी नव्हे। तंत्रीं मंत्रीं अनुभव तो ।।

तु. २८७६

वाद निमाला शब्द खुंटला। त्रिभुवनी आनंद झाला रे।

एकाजनार्दनीं शरण गेला। तो एकपण विसरला रे ।। एक अ. ३७२५

यतो वाचो निवर्तन्ते ।। तै. ३०९

त्या परमात्म्याला वाचा नाही म्हणून तो बोलत नसेल; पण आम्हाला तरी बोलू द्यावे.

पाणी आपण बोलत नाही व त्यांच्यात गेलेला त्याला बोलू देत नाही. एका बाईची नथ विहिरीत पडली. पाणबुड्याला पचवीस रुपये नथ काढण्यासाठी कबूल केले. त्याने बुडी मारली. त्याला नथ पाण्यात खाली दिसली; त्याला आनंद झाला. सांगावे असे वाटत होते; परंतु पाण्यात आहे तोपर्यंत बोलता येत नाही.

बोलेना बोलों देईना। तेथें पाहणें ते अवघे पारुषलें गे माय ।।

ज्ञा. १८३

तसे परमात्मा स्वतः बोलत नाही, आणि आपल्या संबंधानें दुसऱ्यालाही बोलू देत नाही.

जें जें बोलिजे तें तें नव्हे। होय तें तंव न बोलावे।

सावलितरी न मववे ! मविते जैसें ।। अम. ५।२६

तुका म्हणे वाचा राहिली कुंठीत । पुढे जालें चित्त समाधान ॥ २२९६
मौनपणे वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे ॥ तु. ३७५७

परमात्म्यासंबंधाने बोलण्याचा प्रकार कसा आहे ते ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

शब्देंवीण संवादु दुजेविण अनुवादु । हें तंव कैसेनि गमे ।
परेहि परते बोलणें खुंटलें । वैखरी कैसेनि सांगे ॥ ३ ॥ ज्ञा. अ. ७
तुका म्हणे तूंचि ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा झाली नाहीं ॥
तु. ३७५८

तुमची आमची गोष्ट सोडा; पण सर्वज्ञ असा जो वेद त्यालाही परमात्म्याचे यथार्थ स्वरूपाचे वर्णन करता आले नाही.

वेदु काय काय न बोले । परी येथें नांवचि नाहीं घेतलें ।
ऐसें कांहीं जोडलें । नाहीं जेणें ॥ अमृ. ७।१०७
पाहें पां जाणिवेचेंनि बळें । कोण्ही वेदापासूनि असे आगळें ।
कीं शेषाहूनि तोंडागळें । बोलकें आथी ॥ ज्ञा. ९।३७०
तोही आंथरुणातळवटीं दडे । येरु नेति नेति म्हणोनि बहुडे ।
येथ सनकादिक वेडे । पिसे जाहले ॥ ज्ञा. ९।३७१

वेदापेक्षा कोणी श्रेष्ठ ज्ञानसंपन्न आहे काय ? पण तोही नेति नेति म्हणून त्या स्वरूपापासून मागे फिरतो.

अनुमानेना अनुमानेना ।
श्रुति नेति नति म्हणती गोविंदु रे ॥ ज्ञा. ५
वेद वानूनि तंवचि चांग । जंव न दिसे तुझें आंग ।
मग आम्हां तया मूग । एके पांती ॥ ज्ञा. १४।११

जोपर्यंत तुझ्या स्वरूपापर्यंत पोहोंचला नाहीं, तोपर्यंत वेद वर्णन करून शहाणा ठरतो. परंतु स्वरूपाच्या ठिकाणी वेदाला व आम्हाला मुकाट्यानेच बसावे लागते.

तेथ ब्रह्म आत्मा ईशु । यया बोला मोडे सोरसु ।
न बोलणेंयाही पैसु । नाहीं तेथ ॥ ज्ञा १८।१२१३
यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते ।
[illegible]

या वाणीला गती परमात्माच देतो तेव्हा त्याचे ती वाणी काय प्रकाशन करील ?

तेवि जेणे तेजें । वाचेसी वाच्य सुजे ।
ते वाचा प्रकाशिजे । हें कें आहे ।। अमृ. ५।१५

वाणी ज्याच्या प्रकाशाने वाच्य विषयाला जाणते ती वाचा त्याचे काय प्रकाशन करील ? दुसरे असे की–

विषो नाहीं कोणाही । जया प्रमेयत्वचि नाहीं ।
तया स्वप्रकाशा काई । प्रमाण होये ।। अमृ. ५।१६

जो कोणालाच विषय होत नाही कारण त्याला प्रमेयत्व नाही. तो निर्विषय आहे, अशा स्वयंप्रकाशमानाचे वाणी काय प्रकाशन करील ?

तूर्येचें माजघर । परब्रह्म जें ।। ज्ञा. १३।१०७३

जागृति स्वप्न सुषुप्ती । तिहीं अवस्थातें प्रकाशिती ।
यालागीं तीतें चौथी । तुरीया म्हणती सज्ञान ।। भा. २५।२८६

जागृति स्वप्न सुषुप्तीं । या वेगळी तुरीया स्थिती ।
त्यातें नारायण म्हणती । यथा निगुती सज्ञान ।। भा. १५।१४

तुका म्हणे ते उन्मनी । नाश कारया कारणीं ।। ४ ।। तु. ३३६४

जागृत आणि स्वप्न या दोन कार्यरूप अवस्थेत प्रपंच प्रतीत होतो आणि दोन्ही अवस्थांचे कारण असणारी सुषुप्ती (अज्ञान) अवस्था आहे.

घन अज्ञान सुषुप्ती । तो बीजांकुर भावो म्हणती ।
येर स्वप्न हन जागृती । हा फळ भावो तयाचा ।। ज्ञा. १५।८९

घन अज्ञान अशी निद्रावस्था तिला बीजांकुर म्हणजे कारण अवस्था म्हणतात. जागृती व स्वप्न अवस्था आहेत त्या सुषुप्तीरूपी अंकुराची फल अवस्था म्हणजेच कार्यरूप अवस्था आहेत. या तिन्ही अवस्थांच्या पलीकडे असणारी चौथी अवस्था आहे. तिला तुर्यावस्था म्हणतात. तिचेही परमात्मा अंतर घर आहे म्हणून सज्ञान त्याला नारायण असे म्हणतात.

जेथें नाहीं गुणागुण । नाहीं कार्यासी कारण ।
तो तूं गुणीं गुणातीत । परिपूर्ण रे ।। ३ ।। एकनाथ २३७६
कान्हू सच्चिदानंदु शब्द अरुता रे । त्याही परता तूं निजानंदु रे ।।२।।

परमात्म्याचे श्रुतीने " सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म " असे वर्णन केले आहे.

तैसें असदाचिया व्यावृत्ती। सत म्हणूं आले श्रुती।
जडाचिया समाप्ती। चिद्रूप ऐसें।। अमृ. ५।१०
दु:खाचेनि सर्वनाशें। उरलें तें सुख ऐसें।
निगदिलें निश्वासें प्रभुचेनी।। अमृ. ५।११
म्हणोनी सच्चित्सुख। हे बोल वस्तुवाचक।
नव्हती हें शेष। विचाराचें।। अमृ. ५।१९

असा जो परमात्मा निर्गुण, निराकार, नित्य, शुद्ध, निर्धर्म तो आमच्याकरिता अवतार घेतो म्हणजे सगुण साकार होतो. भगवानही म्हणतात, मी त्या भक्तांच्या प्रेमाकरितां सगुण होतो.

तयालगीं मज रूपा येणें। तयाचेनि मज एथें असणें।
तया लोण कीजे जीवें प्राणें। ऐसा पढिये।। ज्ञा. १२।१८९
जो नित्य सिद्ध सच्चिदानंद। प्रकृतिपर परमानंद।
सगुण झाला जी गोविंद। स्वानंद कंद स्वलीला।। भा. ११।१४६०

आणखी एका लहानशा आक्षेपाचे उत्तर देतो. भगवंताला आपल्य निर्गुण स्वरूपात राहून भक्तांचे रक्षण करता येत नाही काय ? तर नाही. कारण समान सत्तेत साधकबाधक व्यवहार होतात. निर्गुण निराकार परमात्म्याची आहे पारमार्थिक सत्ता व भक्तांचे रक्षणाचे कार्य याची आहे व्यावहारिक सत्ता. दोघांची विषम सत्ता, असल्याने भक्तांचे रक्षणाचे कार्य करता येत नाही. एक उदाहरण देतो. तहान हा प्राणाचा धर्म असून तिची व्यावहारिक सत्ता व मृगजळाची आहे प्रातिभासिक सत्ता; म्हणून मृगजलाने तहनेची निवृत्ती होणार नाही. मृत्तिका व घटाची समान सत्ता आहे. म्हणून मृत्तिका घटाला साधक आहे. अग्नी व काष्ठाची समसत्ता आहे म्हणून अग्नि काष्ठाला बाधक आहे.

तशी भक्तांची आहे व्यावहारिक सत्ता व निर्गुण निराकार शुद्ध चैतन्याची आहे पारमार्थिक सत्ता. म्हणून त्या सत्तेत राहून भक्तांचे रक्षण करता येत नाही. भक्तांचे रक्षर करण्याकरिता भक्त ज्या व्यावहारिक सत्तेत असतो त्याच सत्तेत यावे लागते म्हणून तो सगुण साकार होतो.

ऐसेया काजालागीं। अवतरें मी युगीं युगीं।
[illegible] जगीं। तो विवेकिया।। ज्ञा. ४।५७

# भरिला उलंडूनि

भरिला उलंडुनि रिता करी घट ।
मीस पाणियाचें गोविंदाची चट ।
चाले झडझडां उसंतुनि वाट ।
पाहे पाळतुनी उभा तोचि नीट वो ॥ १ ॥

चाळा लावियेला गोप गोपीनाथें ।
जाणें आवडीचें रूप जेथें तेथें ।
दावी बहुतांच्या बहुवेष पंथें ।
गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो ॥ २ ॥

मनीं आवडे तें करावें उत्तर ।
कांहीं निमित्ताचा पाहोनी आधार ।
उगा राहे कां मारिसी कंकर ।
मात वाढविसी उत्तराउत्तर वो ॥ ३ ॥

धरिली खोडी दे टाकोनियां मागें ।
नये विनोद हा कामा मशीं संगें ।
मिठी घालीन या जीवाचिया त्यागें ।
नाहीं ठाउकीं पडिलीं तुम्हीं सोंगें वो ॥ ४ ॥

सुख अंतरींचें बाह्य ठसठसी ।
म्हणे विनोद हा काय सोंग यासी ।
तुज मज काय सोयरीक ऐसी ।
नंदानंदन या थोरपणें जासी रे ॥ ५ ॥
करी कारण तें कळों नेदी कोणा ।
सुख अन्तरींचें बाह्य रंग जना ।
मन मिनलें रे तुका म्हणें मना ।
भोग अन्तरींचा पावे नारायणा वो ॥ ६ ॥

भूमिका – गोकुळामध्ये असणाऱ्या पुष्कळशा स्त्रियांपैकी तुकाराम महाराज या अभंगात कोणाचा अनुवाद करतात, याची कल्पना करता यावी म्हणून प्रथम हे सांगावयास पाहिजे की, कोकुळातील स्त्रिया होत्या त्या किती अधिकाराच्या हे प्रथम सांगावयास पाहिजे.

कोणी सुना कोणी लेकीं । कोणी एकी सतंता ॥ १ ॥ १५१

गोकुळामध्ये जेवढया म्हणून स्त्रिया होत्या, त्या सर्व तीन अधिकाराच्या होत्या. काही लेकी, काही सुना, काही स्वतंत्र सासवा. अशा तीन अधिकाराच्या स्त्रिया होत्या.

या तीन अधिकारांपैकी तुकाराम महाराज या अभंगात कोणाचा अनुवाद करतात ? सासवांचा किंवा लेकींचा अनुवाद करीत नाहीत, तर सुनांचा अनुवाद करतात, " भरिला उलंडूनि रिता करी घट "

यावरून या अभंगात केवळ सुनांचा अनुवाद करतात हे स्पष्ट दिसते ! त्याचा अभिप्राय सांगण्यापूर्वी एक सांगतो की गोकुळातील जेवढया स्त्रिया होत्या, मग त्या लेकी असोत, सुना असोत, अथवा सासवा असोत– त्या सर्वांचे भगवंतावर निःसीम प्रेम होते.

एक विषय तो सकळांचा हरि ।
त्याच्या आवडीने आवडी इतरीं ।

अंध बहिर हे प्रेते लोकाचारी ।
त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरीं वो ।। तु. ११०

त्या सर्वांचे भगवंतावर किती प्रेम होते हे सांगण्याकरिता कितीही प्रयत्न केला तरी ते शब्दाने सांगता येणार नाही.

प्रेम नये सांगता बोलतां दावितां ।
अनुभव चित्ता चित्त जाणे ।। १ ।। तु. ३५५८

प्रेम नावाचे तत्त्वच असें अनिर्वचनीय आहे. ते मी काय सांगणार ! तात्पर्य, स्त्रिया मात्र जेवढ्या त्या सर्वांचे भगवंतावर प्रेम होते.

त्या सर्वांच्या प्रेमाचा विषय एक परमात्माच होता. त्या जरी भिन्न जातीच्या होत्या तरी भगवंतावर प्रेम मात्र सर्वांचे सारखे होते. त्यांचे भगवंतावर जे प्रेम ते औपचारिक नव्हते. त्यात हेतू नव्हता. त्यांचे प्रेम निर्हेतुक, निरुपचारी होते. देवावर जे प्रेम होते, ते देवाकरताच होते. पण इतरांवर जे प्रेम होते, इतरांकरिता नसून देवाकरताच होते. त्या सासूवर जे प्रेम करीत होत्या ते सासूकरिता नसून देवाकरताच होते, तसेच सासऱ्यावर जे प्रेम होते, ते सासऱ्याकरिता नव्हते, दीरावर जे प्रेम ते दिराकरिता नव्हते. फार काय पण त्या नवऱ्यावर जे प्रेम करीत होत्या ते नवऱ्याकरता नसून देवाकरताच होते. जर त्यांचे नवऱ्याकरिता नवऱ्यावर प्रेम असते तर त्या नवऱ्याला सोडून श्रीकृष्णाकडे गेल्याच नसत्या

एकी असतील घरीं चित्त तयापासीं परी ।
वेगीं करोनिवो सारी तेथें जाऊं पाहे ।।
लाज सांडियेली वोज नाहीं फजितीचें काज ।
सुख सांडोनियां सेज तेथें धांव घाली ।। ४ ।। तु. १२५

सुना आपल्या घरी असायच्या, त्या काम करीत असायच्या, पण त्यांचे कामावर चित्त नसावयाचे. सर्व चित्त भगवान कृष्ण परमात्म्याकडे होते. चित्त जर नाही, तर घरातले काम कसे नीट होईल ? सून घरातले काम करीत असताना तिचे चित्त कामावर नाही, असे सासूने ओळखले.

आजी कां वो तू दिससी दुश्चित्ती ।
म्हणिये काम नलगे तुझ्या चित्तीं ।

दिले ठेवूं तें विसरसी हातीं ।
नेणों काय बैसला हरि चित्तीं वो ॥ १ ॥ तु. १११

सासू म्हणाली, सांगितलेले काम तुझ्या ध्यानात येत नाही. काही ठेवण्याकरता द्यावे, त्याचा विसर पडतो. तेव्हा तुझ्या चित्तात हरि येऊन बसला आहे ना! कारण हरीकडे जाण्याकरिता सर्व काम घाईघाईने बाजूला सारून तिची तयारी झालेली दिसली. असे ज्या वेळी लोकांना दिसले, तेव्हा ते निंदा करू लागले.

अवघियांची जग निंद । झाली धिंद सारखी ॥ २ ॥ तु. १५१
जन निंदा होय तो बरा व्यापार । थोरवीचा भार कामा नये ॥ तु.२७२६

साधक हा परमार्थ मार्गाला लागल्यावर लोक जितकी निंदा करतील तितके बरे. त्याचा जर मान करतील तर त्याचा सर्व परमार्थ संपतो.

इहलोकीं आम्हां भूषण अवकळा । भोपळा वाकळा अन्न भिक्षा ॥
तु. १९८३

लोकांनी निंदा करणे फटफजीती करणे हे बरे. पाणी पिण्याला चांदीच्या प्याल्याऐवजी भोपळा व अंगावर शालेच्याऐवजी वाकळा पाहिजे. मला वाटते की एकवेळी महाराजांना हा मोठेपणा प्राप्त झाला असावा, त्यांचे महत्त्व वाढले असावे म्हणून ते देवाजवळ मागणी करतात, हे प्रभो ! हे नारायणा !

करा दंड नारायणा । माझ्या मानाची खंडणा ॥ २ ॥ तु. १७५०
लाज सांडियेली वोज नाहीं फजितीचें काज ॥

म्हणून त्या गोपी लोकनिंदेकडे पहात नसत. त्यांचे तिकडे लक्ष नसे. एक कथा सांगतो. दुर्वासांनी राधेला प्रश्न केला, आताच मला नारदाची गाठ पडली व त्यांनी तुझ्याविषयी फारच आदराने आपली भावना व्यक्त केली आहे, पण जग तर तुला व्यभिचारिणी म्हणते, तुझी निंदाही ऐकण्यात येते, तेव्हा तुला काय म्हणावे ? ह्या विरोधाचा परिहार कसा होणार ?

हा प्रश्न ऐकून राधेने उत्तर दिले, 'महाराज ! आपल्या या प्रश्नाचे उत्तर मी समाधानकारक असे कसे देऊ शकेन ? कारण जग माझ्याविषयी काय बोलत आहे हे ऐकण्यास माझे कान तिकडे जातील तरच ते कळू शकेल ?

तुका म्हणे हांसे जन । नाहीं कान ते ठायी ॥ ४ ॥ तु. १३९

त्यांचे जर प्रेम पतीवर पतीकरता असते तर त्या पतीला सोडून भगवान कृष्ण परमात्म्याकडे गेल्या असत्या काय ? पुष्कळशा स्त्रिया भगवान श्रीकृष्णाकडे जात असत. या सर्व गौळणी भगवान श्रीकृष्णाकडे जाताना एका ब्राह्मण बाईने पाहिले. तिलाही जावे असे वाटणारच. नवरा घरामध्ये नव्हता. तो नरमगरम नव्हता. मोठा सणसणीत, पाणीदार होता. नवरा घरात असताना ती भगवंताकडे जाण्याला निघाली, तेव्हा नवऱ्याने विचारले, ए, तू जातेस तरी कुठे ? तेव्हा ती म्हणाली, कृष्णाकडे जाते. ते ऐकून नवऱ्याची खोपडी फिरली.

एक ब्राह्मण अति शास्त्रबळें । पत्नीसि येवूं नेदी मज जवळे ।
तुम्ही वेदशास्त्रांही वेगळें । गुराखी गोंवळे केवीं पूजा ॥ भा. १२।९९

अग, मी तुझा नवरा ना ! परीट न्हावी नव्हे तर मी ब्राह्मण आणि तोही खेड्यातला. मी अडाणी नव्हे. शहरातला वेदशास्त्रसंपन्न. तू ज्या कृष्णाकडे जातेस त्या कृष्णाच्या आईबापांचा तरी ठिकाणा आहे काय ?

एक म्हणती नंदाचा । एक म्हणती वसुदेवाचा ।
ठावचि नाही बापाचा । अकुळीचा श्रीकृष्ण ॥ रुक्मि. स्वयं.

काय गौळ्याचे पोर, कडू कारले, भगवान 'कडू' आणि हा झाला गौड !

येरी समस्तां जातां देखोन । तिचें मजलागी तळमळी मन ।
अति कर्मठ तो ब्राह्मण कठिण । अवरोधून राखिली ॥ भा. १२।१००

पित्यानें लाविलीस माझ्या हातीं । तेव्हांच मी तुझ्या देहाचा पती
मज सांडूनि केउती । गोवळाप्रती जातेसी ॥ भा. १२।१०१

तेव्हा ती स्त्री म्हणते,

येरी म्हणे तू या देहाचा पती । तो देह ठेऊनियां तयाप्रती ।

तेव्हा त्या स्त्रीने स्थूळ शरीराला तिथेच सोडून सूक्ष्म देहाने भगवान श्रीकृष्णाकडे निघून गेली. त्या जे देवावर प्रेम करीत होत्या त्या देवाकरिताच होत्या.

एक विषय तो सकळांचा हरि । त्याच्या आवडीनें आवडी इतरीं ।
अंध बहिर हे प्रेत लोकाचारी ।
त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरी वो ।। तु. ११०

भगवंताचे प्रेम असे आहे की, त्या प्रेमात देशकाळाची खबर राहात नाही. भगवान कृष्णाच्या प्रेमाने प्रपंचमात्राचा विसर पडला.

मिळोनियां याती । येती नारी कुमारी बहुती ।
नाहीं आठव त्या चित्तीं देहभाव कांहीं । विसरल्या घरें ।
तान्हीं पारठीं लेकुरें । धाक सांडोनिया येरें ।
तहान भूक नाहीं ।। तु. १२५

याप्रमाणे मला एवढेच सांगावयाचे की – गोकुळातल्या जेवढ्या म्हणून स्त्रिया होत्या, त्या सुना असोत वा लेकी असोत वा सासवा असोत त्या सर्वांचे भगवंतावर निर्निमित्त प्रेम होण्यास्तव, त्यांना हेच आवडावे. नेहमी नेहमी त्या भगवान श्रीकृष्णाचे दर्शन घ्यावे, त्यालाच पाहावे. त्याला नेहमी पाहून देखील अतृप्तच राहात.

तृप्ति भुकेली काय करूं माये ।
जीवनीं जीवन कैसें तान्हेजत आहे ।
मन धालें परि न धाये ।
पुढत पुढती राजा विठ्ठलु पाहे ।। २ ।।ज्ञा. २६१

अनन्य प्रीतीचा प्रकार असाच आहे.

वत्स धालयाही वरी । धेनु न वचावी दुरी ।
अनन्य प्रीतीची परी । ऐसीच आहे ।। ज्ञा. १८।७८
तेणें काजेंवीणही बोलावें । तें देखिले तरी पाहावें ।
भोगितां चाड दुणावे । पढियंतयाठायीं ।। ज्ञा. १८।७९
ऐसी प्रेमाची हे जाती । ज्ञा. १८।८०
[illegible] ।

म्हणोनि हा उचीतचि । अनुवाद सिद्ध ॥ अमृ. १०।१३

तो मज व्हावा तो मज व्हावा ।

वेळो वेळां व्हावा पांडुरंग ॥ ज्ञा. ३२३

त्या रावीचे कडेलोटीचे प्रेम होते, त्यांना काय तिकडेच जावे वाटे. पण जाता कसे येईल ?

सून म्हणजे परतंत्र, सर्वथैव परतंत्र. घरातील सर्व माणसांचा ताबा तिच्यावर. त्यात मुख्य पतिराज घरात, तेव्हा घराबाहेर तर जायचे पण कामावाचून जाण्याची सोय नाही, स्वतंत्रता नाही. म्हणून भगवान श्रीकृष्णाकडे जाता येईना. मग पाण्याने भरलेला घरातील घट उलंडून टाकायचा आणि सासुबाईला म्हणायचे पाण्याला जाते हो सासुबाई; मग जायची, पण कशी जायची, खटारा गाडी जाते त्याप्रमाणे नाही, तर पंजाब-मेल म्हणा अथवा दख्खनची राणीप्रमाणे झपझप.

याप्रमाणे पाण्याचे निमित्त करून त्यांनी जावे. घरातून बाहेर का पडली ते अभंगाच्या दुसऱ्या चरणात सांगतात.

चाळा लावियेला गोप गोपीनाथें । जाणें आवडीचें रूप जेथें तेथें ।

दावी बहुतांच्या बहुवेष पंथे । गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो ॥ २ ॥

गोपाळ गोपीयांचा स्वामी जो श्रीकृष्ण त्याने आम्हाला छंद लावून टाकला.

तुका म्हणे छंदें । येणे वेधिलीं गोविंदें ॥ ४ ॥ तु. ११४

कोणाचे किती खरं प्रेम आत आहे, ते तो परमात्मा घेतो.

अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ १ ॥ तु. ३६९६

न सांगता तुम्हीं कळों येतें अंतर ।

विश्र्वीं विश्र्वंभर परिहारचि न लगे ॥ २ ॥ तु. ४५८

परमात्मा खरा खरा मनकवडा आहे.

जाणें आवडीचें रूप जेथें तेथें ॥ २ ॥

तिसऱ्या कडव्यात सांगतात–

मनीं आवडे तें करावे उत्तर । कांहीं निमित्ताचा पाहोनि आधार ।

जगा राहे कां मारिसी कंकर । मात वाढविसी उतराउत्तर वो ॥ ३ ॥

परमात्म्यानी खडे न मारतानाच त्या म्हणावयाच्या की, अरे खडे का मारतोस ? असे काही तरी निमित्त पाहून मात वाढवावी म्हणजे भगवंताशी बोलण्याची संधी निर्माण करावयाची.

तुकाराममहाराज चवथ्या कडव्यात सांगतात–

धरिली खोडी दे टाकोनियां मागे ।
नये विनोद हा कामा मशीं संगे ।
मिठी घालीन या जिवाचिया त्यागे ।
नाहीं ठाउकीं पडिलीं तुझीं सोंगे वो ॥ ४ ॥

बाहेरून भांडण्याचा अवतार आहे, पण आतले प्रेम आवरत नाही असा तो गोड सवाद आहे. भगवंताला ती म्हणते, अरे या खोडचा टाकून दे. असला विनोद मजजवळ चालणार नाही, पण असे म्हणताना त्यांना आत तर गुदगुल्या होतात.

मिठी घालीन या जीवाचिया त्यागे ।
आता या जीवाचिया सांठी । न सोडी पडलिया मिठी ॥ तु. ६३१

परमात्म्याच्या पायाला मिठी घालण्याकरता जीवाचा त्यागच करावयास पाहिजे.

तुका म्हणे बळी । जीव दिला पायांतळी ॥ ४ ॥ ९९१

आजपर्यंत तुझी सोंगे माहीत पडली नव्हती. आता म्हणजे जीवदशेचा त्याग करून तुझ्या स्वरूपासी ऐक्याला पावल्यानंतर ठाऊक पडली.

भगवंताला पाहिल्याबरोबर सुख होणारच कारण परमात्मा सुखाचा सागर आहे.

सर्व सुखाचे आगर । बाप रखुमादेविवर ॥ ज्ञा. १

ते अंतःसुख आहे.

तरी सुख ते गा किरीटी । दाविजेल तुज दिठी ।
जे आत्मयाचिये भेटी । जीवासि होय ॥ ज्ञा. १८।७७३
किंबहुना सोये । जीव आत्मयाची लाहे ।

ते बाहेर पडले म्हणजे.

सुख अंतरीचें बाह्य ठसठसी । म्हणे विनोद हा काय सांग यासी ।
तुजमज काय सोयरीक ऐसीं । नंदानंदन या थोरपणें जासी रे ।।५।।

भगवान कृष्णाला पाहिल्याबरोबर आत आनंद मावेनासा झाला म्हणून ती म्हणते की – तुझे माझे नाते ते काय, बरोबरी का आहे ?

हरी तुझी कांतिरे सांवळी । मी रे गोरी चांपेकळी ।
तुझ्या दर्शने होईन काळी । मग हें वाळी जन मज ।। तु. १२१
तू गौळयांचा मी सुंदर राधा, तुज मज काय सोयरीक ऐसी ।
नंदानंदन या थोरपणें जासी रे ।। ५ ।।

तूं नंदराजाचा मुलगा म्हणून घमेंडीवर जातोस !
सहाव्या कडव्यात सांगतात,

करी कारण ते कळों नेदी कोणा । सुख अंतरीचें बाह्यरंग जनां ।
मन मिनले रे तुका म्हणे मना । भोग अंतरींचा पावे नारायण ।। ६ ।।

परमात्मा केव्हा काय करील हे कोणाला कळणार नाही.

नेदी कळो केल्याविणा तें कारण ।
दाखवी आणून अनुभवा ।। तु. ४४

भगवंताचे राजकारण सर्व झाल्यावर कळायाचे. त्याशिवाय आधी कळणार नाही. तो अनुभवाला आणून दाखवितो. भगवद्स्वरूपात मन मिळाल्यावर खरे आत्मसौख्य भोगायला मिळते. ते शेवटच्या कडव्यात सांगतात–

मन मिनले रे तुका म्हणे मना ।
परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियातें आपण देखे ।
देखत खेवो वोळखे । म्हणे तत्त्व ते मी ।। ज्ञा. ६।३६६
तिये ओळखीचिसरिसें । सुखाचियां साम्राज्यीं बैसे ।
चित्तपण समरसें । विरोनीं जाय ।। ज्ञा. ६।३६७

ज्या वेळी मन आत्मस्वरूपाला पाहाते, त्या ओळखीबरोबर सुखाच्या

तैसें होय तिये मेळी । मग सामरस्याचियां राउळीं ।

महासुखाची दिवाळी । जगेंसि दिसे ॥ ज्ञा ॥ ६।३८९

मन परमात्मस्वरूपी मिळाल्यावर एकरस होते आणि त्याला जगासह महासुखाची दिवाळी दिसते.

परमात्मस्वरूपी मन मिळाल्यावरच महानंदाचा भोग घडतो.

तुका म्हणे मोकळे मन । नारायण भोगासी ॥ तु. १४९

त्या सर्व गोकुळनिवासी स्त्रियांचे मन, भगवंताच्या ठिकाणी असून शरीर फक्त प्रपंचात होते.

मन हें गोविंदीं देह काम करी वो ॥ तु. १११

## व्याख्यान

या अभंगाच्या प्रथम कडव्याचा थोडक्यात विचार सांगावयाचा तो असा– या अभंगात कोणाचा अनुवाद करतात, हे प्रथम सांगितले की, गोकुळातल्या ज्या, स्त्रिया होत्या त्यांपैकी सुनांचा अनुवाद तु. म. करतात, त्या स्त्रिया पाण्याने भरलेले घट उलंडून, पाण्याचे निमित्त करून भगवान कृष्णाच्या भेटीला जात असत.

पाहे पाळतूनी उभा तोची नीट वो ॥ १ ॥

पाहतात तो भगवान श्रीकृष्ण समोर उभा आहे. हा वाच्यार्थ झाला. मला वाच्यार्थ सांगून भागवावयाचे नाही. तुम्हाला माहीतच असेल की– होईल तितका अर्थ वाच्यार्थाने लावावा. पण जेथे वाच्यार्थाने अर्थ जुळत नसेल तेथे लक्ष्यार्थाने अर्थ लावावा. उदाहरणार्थ, गंगायां घोषः गंगेवर गौळ्यांची घरे आहेत, असे म्हटले तेव्हा गंगेच्या पाण्यावर घरे असणे संभवनीय नाही. म्हणून हा वाच्यार्थ टाकून गंगेच्या तीरावर गौळ्यांची घरे आहेत, असा लक्ष्यार्थ घ्यावा. योग्य अर्थ होण्याकरिता लक्ष्यार्थ घ्यावा लागतो. दुसरे उदाहरण सांगतो. गोविंदाच्या घराला पिंपळावरून जाण्याचा मार्ग आहे. याचा वाच्यार्थ – गोविंदाच्या घराला पिंपळावर चढूच जावे असा अर्थ नाही. म्हणून पिंपळाजवळ असा लक्ष्यार्थ घेऊन अर्थ [illegible]

असला पाहिजे. कसा तो सांगतो. त्या स्त्रिया भरलेला घट रिता करीत आणि पाण्याचे निमित्त करून भगवान श्रीकृष्णाच्या भेटीला जात. या अभंगात मातीचा घट सांगावयाचा नाही.

तु. म. ना यापेक्षा वेगळेच सांगावयाचे आहे. तो घट कोणता ?

तर साडेतीन हाताचे जे मनुष्यशरीर आहे तो घट आहे. तुम्ही म्हणाल, याला काही आधार, प्रमाण आहे काय ? तर रगड प्रमाणे आहेत.

सर्वांघटी राम देहादेही एक ।
सूर्य प्रकाशक सहस्र रश्मी ॥ ज्ञा. ह. पा. १९

नरनारीच्या शरीराला घट ही संज्ञा ज्ञा. म. नी दिली आहे.

ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान ।
सर्वांघटी पूर्ण एक नांदे ॥ ज्ञा. ह. पा. ७
जप तप कर्म क्रिया नेम धर्म ।
सर्वांघटी राम भाव शुद्ध ॥ ज्ञा. ह. पा. २४
फिरविला घट फोडिला चरणीं ।
महावाक्य ध्वनी बोंब झाली ॥ तु. ४०११

प्राणिमात्रांच्या शरीराला घट म्हटले आहे. तसेच गोकुळामध्ये जवढ्या स्त्रिया होत्या, त्या कोण होत्या ? कर्मपर ज्या श्रुती त्या सुना झाल्या, वेदगर्भित जेवढ्या म्हणून कर्मपर श्रुती आहेत त्या गोकुळामध्ये सुना झाल्या. सुना या जशा परतंत्र तसाच कर्माचा अधिकार परतंत्र आहे.

त्या जाण वेदगर्भींच्या श्रुती । श्रुतिरूपें नव्हेचि मत्प्राप्ती ।
तैं परतल्या म्हणोनि नेति नेति । माझी सुख संगती न पवेचि ॥
भा. १२।१६३

विषयबुद्धी तें मुख्य अज्ञान । ते असतां मी न भेटे जाण ।
असता वेदोक्त जाणपण ।
तेणेंही संपूर्ण न भेटे मी ॥ भा. १२।१३४
जाणीव नेणीव गेलिया निःशेष । माझें पाविजे निजात्मसुख ।
श्रुति जाणोनि हें निष्टंक ।
[illegible] ॥ भा. १२।१६८

त्याची जाण समस्त श्रुती ।
गोपिकारूपे गोकुळा येती ॥ भा. १२।१६६

कर्माचा अधिकार परतंत्र म्हणून कर्मपर श्रुती सुनाझाल्या.

शिखा सूत्र तुझा गुंतला जमान ।
तोवरी तू जाग श्रुतिदास ॥ तु. ३३३४

जोपर्यंत शिखा व सूत्र आहे, तोपर्यंत तू श्रुतीचा दास आहेस, याचे रहस्य वेदाने वर्णाश्रमास अनुसरून सांगितलेले विहित कर्म करणे अवश्य आहे. वेदाज्ञेचे उल्लंघन करता कामा नये.

त्याची तुज कांहीं चुकतांचि नीत ।
होसील पतीत नरकवासि ॥ तु. ३३३४

कर्माचे अचरणात चुकल्यास अधोगतीला जावे लागते.

जे विधिपूर्वक संकल्पयुक्त ।
कर्म त्यागित संन्यासी ॥ भा. २०।७४

ज्यांच्या अंत:करणात ब्रह्मलोकापर्यंत असलेल्या भोगाविषयी वैराग्य उत्पन्न झालेले आहे. आणि शास्त्राने सांगितलेल्या विधीला आनुसरून शेंडी आणि जानव्याचा त्याग केला.

निर्विण्णानां ज्ञानयोगो न्यासिनामिह कर्मसु ॥ भा. २०.
शिखा सूत्र याचा तोडीं तू संबंध ।
मग तुज बाधू नाहीं नाही । तु. ३३३४

याच्यात अवघड काय ? असे कोणी म्हणेल. न्हाव्याकडे जाऊन सर्व सागर-गोटा करावा व जानवे हाताने काढून टाकून द्यावे. शिखा सूत्र धारण करण्याचा विधी आहे. त्याला उपनयन संस्कार म्हणतात. तसेच ते टाकण्याचाही विधी आहे. चैनीकरता टाकावयाचे नाही. तेव्हा परमात्मप्राप्तीकरिता कर्माच्या अधिकाऱ्याने सत्कर्म करावयास पाहिजे. विहित कर्माचा आणि परमात्म-प्राप्तीचा कार्यकारण भावसंबंध काय आहे हे सर्व सांगणार आहे.

सुनेने काय करावयाचे ? शरीररूपी घट रिता करावयाचा. ते कसा ? घट कोणता हे सांगितले. आणि कोणते पाणी रिते की जे ते तिने उलंडले ?

त्या घटात कर्तृत्वमद आणि कर्मफलाचा आस्वाद हे आहे पाणी. मनुष्यमात्र कोणीही असो त्याच्यात कर्तृत्वमद आणि कर्मफलाचा आस्वाद आहेच. कर्तृत्वमद कर्माचा अभिमान.

तप करूनि तीर्थाटन ! वाढविला अभिमान ।। ४ ।। २९२२

वाटिलें तें धन । केली अहंता जतन ।। ५ ।। २९२२

मनुष्याने थोडे का सत्कर्म केले की त्याचा अभिमान बाळगतो. समजा, कोणी एखादा काशीला जाऊन आला तर तो गुपचूप यावयाचा नाही. मारुतीच्या देवळात बसेल. मग तेथून वाजंत्री लावून गावातून मिरवीत येतो. का म्हणून ? लोकांना माहीत झाले पाहिजे ना ? त्याला कोणी काशी-फळाची भाजी का वाढावयास लागला की, दूरूनच भाजी कशाची आहे विचारले. त्याला डोळे आहेत, समोर दिसते पण लोकांना कळायला पाहिजे ना की, हे गृहस्थ काशीला गेले होते. मग साहजिकच कोणी विचारले की आपण काशीला गेले होते वाटते. तर तो म्हणतो, माहीत नाही वाटते ! अहो, नुसती काशीच काय, सर्वच यादी ठेवतो. बरे फळ सोडायचे म्हणजे ते काशीफळ. त्याला चव ना ढव; पण विचारल्यावर सर्वच पुराण सांगत सुटतो. तसे सत्कर्म करायचे थोडे, उदाहरणार्थ, ब्राह्मणाला चार दिडक्या दक्षिणा द्यायची, पण त्यात माझे पाप, माझ्या बायकोचे पाप सकळ कुटुंबाचे पाप गेले पाहिजे असाच संकल्प सोडतो.

तरी कवडचा एकासाठीं । अशेषां गोत्रांचींच किरीटी ।

सर्व प्रायश्चित्तें सुये मुठी । तयाचिये ।। ज्ञा. १७।२९०

आवळा द्यायचा आणि कोहळा घ्यायाचा. तो रजोगुणी पुरुष विधि-विधान बरोबर करतो.

क्रिया विशेषें बहुतें । न लोपिती विधीतें ।

निपुण होऊनि धर्मातें । अनुष्ठिती ।। ज्ञा. २।२४९

परी श्राद्धालागी जैसा । अवंतिला रावो ।। ज्ञा. १७।१८५

जरी राजा घरासि ये । तरी बहुत उपेगा जाये ।

आणि कीर्तीही होये । श्राद्ध न ठाके ।। ज्ञा. १७।१८६

हे रजोगुणी पुरुष विधी विधान बरोबर करतात. पण चुकते ते एवढेच की ते कर्तृत्वमद व कर्मफळाचा आस्वाद घेऊनच कर्माला आरंभ करतात.

एखादे पर्व आले म्हणजे हे लोक दान करतात. 'दाता दे दान सुटे चांद गिन्हाण ' एक रजोगुणी महालुच्चा होता. त्याने ब्राह्मणाला आपले भारो-भार गाजरे दान केली. ब्राह्मण गेल्यावर हा सारखा वर पाहत होता. वाटेने जाणाऱ्या कोणी गृहस्थाने त्याला विचारले की, आपण असे वर एकसारखे टक लावून काय पाहता ? तेव्हा त्याने सांगितले की, मी विमानाची वाट पाहत आहे. वाट पाहण्यासारखे आपण केले तरी काय ? तो म्हणाला केले काय म्हणजे ? माझ्या भारोभार ब्राह्मणाला गाजरे दान केली. म्हणून विमानाची वाट पाहतो आहे. फुकट नाही वाट पाहत ! तुझ्या बापाने ठेवले आहे विमान ! कर्मकर्त्याच्या अंतःकरणात कर्तृत्वमद (कर्माचा अभिनिवेश ) आणि कर्मफलाचा आस्वाद ( कर्मफलाची इच्छा ) असेल तर मोक्षा-प्राप्ती होणार नाही. हा प्रतिबंध आहे. या दोन्हींविषयी किती अनासक्त असले पाहिजे. ते माउली सांगते.

पैं अवज्ञा आणि कामना । मातेचां ठायीं अर्जुना ।
केलिया दोनी पतना । हेतु होती ।। ज्ञा. १८।२०२

आईची अवज्ञा करणारा ( आज्ञा न पाळणारा ) आणि कामना करणारा ( आईच्याविषयी पापवासना) असला एखादा पशुवृत्तीचा असला तर त्याला पतनाला नेण्याला कारण आई नाही, तर तिची केलेली अवज्ञा आणि तिच्याविषयी केलेली कामना या पतनाला कारण आहेत. तसे विहित कर्म पतनाला कारण नसून कर्मातील कर्तृत्वमद आणि कर्मफलांचा आस्वाद पतनाला ( बंधनाला ) कारण आहेत.

तरी दोनीं ये त्यजावीं ।· मग माताचि ते भजावी ।
वांचूनि मुखालागीं वाळावी । गायचि सगळी ।। ज्ञा. १८।२०३

आईची सेवा कर्तव्य म्हणून करावी. त्याप्रमाणे कर्तृत्वमद आणि कर्मफलाचा आस्वाद टाकून विहित कर्म करावे. ते कर्तव्य म्हणून करावे. गाय मुखाच्या जागी अपवित्र असली ती विष्ठा खाते म्हणून तेवढ्या वैगुण्या-करिता का सर्व गायींचाच त्याग करावा! तर नाही. तसेच विहित कर्मात कर्तृत्वमद व कर्मफलाचा आस्वाद एवढे वैगुण्य असले म्हणून तेवढ्याकरता कर्मच टाकून द्यावे का ?

मरिला उलंडूनि

आवडतिये फळीं । असार सारी आंठोळी ।
त्यासाठी अवगळी । फळातें कोण्ही ।। ज्ञा. १८।२०४

हापूस नावाचा प्राख्यात असा जरी आंबा असला तरी त्यातील सालपट आणि कोय हा असा भाग टाकून तो खावा. सालपट आणि कोयीकरिता कोणी सर्व फळाचा त्याग करील काय ? एकाने हापूसचा आंबा घेतला आणि सगळा तोंडात टाकला. तो घशात आडकला. मानेवर बुक्क्या मारल्या तेव्हा तो बाहेर पडला. तेव्हा हापूसचा आंबा नको म्हणून टाकून दिला. तेव्हा त्याला सांगितले की, साल व आठोळी टाकून मग तो खा ! तसेच कर्तृत्वमद आणि कर्मफळाचा आस्वाद टाकून विहित कर्माचे अचरण करावे. सगळे कर्मच टाकावे असा त्याचा अर्थ नाही. मग ते कर्म कसे करावे ?

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानिच ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ।। गी. १८।६

या श्लोकावर ज्ञानेश्वर महाराज लिहितात–

तरी महायागप्रमुखें । कर्मे निफजतांही अचुकें ।
कर्तेपणाचें न ठाके । फुंजणे आंगीं ।। ज्ञा. १८।१६६
जो मोलें तीर्था जाये । तया मी यात्रा करितु आहें ।
ऐसिये श्लाघाची नोहे । तोषु जीवीं ।। ज्ञा. १८।१६७

काही श्रीमंत आपल्या शरीराकडून होत नाही पण आपल्याला पुण्य घडावे म्हणून तीर्थाला जाण्याची इच्छा करणाऱ्या गरीबाला आपण पैसे देऊन पाठवितात. दुसऱ्याच्या पैशाने तीर्थाला जाणारा गरीब मनुष्य मी यात्रा करतो आहे, असा मोठेपणाचा, फुंज घेत नसतो.

कां मुद्रा समर्थाचिया ! जो एकटु झोंबे राया ।
तो मी जिणता ऐसिया । नयेची गर्वा ।। ज्ञा. १८।१६८

त्याप्रमाणे निष्ठापूर्वक, विधियुक्त सत्कर्माचे अचरण करून निष्काम व निरभिमान राहिले पाहिजे.

तुका म्हणे गुरें राखोनि गोंवारी । माक्षी म्हणे परि लाभ नाही ।। तु. २१५५

आपल्या इच्छेचा मोर्चा फळाकडे वळू देऊ नये. म्हणजे फळाविषयी इच्छा उत्पन्न होऊ देऊ नये.

सांडुनि दुधाची टकळी । गोंवारी गांवधेनु वेंटाळी ।
किंबहुना कर्म फळीं । तैसें कीजे ॥ ज्ञा. १८।१७४

याप्रमाणे कर्माचा कर्तृत्वमद व फलाची इच्छा टाकून कर्मे करावी.

परि हें मियां केलें । कीं हें माझेनि जालें ।
ऐसें नाहीं ठेविलें । वासनेमाजीं ॥ ज्ञा. १३।५२६

आधींचि फळीं आस तुटिया । कर्म आरंभावीं धनंजया ।
परावें बाळ धाया । पाहिजे जैसें ॥ ज्ञा. १८।१७२

हा मूलगा विद्वान होऊन मला वृद्धपकाळी सुख देईल अशी इच्छा दाईला नसते. ती दाई निरिच्छबुद्धीने त्याचे पालन करते.

मायबापें सांभाळिती । लोभा कारणें पाळिती ॥ १ ॥ तु. ३७३९

आईच्या ठिकाणी लोभ असतो. दाईच्या ठिकाणी लोभ नसतो. आंब्याच्या, डाळिंबाच्या, मोसंबीच्या झाडाला पाणी देत असताना फळाची इच्छा नसते.

पिंपरुवांचिया आशा । न शिंपिजे पिंपळु जैसा ।
तैसिया फळनिराशा । कीजती कर्में ॥ ज्ञा. १८।१७३

तितक्या निष्काम बुद्धीने कर्मे आचरण करावीत.

म्हणूनि फळी लागू । सांडोनि देहसंगु ।
कर्मे करावी हा चांगु । निरोपु माझा ॥ १८। १७६
तैसें करता कर्म करू । अकर्ता फळाशा न धरू ।
एथ न शके आवरू । दोहींतें कर्म ॥ ज्ञा. १८।२३६

या दोघांना स्वभावतःच कर्म बाधू शकत नाही. एक वेळ कर्तृत्वमद असला तरी चालेल पण बंधनाला जर कारण असेल तर,

वाट पिकलिया रुखाचें । फळ अपेक्षी तयाचे ।
तेवीं साधारण कर्माचें । फळ घे तया ॥ ज्ञा. १८।२३७

॥ तु. २३१३

मांस खाणाऱ्याला मांस गोड लागते तो ते खातो. तसे मूल आवडते म्हणून मूल खाऊ नये.

मोतीयाचें पाणी चाखु नयें स्वाद। यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ।। ३३१३

वीणा आतून मधुर आवाज देतो म्हणून तो फोडून पाहू नये. मोती पाणीदार आहे म्हणून ते चाखण्याच्या प्रयत्न करू नये.

कर्मफळ म्हणुनि इच्छू नये कामा।

तुका म्हणे वर्म दावू लोकां ।। ३३१३

तात्पर्य, कर्मकर्त्याने विहित कर्म करावे पण हे दोन दोष टाकून करावे.

तैसें स्वभावें भागा आलें। वरी शास्त्रें खरें केलें।

ते विहित जो आपुलें। आचरे गा ।। ज्ञा. ।१८ ८९३

वर्णाश्रमाला अनुसरून वाट्याला आलेले कर्म शास्त्राने विधान केल्याप्रमाणे आचरावे पण ते कसे आचरावे तर–

परी आळसु सांडुनी। फळ काम दवडुनी।

आंगे जीवें मांडुनी। तेथेचि भरू ।। ज्ञा. १८।८९४

याप्रमाणे कर्म आचरण करावे व ते झपझप कर्म करावे.

जे चालणें वेगावत जाय। तो वेगु बैसावयाचि होये।

तैसा कर्मातिशयो आहे। नैष्कर्म्या लागीं ।। ज्ञा. १८।१५४

म्हणून त्या गौळणीचा अनुवाद करताना तुकाराम महाराज म्हणतात–

'चाले झडझडां उसंतूनी वाट'

अशा हातवटीने का कर्म केले तर चित्तावर जे रजोगुणाचे, तमोगुणाचे मल आणि विक्षेप हे दोष असतात ते जाऊन चित्त निर्मळ होते.

तैसीं कर्में हातो पातीं। जैं कीजती यथा निगुती।

तैं रजतमें झडती। झाडा देऊनी ।। ज्ञा. १८।१५६

तैसे निष्ठा केलें कर्म। तें झाडां करुनि रजतम।

सत्व शुद्धीचें धाम। डोळां दावी ।। ज्ञा. १८।१५८

अंतःकरणशुद्धी होते. कर्माच्या आचरणाने अंतःकरण शुद्ध झाले म्हणजे परमात्मा अपरोक्षरीतीने अनुभवाला येतो.

ऐसें निर्मळ झालिया चित्त । ब्रह्म प्रकाशे सदोदीत ।
मग ते नव्हे विषयासक्त । होय विरक्त अनिच्छतां ।। भा. १४।२३६
तुका म्हणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ।। तु. २७३४

सर्वांच्या आत परमात्मा असून अनुभवाला येत नाही त्याचे कारण अंतःकरण मलिन असते.

पृथ्वी गंधरूप स्वयें असे । तो गंध कस्तूर्यादिकी आभासे ।
तेवीं भगवत्सत्ता सर्वत्र असे ।
परी सात्विकी दिसे अति प्रगट ।। भा. २।५८१
एकी जाती तव्या आरिशासी । आरिसां उपलब्धी तवां मसी ।
तवी चित्तशुद्धि परमार्थासी । विकल्पवृतासी अभावो ।। हस्ता. २७५
चित्त ते निर्मळ जैसें नवनीत । जाणिजे अनंत तयामाजी ।। ३६
तरी जयाचे चोखाटें मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी
जया निजेलियाते उपासी । वैराग्य गा ।। ज्ञा. ९।१८८

अशा शुद्ध चित्तामध्ये परमात्मा अनुभवाला येतो. त्याप्रमाणे गोकुळातल्या स्त्रिया शरीररूपी घटातले पाणी उलंडून अती वेगाने जाते. म्हणजे विहित कर्माचे आचरण करीत. ती गौळण अंतर्मुख होऊन पाहते तर परमात्मा तिच्या अनुभवाला आला. परमात्म्याचा अपरोक्ष साक्षात्कार झाला.

आता काल्याकडे वळावयाचे.

परमात्मा तिच्या शुद्ध अंतःकरणात येऊन उभा राहिला म्हणजेच चोरी करावयास आला. अशाच घरी परमात्मा चोरी करण्यास जात असे. भगवंताने चोरी करावी पण वाटेल तेथे नाही.

घर पाहोंनि एकान्ताचें । नवविधा नवनीताचें ।। तु.२२८
एका भावाचा एकान्त । पीक पिकला अनंत ।। तु. २१६७

अंतःकरणाचा एकान्त असावा, त्यात नवविधा भक्तीचे नवनीत असावे, एकच भाव असावा. अशांच्याकडे भगवंत चोरी करण्याकरिता जात. त्यासाठी भावाची, एकान्ताची जरुरी आहे. गोपाळासह परमात्मा चोरी करण्यास जावयाचा. परमात्म्याने तेथे खोड्या फार कराव्यात. तेव्हा त्या

भरिला उलंडूनि

मिळोनि गौळणी देती यशोदी गाऱ्हाणी ।
दही दूध तूप लोणी शिका नुरे कांहीं ।
मेळवून पोरे तेथें रिघे एकसरें ।
वेगी आणोनी सामोरें तेथे लोणी खाये ।। १ ।।
हरि सोंकला वो हरि सोंकला वो ।। धृ० ।। तु. १२२
तुज वाटतसे कोड यासी लागतसे गोड ।
काय हासतेसी वेड तुज लागलें वो ।
आम्ही जाऊं तुजवरी पोरें चाळविल्या पोरी ।
काय सांगो भांडखोरी लाज वाटे आम्हांसी ।। ३ ।। तु. १२२

तेव्हा यशोदेने परमात्म्याला जवळ घेऊन ती त्याला सांगू लागली की, कृष्णा ! देवाने आपल्याला काय कमी केले आहे !

काय उणें का करितोसि चोरी । किती सांगो तू नाइकसी हरी ।
परे परता तू पळोनि जासी दुरी ।
अनावर या लौकिका बाहेरी वो ।। १ ।।
माया करुणा हे करिते बहुत ।। धृ० ।। तु. ११९

यशोदेच्या देव्हाऱ्यात पुष्कळसे देव होते. तेव्हा परमात्म्याने पाहिले. तुम्ही कोण येथे आमच्या घरात चोर हो !

देव गिळूनिया धरिलें मौन ।
माये म्हणे कोण येथें दुजें ।। २ । तु. ३५
देवापाशीं पुसे देव काय झाला । हांसे आलें बोला याचे हरी ।। ३ ।। ३५
कां जे योगमाया पडलें । हे जाले आहाती आंधळें ।।
म्हणोनि प्रकाशाचेनिही देहबळें । न देखती मातें ।। ज्ञा. ७ । १५८
यांचे मी जवळी देव तो नेणती ।
लटिके मानिती साच खरें ।। ५ ।। तु. ३५

यशोदा म्हणाली कृष्णा, तू खोड्या फार करतोस, तुला शाळेत पाठविले पाहिजे.

[illegible]

गाई गोपाळ यमुनेचे तटी । येती पाणीया मिळोनि जगजेठी ।
चेंडु चौगुणा खेळती वाळवंटी । चला चला म्हणती पाहू दृष्टी वो ॥१॥
ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी ॥ तु. १३५
गोधनें चाराया जातो शारंग पाणी । मार्गी भेटली राधिका गौळणी ।
कृष्णदान मागे निरी आसडोनी । तव ती देखिली यशोदा जननी ॥१॥
यशोदा म्हणे नाटका ऋषिकेशी । परनारीसी कैसा रे झोंबसी ॥
येरु रुदन मांगतो मातेपाशीं । माझा चेंडू लपविला निरीपाशीं ॥२॥

असा साक्षात परब्रह्म, गोपाळासमवेत गाई चारण्यास जाऊ लागला.

ब्रह्मविद्येचा पुतळा । गाई राखितो गोवळा ।
श्रुति नेणवे ते लीळा । वेदी सनकादिकां ॥ ज्ञानेश्वर ६८

तेव्हा खेळताना गोपाळाला भूक लागली.

खांदी भार पोटी भूक । काय खेळायचे सुख ॥ तु. २००
काम सारूनि सकळ । आले अवघे गोपाळ ।
झाली आता वेळ । म्हणती आणा शिदोऱ्या ॥ तु. १८६

प्रत्येकाने आपली शिदोरी सोडली आणि देवाने ती मिसळली तेव्हा,

आजी ओस आमरावती । काला पाहावया येती ।
देव विसरती देहभाव आपुला ॥ तु १७६
आता हाचि जऊ । सव घेऊ शिदोरी ॥ १ ॥ १७६
हरिनाभाचा खिचडी काला । प्रेमें मोहिला साधने ॥ २ ॥ १७६

याचा अर्थ, देवाने सर्व वृत्ती आपल्यात मिसळून घेतल्या.

कंठीं धरिला कृष्णमणी । अवघा जनीं प्रकाश ॥ १ ॥
काला वाटू एकमेका । वैष्णव निका संभ्रम ॥ २ ॥
वांकुलिया ब्रह्मादिकां । उत्तम लोकां दाखवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे भूमंडळीं । आम्ही बळी वीर गाढे ॥ ४ ॥ १८२